॥ जय माताजी ॥

# सद्गुरु स्वामी स्वरूपानंद स्मृति सौरभ

संपादक : स्वामी सत्यदेवानंद सरस्वती
सौ. मृणालिनी जोशी
श्री. ना. स. (नाना) करंदीकर

स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळ प्रकाशन
पांवस, रत्नागिरी.

# प्रकाशकाचे निवेदन

श्रीमत् स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळाने आजवर स्वामी स्वरूपानंद विरचित व इतर सद्भक्तांनी लिहिलेले ग्रंथ प्रकाशित केले. स्वामीच्या महानिर्याणानंतर म्हणजे १५ ऑगस्ट १९७४ नंतर हा प्रासादिक ग्रंथ स्वामीभक्तांच्या आठवणीच्या रूपाने प्रकाशित व्हावा अशी इच्छा अनेक भक्तांनी दर्शविली. संपादक मडळ स्थापन होऊन त्यात तिघांनी, स्वामी सत्यदेवानंद सरस्वती, सौ. मृणालिनी जोशी व श्री. ना. स. करंदीकर–स्वामी भक्तांना आवाहन करून आठवणी मागविल्या. त्याचे संकलन संपादन करून आठवणी मागविल्या. त्याचे संकलन संपादन करून 'सद्गुरू स्वामी स्वरूपानद स्मृति सौरभ' ग्रंथ मंडळाला सादर केला. तोच स्वामीच्या ७३ व्या जन्मोत्सव शुभप्रसंगी ग्रंथरूपाने प्रसाद म्हणून प्रकाशित होत आहे. हा स्मृति सौरभ प्रसन्न, मंगल, प्रेरक, संजीवन देणारा ठरेल अशी खात्री आहे. हा ग्रथ स्वामीच्याच चरणकमली समर्पण केला आहे.

या संग्रहासाठी ज्या ज्या स्वामीभक्तानी आपल्या आठवणी प्रेमाने लिहून दिल्या त्या सर्वांचे आभार मानणे त्याना आवडणार नाही, पण त्यांनी आपली सेवा रूजू केली व आपले प्रेममय कर्तव्य बजावले त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे उचित ठरेल. संपादक मंडळातील तिघांनीही या स्मृतीचा सौरभ अमोलिक सेवा अशा ग्रथस्वरूपी कलशात साठवून तो सर्वांना उपलब्ध केला त्याबद्दल त्यांना धन्यवाद.

जनसेवा मुद्रणालयाच्या चालकांनी अगदी अल्पावधीत या ग्रथाचे मुद्रण तत्परतेने करून दिले त्याबद्दल सेवा मडळ त्याचे आभारी आहे. तसेच चित्रकार स्वामीभक्त अनंतराव सालकर यांनी मुखपृष्ठ व त्यावरील चित्र तयार करून दिले त्याबद्दल आभार.

परमपूज्य स्वामी स्वरूपानंदांचे भक्त, चाहते असंख्य आहेत. त्यांच्यापैकी कित्येकांच्या अतःकरणातून स्वामीच्या कृपाप्रसादाचे प्रेमभाव उचंबळत असणार. या स्मृति सौरभ ग्रंथाचे अनेक खंड तयार होण्याचा संभव आहे. स्वामीच्या प्रेरणेने असेच सत्कार्य करण्यास स्वरूपानंद सेवा मंडळ, रत्नागिरी, कटिबद्ध आहेच.

हा स्मृति सौरभ ग्रंथ प्रसाद म्हणून संग्रही ठेवावा अशी विनंती आहे.

मार्गशीर्ष वद्य १२, शके १८९७
दि. २९ डिसेंबर १९७५

**बा. म. परांजपे,**
कार्यवाह, स्वामी स्वरूपानंद
सेवा मंडळ, रत्नागिरी.

# संपादकाचे ‘हृद्गत’

इ. स. १९७४ चा जुलै–ऑगस्ट ! अनेक व्यवसायातली, विविध स्वभावांची निरनिराळ्या गावची शेकडो माणसं पांवसला जमली होती. गरीब–श्रीमंत, स्त्री–पुरुष, सान-थोर, शिक्षित–अशिक्षित हे सारे सारे भेद ‘पांवसच्या स्वामींच्या’ पायाशी मावळले होते. कारण प्रत्येकाच्या अंतर्यामी सद्गुरूंविषयी एकच एक भक्ति-प्रेमाचा झरा झुळझुळत होता !

स्वामी स्वरूपानंदजींची म्हणजेच आपल्या गुरुमाउलींची प्रकृती अत्यंत ढासळली आहे. कोणता क्षण कसा येईल हे सांगता येत नाही ’–अशा सचिन्त अवस्थेत पांवसला गोळा झालेला हा भक्तमेळावा आपल्या भावभावनांना अनेक प्रकारांनी आकार देत होता. प्रत्येकाचा बोलण्याचा विषय एकच ! स्वामींनी प्रत्येकाच्या आयुष्यात ह्या ना त्या रीतीने प्रेमभाव ओतला होता. त्यांचा एखादाच मधुर शब्द; पण त्या शब्दाने अनेकांना नवजीवन प्राप्त झाले होते. स्वामींच्या एकाच स्नेहमय दृष्टिक्षेपात काहींचे जीवन कायमचे उजळून गेले. जो तो जिव्हाळ्याने सांगत होता. सांगता सांगता गहिवरत होता.

ऐकता ऐकता वाटलं–स्वामींचे केवढे विराट दर्शन हे ! . . . हे दर्शन समग्रपणे कुठे तरी शब्दांकित व्हावयास हवे. स्वामींच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ न घडलेल्या माणसांनाही त्यांच्या व्यक्तिमत्वाची ओळख व्हावयास हवी. सद्गुरूंच्या उपदेशा-मृताच्या सिंचनाने आमच्या मुलाबाळांची हृत्कमळं उमलायला हवीत.

ह्या भावनेतूनच ‘ जास्तीत जास्त भक्तमंडळींनी स्वतःला आलेला स्वामींचा अनुभव लिहावा ’ ह्या योजनेचा उगम झाला. गतवर्षीच्या म्हणजे १९७४ च्या, स्वामींच्या जन्मदिनोत्सवात ह्या स्मृतग्रंथाची रूपरेषा प्रकट सभेत व्यक्त झाली आणि कृतसंकल्पानुसार स्वरूपानंद सेवा मंडळ संस्थेच्या वतीने ठिकठिकाणच्या निष्ठावंत स्वामीभक्तांकडून वेळेवर आलेल्या स्मृतिसुमनांची ग्रंथरूपाने यथामति सुबक रचना करून आम्ही हा ‘ सद्गुरू स्वामी स्वरूपानंद स्मृति सौरभ ’ ग्रंथ आपल्या ‘ देवघरात ’ ठेवीत आहोत.

० ० ०

ह्या स्मृतिसंग्रहात एकंदर सदतीस साधक भक्तबंधूंनी व पंचवीस माता-भगिनींनी लिहून दिलेल्या आठवणींचा समावेश केला आहे. त्या सर्व आठवणी अत्यंत तळमळीने भक्तिप्रेमाने व प्रचीतीने लिहिलेल्या आढळल्या. तरीही ‘ कोणत्याही कार्यात भावनेला विवेकाची जोड हवी ’ हे सद्गुरूंचेच एक सूत्र नेहमी नजरेसमोर ठेवून आम्ही काही निकष लावीत ह्या विविध स्मृतींचे संकलन संपादन केले आहे, हे आवर्जून नमूद करावयास हवे.

व्यक्तिमत्व प्रामुख्याने प्रतिबिंबित झाले की नाही ? अशा अनेक गोष्टी लक्षात घेणे जरूर असल्याने आलेल्या स्मृतींपैकी काही आठवणी पूर्णपणे बाजूलाच ठेवाव्या लागल्या. पुष्कळशा स्मरणचित्रांना छोटा आकार देणेच भाग होते. काही ठिकाणी वाक्यरचना बदलावी लागली. विशेषतः 'सद्गुरूंच्या मुखातले शब्द' म्हणून जेथे निर्देश होते तेथे फारच काळजीपूर्वक शब्दार्थ व निवेदकाचा आशय याचा विचार करावा लागला. अगदी उशिरा ( म्हणजे दि. ८ डिसेंबरनंतर ) आलेल्या आठवणींचा ग्रंथात अंतर्भाव करणे शक्यच नव्हते ! संपादनाचे कार्य किती नाजुक हाताने करावे लागते, ह्याची थोडीशी कल्पना आमच्या गुरूबंधु-भगिनींना यावी म्हणून हा प्रपंच !

० ० ०

'स्मृति-सौरभ' ग्रंथातील आठवणींतून काही समान अनुभतींचे दर्शन घडते असे :—

स्वामीजी हे सर्वांची, प्रत्येकाची, आस्थेने प्रथम चौकशी करीत. "ज्याचा जसा भाव" त्याप्रमाणे पेलेल देवढे भक्तांना कृपादान देत. सोऽहं बोध करीत.

आपण स्वतः 'अकर्तेपणे' नांदत असता दुसऱ्यास मोठेपणा देऊन भक्ताला प्रचीती आणून देत. ज्याचा त्यालाच बोध व्हावा अशी त्यांची मनीषा व योजना असे.

मंत्रतंत्र, उदी-अंगारा, गंडा-दोरा असल्या गोष्टींचे स्वामींना अगदी वावडे असे· तथापि त्यांच्या ठिकाणी असलेल्या प्रचंड अध्यात्म शक्तीचा सहज आविष्कार होऊन भक्तांना त्यांचे परिसरात दिव्य नाद, अलौकिक प्रकाश, सुगंध इत्यादि अनुभव येत असत.

स्वामींच्या कृपेने पुष्कळ जीव सन्मार्गाला लागले. जे मुळात सन्मार्गगामी होते त्यांची त्या मार्गावरची श्रद्धा स्वामींच्या दर्शन, अनुग्रहाने 'एकविध' होऊन त्यांची वाटचाल द्रुतगतीने होऊ लागली. अनेकांना अंतःसमाधान प्राप्त झाले.

ह्या सर्व पैलूंचे दर्शन प्रस्तुत स्मृतिसंग्रहात होते. सद्गुरूंच्या सुखद स्मृतींचा हा पहिला खंड ठरून असे अनेक स्मृतिग्रंथ तयार व्हावेत हा एक सद्विचार उत्कटपणे श्रीगुरुचरणी निवेदन करून 'त्वदीयं वस्तु गोविन्द तुभ्यमेव समर्पये' ह्या भावनेने आम्ही हा स्वामींचाच ग्रंथ स्वामींनाच अर्पण करून त्यांचे श्रीचरणी मस्तक ठेवून निःशब्द होत आहोत.

स्वामी सत्यदेवानंद सरस्वती

श्रीसद्गुरू जन्मदिनोत्सव
मार्गशीर्ष वद्य द्वादशी १८९७
दि. २९-१२-१९७५

सौ. मृणालिनी जोशी
श्री. ना. स. (नाना) करंदीकर

( संपादक : स्वरूपानंद स्मृति सौरभ )

## सद्‌गुरुस्वामी

## स्वरूपानंद–स्मृति–सौरभ

# अनुक्रमणिका


| | | | |
|---|---|---|---|
| १ | वै. दांडेकर उवाच 'सिद्ध-पुरुष' स्वामी स्वरूपानंद | रा. कृ. तथा राजाभाऊ रानडे, मिरज | १ |
| २ | ग्वाल्हेरची स्वरूप सुकन्या आली पांवस–माहेराला | सौ. प्रभावती देव, ग्वाल्हेर | ३ |
| ३ | तो संकटी येई धांवोन | श्री. वि. दा. पंचवाघ, कोल्हापूर | ५ |
| ४ | किती सांगू ? असं झालंय् ! | श्री. कृ. प. भिडे, रत्नागिरी | ६ |
| ५ | फुलला गुरुस्मृतींचा हा रम्य–सोनचाफा ! | कु. कमल ( तथा माई ) पंडित, ( वेंगुर्ला ) | १२ |
| ६ | अमृतमय ठेवा | श्री. सुभाष सौंदलगेकर, पुणे | २५ |
| ७ | परब्रह्म स्वामी स्वरूपानंद | श्री. के. ना. गांधी, सासवड | २९ |
| ८ | श्री. संत विनोबांचा कृपाप्रसाद | श्री. ना. वा. तथा रंगनाथ कुलकर्णी, कोल्हापूर | ३१ |
| ९ | सद्‌गुरुकृपेच्या सन्मार्गावर | श्री. रा. वा. गोडबोले, बेळगाव | ४० |
| १० | पाडव्याची तिथी—संत पातले पंगती ! | सौ. काशीबाई बाळकृष्ण इनामदार, कोल्हापूर | ४४ |
| ११ | मौन जपाचे गंगास्नान | श्री. का. नी. जोशी, पुणे | ४६ |
| १२ | गुरुवचने, माझी श्रुति-स्मृति ! | सौ. सुशिला गणेश दिवाण, पुणे | ५१ |
| १३ | विसरू कसा मी गुरुपादुकांना ? | श्री. आ. शि. साडविलकर, गुरुजी, चिपळूण | ५४ |
| १४ | अमोल ठेवा स्वर्णक्षणांचा | सौ. यमुताई कुलकर्णी, कोल्हापूर | ५७ |
| १५ | धन्य धन्य दिवस आजी संतांचे दर्शन | श्री. सुरेश मनोहर साळवी, राजापूर | ६० |
| १६ | सदा माझे डोळां | कु. मीरा पंडित, कुर्णे | ६३ |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | १५ ऑगस्टच्या सकाळची अद्‌भुत प्रचीति | श्रीमती वसुधा आपटे, पुणे | ६९ |
| १८ | उपासकांचा आधारवड | श्री. हरी रघुनाथ पटवर्धन, दापोली | ७२ |
| १९ | स्वामी स्वरूपानंदांच्या हृद्य आठवणी | श्री. ना. स. करंदीकर, पुणे | ७४ |
| १९अ | माहेर घरी आले | सौ. सुशीला करंदीकर, पुणे | ८१ |
| २० | होणार ते होते प्रारब्धेंचि ! | सौ. सुमती पाटकर, पाट | ८३ |
| २१ | कुलधर्म 'रामसेवा' तो पांवसी पहावा | श्री. रा. वा. कुलकर्णी, पुणे | ८५ |
| २२ | श्री स्वामीच्या शब्दांची शक्ती | सौ. मालतीबाई पंचवाघ, व श्री. वि. दा. पंचवाघ, कोल्हापूर | ८८ |
| २३ | पांवस–माझं माहेर ! | सौ. विजया रा. कुलकर्णी, पुणे | ९० |
| २४ | मी आणि रमण महर्षि एकच ! | डॉ. गं. वि. कुळकर्णी, कोल्हापूर | ९४ |
| २५ | स्वामी स्वरूपानंद म्हणजे ओॲसिस | श्री. प्रमोद रा. कुलकर्णी, पुणे | ९५ |
| २६ | तव स्मरण संतत स्फुरणदायि आम्हा घडो | श्री. द. आ. जायदे, पुणे | १०३ |
| २७ | नाम आणि सोऽहम् एकरूप ! | श्री. विनायक वा नातू, मुबई | १०६ |
| २८ | काही दूरवर आलो-तेवढ्यासाठीच | श्री. शशिकांत पुरंदरे, पुणे | १०७ |
| २९ | स्तोत्रगान अल्पतोय अर्घ्यदान अर्पितो | श्री. विनायक गो. पागे, कोल्हापूर | ११० |
| ३० | पाहिले परब्रह्म साजिरे | सौ. सुमती मधुकर गोरे, विलेपार्ले | ११३ |
| ३१ | पर मनोगत जाणणारे स्वामी स्वरूपानंद | श्री. महादेव वि. जोशी, वैद्य, मुरुड ( हर्णै ) | ११६ |
| ३२ | श्रीसद्‌गुरू स्मृतीच्या मी चादण्यात न्हातें ! | सौ. अरूणा नगरकर, पुणे | ११७ |
| ३३ | तीस वर्षांनी तेंच दर्शन | सौ. विजया गो. दत्तवाडकर, कोल्हापूर | ११९ |
| ३४ | ' करूं नामाचा गजर ' | श्रीमती अंबाबाई देशपाडे, बेळगाव | १२१ |
| ३५ | श्रीस्वामीच्या सत्सगात सुगंधाची सोबत | श्री. एन. एन. जाधव, पुणे | १२२ |
| ३६ | सद्‌गुरू सेवेचा मंगल योग | सौ. स्नेहलता मो. फडके, कोल्हापूर | १२४ |
| ३७ | सोऽहं मंत्र–महौषधि | श्री.दीनानाथ शं.वायकूळ,कोल्हापूर | १२६ |
| ३८ | स्वरूपनाथांच्या दरबारातील ' माझी गुरुगीता ' | श्री. वि. शं. वष्ट, माधवपूर–वडगाव ( बेळगाव ) | १२८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३९ | सुखकर्ता दुःखहर्ता स्वामी समर्था ! | सौ. शोभना रानडे, पुणे | १३० |
| ४० | संतांचा महिमा स्थलकालातीत ! | श्री. विनायक गो. पागे, कोल्हापूर | १३२ |
| ४१ | एका मालाकाराची सुमनांजलि | श्री. शामराव उपळेकर, कोल्हापूर | १३६ |
| ४२ | ऐसी अनुग्रहाची कथा ! | सौ. नलिनी कुळकर्णी, कोल्हापूर | १३९ |
| ४३ | मी सदैव पाठीशी आहे | सौ. नलिनी श्री. हुद्दार, कोल्हापूर | १४१ |
| ४४ | देवा तू सागर–मी तुझी लहरी | श्रीमती ताराबाई वि. काळे, कोल्हापूर | १४४ |
| ४५ | जो तो सागे–ज्याला त्याला ! | संकलन : सौ. यमुताई कुळकर्णी तीन भगिनी, कोल्हापूर | १४६ |
| ४६ | विसरू कसा मी गुरुपादुकांना | श्री. वि. के. फडके, पुणे | १५० |
| ४७ | श्रीसद्गुरूंच्या सहवासातील १२वर्षे | श्री. व. दा. भट, पुणे | १५२ |
| ४८ | ससार भगवंताचा | सौ. कमल जोशी, सांगली | १६० |
| ४९ | कै गुरु गौरव वर्णिता उन्मेष असे ? | श्री. म. दा. भट, पुणे | १६१ |
| ५० | गुरुबधूंचे मित्रप्रेम | श्री. वि. गो. (काका) लिमये, पुणे | १६६ |
| ५१ | बाल मित्राचे हितगुज | डॉ. बाबा देसाई, पांवस-रत्नागिरी | १६८ |
| ५२ | सद्गुरूंचे चरणी | श्री. देवळेकर शेठ, व्यापारी रत्नागिरी | १७१ |
| ५३ | ससाराचा खेळ पूर्ण झाला ! | श्री भाऊराव आठवले,दत्तस्थान पुणे | १७३ |
| ५४ | गुरु प्रसाद | श्री. नागेश अनत नाईक, पणजी | १७६ |
| ५५ | स्वामीच्या सान्निध्यात | श्री. भाऊराव देसाई, पांवस-रत्नागिरी | १७८ |
| ५६ | रंगी सुरंगतेची आगळीक ! | श्री. रा. भा. वैद्य, पुणे | १८२ |
| ५७ | “सर्व देश निवासे !” | सौ. मृणालिनी जोशी, पुणे | १८५ |
| ५८ | स्मृति–त्रिदल–बिल्व हा शिवगुरो तुम्हा वाहिला | स्वामी सत्यदेवानंद सरस्वती, आळदी | १८७ |

# विष्णुनन्दन स्तोत्रम् ।

विष्णुनन्दनमहं नौमि रुक्मिणिसुतम् ।
पांवसक्षेत्रजं रामचंद्रम् ।। ध्रु० ।।

कनककायं गुरुं भजनरतसुरतरुम् ।
सर्वजनवत्सलं रामचन्द्रम् ।
अमृतमधुभाषिणं भक्तहृत्साक्षिणम् ।
श्रीप्रियंवदकुलोत्पन्नमतुलम् ।। १ ।।

नाथमुद्राङ्कितं निजगुरुप्रियतमम् ।
हंसभजनोन्मुखं रामचन्द्रम् ।
स्वस्वरूपानुसंधानमग्नं शिवम् ।
कमलनेत्रं सदानन्दसुखदम् ।। २ ।।

ज्ञानदेवप्रियं रामकृष्णाश्रितम् ।
अनुभवामृतमयं रामचन्द्रम् ।
सकलदेवेश्वरं सर्वतीर्थाकरम् ।
यतिजनानन्ददं रामचन्द्रम् ।। ३ ।।

इति
श्रीअलकावतिक्षेत्रनिवासिना श्रीमत्सत्यदेवानन्द सरस्वतिस्वामिना
विरचितं
'श्रीविष्णुनन्दनस्तोत्रम्' ( संपूर्णम् )



ॐ



स्वामी म्हणे झालें कृतार्थ जीवन।
सद्गुरु-चरण उपासितां ॥

*

## ' सिद्धपुरुष स्वामी स्वरूपानंद '

— श्री. रा. कृ. तथा राजाभाऊ रानडे, मिरज.

**वै. दांडेकर उवाच**

**" सध्या रत्नागिरीजवळ पांवस येथे एक सिद्ध कोटीला पोहोचलेले सत्पुरुष आहेत. " हे वै. दांडेकर यांचे जाहीर प्रवचनातील उद्गार ऐकताच ते ' संत-वाक्य ' प्रमाण मानून मी लगेच पांवसचा रस्ता धरला. "**

पावस येथील सद्गुरू स्वामी स्वरूपानद सर्वार्थाने सिद्ध पुरुष आहेत. तशी त्याची ख्यातीही आहे. पण मला माझ्या साधनकालात ही जी प्रचीती आली ती खालीलप्रमाणे—

१९५८ सालापासून पढरीला प्रतिवर्षी पायी जायचे भाग्य मला लाभले. वैकुंठवासी सत मामासाहेब दांडेकर, धुडा महाराज यांच्या तेथील प्रवचन व निरू-पणाच्या श्रवणाने आमची भक्तिमार्गावर श्रद्धा बसली. सहा–सात वर्षातच सद्गुरू कृपा आपल्यावर व्हावी, अशी इच्छा निर्माण झाली. गुरुभेटीची ओढ लागली. पण विशेष चालना मिळत नव्हती.

पैठणच्या विजयी पांडुरंगाचे एक चित्र मला मिळाले होते. त्यावरच वर्तमान-पत्रातून आलेले वै दाडेकराचे चित्र मी लावले होते. हे चित्र देव्हाऱ्याजवळ ठेवून मी दररोज प्रार्थनेला बसत असे.

गुरुदेव रानडे याचे अनुग्रहीत असलेले माझे ओगलेवाडीचे चुलते श्री. अच्युतराव रानडे याना आपल्या नामस्मरण साधनेमध्ये काही अडचणी व शका आल्या होत्या; त्याचे निरसन पावस येथील श्री स्वामी स्वरूपानद स्वामी याच्याकडून होईल असे त्यांच्या ज्येष्ठ गुरूबधूच्या बरोबर झालेल्या चर्चेमधून व स्वत.स झालेल्या दृष्टान्ता-वरून समजल्यावर ते पांवसला गेले होते. परत जाताना ते मिरजेत उतरले होते.त्यानी मला त्याना श्री स्वामीनी प्रसादभेट म्हणून दिलेली संजीवनी गाथा वाचावयास दिली "श्री स्वामीचे चरित्र प्रसिद्ध झाले आहे ते वाच. एकदा पावसला तरी जाऊन ये,'' असे ते म्हणाले. यापूर्वी मला स्वामीची काहीच माहिती नव्हती.

मी स्वामीचे प्रासादिक अभंग वाचले. पुढे चरित्रही वाचले. अनेकांकडून त्यांच्या विषयी माहिती मिळाली. योगायोगाने विलेपार्ले येथे राहात असलेल्या स्वामीच्या पुतण्याची भेट झाली आणि त्याच्या दर्शनाला जाण्याची ओढ वाढली. पण प्रेरणा होईना. ते काम एका वरवर साध्या वाटणाऱ्या प्रसंगाने घडले.

इ. स. १९६६ साली आषाढी वारी झाल्यावर जुलैमध्ये वै. मामासाहेब दाडेकर मिरजेत आले होते. येथील माधवजी मदिरात त्याचे प्रवचन होते. प्रवचन सपले. व्यासपीठावरून खाली उतरता उतरता समोर बसलेल्या राजघराण्यातील मडळीना उद्देशून असेल कदाचित–ते म्हणाले, " सध्या रत्नागिरीजवळ पावस येथे एक सिद्ध कोटीला पोचलेले सत्पुरुष आहेत " समोरच्या मडळीनी या वाक्याला विशेष प्रतिसाद दिलेला मला आठवत नाही. मी मात्र बराच दूर बसलेला असूनही त्या वाक्याने माझ्या मनात लख्ख प्रकाश पडला. आदर्श सत म्हणून मी ज्याची रोज पूजा करतो त्याच्या तोडचे हे 'सतवाक्य' माझ्यासाठीच उच्चारले गेले आहे, अशी माझी खात्री झाली

त्यानतर लगेच अक्षरश. धावत म्हणजे ३१ जुलै १९६६ ला मी पावस गाठले. दुसऱ्या दिवशी अधिक श्रावण शुद्ध १५ शके १८८८,१ ऑगस्ट १९६६ ला माझ्यावर श्री सद्गुरू स्वरूपानदाची कृपा झाली. मला अनुग्रह मिळाला सताची वचने ही सत्यवचने असतात याची प्रचीती आली.

आमची तीनही मुले विद्यार्थीदशेमध्ये, हायस्कूल व कॉलेजमध्ये शिकत असताना इ स १९६८ मध्ये प्रथमच पावसला श्रीसद्गुरू स्वरूपानद स्वामीच्या दर्शनाला गेली होती त्यानी परत आल्यावर श्रीस्वामीच्या अलौकिकत्वाने भारावून जाऊन आपला अनुभव सागितला तो असा––

सकाळी श्रीस्वामीच्या प्रथम दर्शनाला खोलीमध्ये जाताना पूजा साहित्यामध्ये त्यानी बागेतील फुले तोडून नेली होती. आत गेल्यावर मुलानी पूजा साहित्याचे ताट स्वामीच्यापुढे कॉटवर ठेवले. स्वामीनी त्यातील फुले आपल्या एका हातात घेतली व एक एक फूल कॉटशेजारील भितीवरील फोटोना घालू लागले व जेवढे फोटो होते तेवढीच फुले त्याच्या हातामध्ये होती. कमी पडली म्हणून पुन्हा ताटातून घ्यावी लागली नाहीत व जास्त झाली म्हणून ठेवावी लागली नाहीत

नतर स्वामीनी मुलाना नित्यपाठ ज्ञानेश्वरीचे पुस्तक दिले व उघडून त्यातील ओवी वाचावयास सागितली. तर काय आश्चर्य, मुलानी जे पान उघडले त्यावर ओव्या होत्या––" ते विहित कर्म पाडवा । आपुला अनन्य बोलावा । आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची । " आणि दुसरी ओवी––" तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागी ।। " बागेतील फुलापेक्षा तुमची स्वकर्म-कुसुमे मला सर्वात्मकाला अर्पण करणे हीच पूजा ! ● ● ●

# ग्वाल्हेरची स्वरूपसुकन्या आली पांवस–माहेराला.

—— सौ. प्रभावती देव, ग्वाल्हेर.

**" कसेही करून स्वामी आपणास भेटले पाहिजेत असा ध्यास लागला परंतु स्वामींचे आणि आमचे भौगोलिक अंतर पाहता ती गोष्ट अशक्यप्राय वाटली. पण श्रीस्वामींनी ती शक्य करून दाखविली. एकदा नव्हे तीनदा. "**

श्री. ग. का. रायकर यानी ' दीपलक्ष्मी ' चा " स्वामी स्वरूपानंद " विशेषांक काढीपर्यंत आम्हास स्वामीची अजिबात माहिती नव्हती. दर महिन्याप्रमाणे ' दीप-लक्ष्मी ' चा अंक आला आणि तो कोणा मोठ्या सत्पुरुषाचा आहे, हे पाहताच मी समग्र वाचून काढला आणि तो वाचल्यानतर इतका विलक्षण मन.कल्लोळ सुरू झाला, त्याची कल्पनाच करवत नाही. आणि कसेही करून स्वामी आपणास भेटलेच पाहिजेत असा ध्यास लागला पण स्वामीचे आणि आमचे भौगोलिक अंतर पाहता ती गोष्ट अशक्यप्राय वाटली व म्हणूनच जरा आगाऊपणा वाटेल, पण मी स्वामीना— " ह्या देही भेट शक्य न झाल्यास परत माझे इकडे जन्म घ्या आणि भेटा " असा मानस सागितला व झोपी गेले. पहाटेच्या वेळी मला चहूंबाजूनी घरे व मध्ये जलाशय असे एक ठिकाण दिसले. तेथे एक सवाष्ण बाई उभी होती व मी वरून जिन्याने खाली उतरत होते. त्याच जिन्याने एक साधारण चार–पाच वर्षाचे मूल पूर्ण निथळत वर चढत होते. त्याला निथळताना पाहून मी 'काय रे ! इतका भिजलास कसा ?' असा प्रश्न केला. तेव्हा त्याने त्या उभ्या असलेल्या बाईकडे बोट करून " तिने मला पाण्यात ढकलले होते पण मी निघून आलो " असे सागितले. त्यावर जरा रागानेच " दाखव बरे कोणी ढकलले ?" असे म्हणून मी खाली उतरू लागले, पण माझे अगोदरच ते पोर त्या बाईजवळ पोहोचले आणि हात लावून ' ही ' असे म्हणत असतानाच तिने त्याला परत पाण्यात लोटून दिले. ते पाहताच मी जरा रागानेच त्या बाईस " तू काय केलेस याचा विचार केलास का ? एकदा तो जीवानिशी वाचला असताना पुनः कशाला परीक्षा पाहतेस ? ," असे म्हटले व त्या क्षणी जागी झाले.

मी माझ्या बुद्धीने या स्वप्नाचा अर्थ असा लावला की, मी स्वामींना जे परत जन्म घेण्याबद्दल विनवले त्याचे उत्तर त्यानी ह्या स्वप्नात माझ्या तोडूनच वदवले की

"संसार सागर एकदा तरणेच किती अवघड आहे हे कळूनही कोणाला पुनः त्यात लोटणे किती वेडेपणाचे आहे?" आणि मला माझी चूक उगमली, त्याबद्दल श्रीस्वामींची क्षमा मागून आपण सर्वसमर्थ आहात तरी ह्याच जन्मी एकदा तरी भेट घडवा अशी विनवणी केली आणि ती मान्य करून त्यानी एकदा नव्हे तीनदा भेट घडवली.

दुसरा अनुभव असा की, श्रीस्वामींच्या भेटीचा योग लवकर येईना. म्हणून कुलदेवतेस अहोरात्र विनवणी सुरू केली की, लवकर भेट घडव. तिने साधारण नवरात्राचे सुमारास स्वप्नभेट दिली. अंथरुणाशेजारी देवी उंचावर उभी राहून माझ्याकडे पाहून हसत होती. मी तिला का कोणास ठाऊक पण तुझे पाय दाखव असाच प्रश्न केला. त्यावर तिने मी पुढे केलेल्या हातावर आपला पाय ठेवला पण त्याचा मऊ वा गारपणा मला जरा विचित्र वाटला आणि मी दुसरा पाय मागितला तोही तिने लागलीच उचलून माझ्या हातावर ठेवला. त्या क्षणी उभ्या माणसाने पाय उचलणे म्हणजे खाली पडणेच असे वाटून आता ही पडली की काय असा विचार मनात आला. वर बघते तर देवी नदिकेश्वरावर बसून माझ्याकडे पाहून हसत होती. त्या क्षणी मला जाग आली; पण स्वप्नाचे काही कारण कळले नाही असे म्हणून परत झोपी गेले. तर श्रीस्वामींच्या पायांचे दर्शन झाले. याचा अर्थ मी असा केला की, देवीने मला माझ्यात आणि स्वामीत काही फरक नाही, मग भेटीचा अट्टाहास कशाला ? असे सुचविले व मनाला शाती आली.

दोनदा स्वामीदर्शनास गेलो तेव्हा रत्नागिरीस रात्र काढून सकाळी पांवसला जावे लागले. याचा थोडा त्रास वाटला. म्हणून तिसऱ्यादा निघताना आज पांवसला न्या अशी श्रीस्वामींची विनवणी केली आणि आश्चर्य असे की, ज्या गाडीने पहिल्या दोन्ही खेपेस गेलो होतो, त्याच बसने पुण्याहून निघून ही गाडी इतक्या लवकर पोहोचली. की, परतीचे रिझर्व्हेशन करूनही आम्ही पांवसला वेळेवर पोहोचलो.

आमची श्रीस्वामींची पहिली भेट व अनुग्रह झाला तो दिनाक २३–१२–६९ दत्तजयंती हा होता. म्हणजे आम्हास श्री स्वामींच्या स्वरूपात प्रत्यक्ष दत्तदर्शनच झाले असे म्हणावयास हरकत नाही. माझे मोठे दीर बरोबर होते. ते म्हणाले " आज माझ्या दत्तजयंतीच्या उपासाची काय सोय ? " मी म्हणाले, " आज आपणास प्रत्यक्ष दत्तदर्शन झाले आहे. आता उपासाची गरज नाही. " असे हे उत्तर त्याना पटले.

आम्हाला श्री. देसाई यानी स्वामींच्या भेटीच्या आधी श्रीस्वामी वाङ्मय दाखवले. त्यातील अमृतधारा हे पुस्तक माझ्या पतीच्या मनात भरले. ते अतर्ज्ञानाने जाणून त्याना स्वामींनी अमृतधारा 'प्रसाद भेट' दिली.

हेच माझे श्रीस्वामींनी दिलेले साक्षात्कार म्हणा, काहीही म्हणा, ह्याहून जास्त काहीच नाही.



# तो संकटिं येई धांवोन

—श्री. वि. दा. पंचवाघ, कोल्हापूर.

**—बाजूच्या झाडींतून एक इसम धावत गाडीपुढे आला व ओरडून म्हणाला, " साब, गाडी रोको, आगे मत जाव । गाडीसे धुवा निकल रहा है । " अंगावर रोमांच उभे करणारी ही आठवण.**

एकोणीसशे एकाहत्तरच्या ऑक्टोबरातील हा प्रसग आहे. तारापूरला आमच्या चिरंजिवांकडे आम्ही सर्वजण गेलो होतो व कोल्हापूरला परत येत होतो. खोपोलीच्या हॉटेलमध्ये दुपारचा चहा घेतला व गाडी तपासली तर ठीक होती. तेथून आम्ही निघालो. दुपारचे तीन वाजले असतील. गाडी घाट चढू लागली. पहिले टेक चढून दुसरे टेक चढणार एवढ्यात बाजूच्या झाडीतून एक इसम धावत गाडीपुढे आला व ओरडून म्हणाला, " साब, गाडी रोको, आगे मत जाव, गाडीसे धुव्वा निकल रहा है. " आम्ही सर्व आश्चर्यचकित झालो व हा काही तरी गाडी उभी करण्याचा बनाव आहे व ही लुटारूची टोळी आहे, असा एकदम आमच्या मनाचा ग्रह झाला; त्याच वेळी हे मोठे सकट आले असे सर्वांना वाटले. गाडीत सौ. सूनबाई, नातू, मुलगा असे होते. त्याच्या अगावर सोन्याचे दागिने. तेव्हा श्रीस्वामीचा मनापासून धावा केला व " यातून आम्हाला वाचवा " अशी प्रार्थना केली. बाजूला गाडी घेऊन उभी केली व बॉनेट उघडले तर आतून एकदम धुराचा लोट व भपकारा बाहेर पडला. तेवढ्यात तो गृहस्थ म्हणाला, " तुम आगे वैसेही जाते थे तो ब्रेक फेल होके गाडी खड्डे में जाकर बडा, ॲक्सिडेट होता था । तुम्हारे सब की जान खतरे में थी." हे त्याचे बोलणे खरे वाटले व आमच्या मनांतील लुटारूची कल्पना निघून गेली. हा मदतीलाच ऐनवेळी धावला व आम्हाला सकटातून वाचविण्यास श्रीस्वामीनीच याची योजना केली व आम्ही प्रार्थना केल्याप्रमाणे ते या मनुष्याच्या रूपाने धावून आले असे वाटले.

" साधकास उपदेश " या अष्टकात स्वामी म्हणतात, " तो संकटिं येई धांवोन । देई सरक्षण निजभक्ता ।। " हे शब्द अगदी खरे आहेत याची खात्री पटली.

नतर मोटारचा बिघडलेला भाग घातला व तेथून सर्वजण समाधानात निघून सुखरूप कोल्हापुरी रात्री घरी पोहोचलो. या प्रसंगाची आठवण झाली म्हणजे अजून अंगावर शहारे येतात.

● ● ●

# किती सांगू ? असं झालंय् !

— श्री. कृ. प. भिडे, रत्नागिरी.

**प्रत्येक भक्ताच्या जीवनाला पारमार्थिक दृष्ट्या काय आवश्यक आहे, याचे अचूक ज्ञान स्वामीजींजवळ होते. फक्त भक्ताला त्याची पूर्ण जाणीव नव्हती. प्राथमिक सांगण्यात स्वामीजी आपले मत देत असत. एखाद्या भक्ताने वारंवार विचारल्यास अगर आग्रह धरल्यास 'ठीक आहे' इतकेच स्वामीजी म्हणत असत.**

पूजनीय स्वामीजीच्या प्रथमदर्शनाचा योग १९५९ साली आला. स्वामीजीचा पहिला प्रश्न 'आज आपण का आला होता ? ' असा होता. माझे उत्तर 'आपल्या दर्शनासाठीच आलो होतो' असे होते. त्यानंतर एक पुस्तक वाचण्यासाठी देऊन 'आज गर्दी आहे, पुन्हा कधी तरी या' असे ते म्हणाले या पुन्हाची आठवण मला त्यानतर ८–१० महिन्यानी झाली व पांवसला पूजनीय स्वामीजीकडे जाण्याचा योग १९५९ सालात मे महिन्यात आला. त्यावेळी अनेक प्रापचिक व इतर अनंत अडचणी असूनसुद्धा स्वामीजीच्या 'आज आपण का आला होता ? ' या प्रश्नाला उत्तर म्हणून 'मी आपणांकडे केवळ मन:शातीसाठी आलो होतो, ' असे मी म्हणाल्याचे आठवते. मन:शांती हा वाक्प्रयोग इतक्या अनंत अडचणीतही मी का केला याचे मला आश्चर्य वाटते. पूज्य स्वामीजीनी त्याच वेळी बाकड्यावर बसून मला स्वत:च्या हाताने आंबे कापून फोडी दिल्याचे आठवते. एखाद्या गृहस्थाश्रमाला उचित होईल असे स्वागत स्वामीजींनी केल्याचे आठवते. आंबा कापून देत असता एक लहानशी फोड आपणही खाल्ल्याचे स्मरते. 'दुपार झाली आहे, आपण प्रसाद घेऊनच चला ' असे म्हणून त्यांच्याबरोबर पहिला प्रसाद घेण्याचा योग आला. प्रसादानतर पूज्य स्वामीजीच्या तेवढ्या सान्निध्यामुळेही दुपारी जरा पडतो तो इतकी विलक्षण शांत झोप लागली की, अर्ध्यापाऊण तासाच्या शांत झोपेनंतर डोळ्यांतून घळघळा अश्रू गळत होते. इतकी विलक्षण शांत झोप मी कधीच अनुभवली नव्हती. त्याच वेळी स्वामीजीनी मन:शांतीवरील इलाज म्हणून 'सोऽहं' ध्यान मला शिकविले व तोच अनुग्रह दिला.

पूजनीय स्वामीजी श्री. देसाई याजकडे राहात असल्याने व देसाई कुटुंबाशी आमची काहीच ओळख नसल्याने देसाई यांजकडे प्रसाद घेण्यास सुरुवातीला थोडा परकेपणा वाटत असे. त्यामुळे दुपारची वेळ चुकवून सकाळी जाऊनच स्वामीजीचे दर्शन घ्यावे व परत यावे म्हणून अनेक वेळा प्रयत्न करूनही वाटेत गाड्या बद पडणे, गाड्या उशिरा सुटणे अशा कोणत्या ना कोणत्या तरी अडचणी येऊन आम्ही पुन्हा दुपारचे भोजनाचे वेळीच जावे असा योग वारवार आल्याचे आठवते. एक वेळ तर स्वामीजीकडे सकाळीच ९–९॥ चे सुमारास गेलो. दहा–वीस माणसे बाहेर दर्शनार्थ बसली होती. त्याच्या दर्शनाचा कार्यक्रम सुरू होऊन पुरा होत आला व मी एकटाच दर्शनाचा राहिलो होतो आतील सेवेकऱ्यानी स्वामीजीना तसे सूचितही केले. पण " त्याना दर्शन आघोळीनतर होईल " असे स्वामीजी म्हणाले. हा वेळपर्यंत ११–११॥ चा सुमार झाला व पुन्हा प्रसादाचा योग आला त्यावेळेपासून पूज्य स्वामिजी व देसाई कुटुब याच्याबद्दलचा माझ्या मनातील परकेपणा पूर्ण सपून गेला. त्यानतर बाराच्या सुमारास प्रसादाकरिताच मी तेथे जात असे इतक्या १२–१५ वर्षाच्या अवधीत. स्वामीजीच्या दर्शनाव्यतिरिक्त अन्य कोठेही मी जात नसे. एकदा व्यवहारी बुद्धी आडवी आली. त्यावेळी अनेक वेळा बोलावणे आल्याने कुर्धे गावी जाण्याचे ठरविले. स्वामीजीना तसे सागितलेही. त्यावेळी स्वामीजीनी " काही तरी थोडे खाऊन जा " असे सूचित केले होते त्या दिवशी मानसिक दृष्टचा मला खूप त्रास झाला. त्यानंतर पुन्हा अशी चूक न करण्याचे ठरविले व त्याप्रमाणे ही चूक केली नाही.

पूजनीय स्वामीजीना दाखवून त्यांच्या पसतीने आपण त्या मुलीबरोबर लग्न करावे म्हणून मी आमचे भावी मेहुण्याना मुलगी स्वामीजीस दाखविण्यास सागितले होते. त्यानंतर याबाबतचे स्वामीजीचे अभिप्रायासाठी त्याच्याकडे गेलो असता, ' बाकी सर्व ठीक आहे हुडा वगैरे दुसऱ्याला त्रास न होता सहज सुखाने मिळेल तो ठरवावा ' एवढेच बोलले.

लग्न होऊन स्वामीजीच्या दर्शनार्थ गेलो असता स्वामीजीनी रामकृष्ण वचनामृत वाचावयास दिले व नेहमीच्या पद्धतीप्रमाणे पुस्तकाचे पान आम्हासच काढावयास सांगितले कामिनी काचन त्यागावरील परिच्छेद वाचण्याचा योग आला. कामिनी काचन त्यागावरील २–३ पानाचा परिच्छेद स्वामीजीनी मजकडून वाचून घेतला. इतके वाचन स्वामीजीसमोर मी पूर्वी कधीच केले नव्हते त्याचबरोबर वाचता वाचता डोळयांतून अश्रूसुद्धा इतके कधीच वाहले नव्हते सर्व वाचन पूर्ण झाले. नतर स्वामीनी एकाच वाक्यात आपली अमृतवाणी ऐकवली. " कोटी कोटी मधून एखाद्याच विभूतीला हे सहज शक्य होते. आपण डोळयांसमोर फक्त ध्येय ठेवायचे " एवढेच ते म्हणाले.

'एक दूधवाला चांगले दूध पुरवीत असतो' असे बोलण्याच्या ओघात मी स्वामीजी-जवळ बोललो. ' सुरुवातीला दूधवाला ज्या दर्जाचे दूध घालील, त्याच दर्जाचे दूध तो

शेवटपर्यंत घालीत राहील का ? ' एवढेच याबाबत स्वामीजी म्हणाले. मी म्हटले, ' माझा अनुभव त्याच्याबद्दल चांगला आहे.' त्यावर स्वामीजी काहीच बोलले नाहीत. आठ दिवसाच्या आत व्यावहारिक अनुभव असा येऊ लागला की, अखेर स्वामीजी बोलले होते तेच खरे असे वाटू लागले. निर्भेळ दूध तो कधीच पुरवणार नाही हे स्वामीजीचे मतच अखेर खरे ठरले. प्रत्येक व्यक्तीविषयी स्वामीजीच्या काही धारणा असत व त्याच खऱ्या ठरत.

पूजनीय स्वामीजीनी स्वामी स्वरूपानद सेवा मडळाचा म्हणजे लोकशाहीचा कारभार कसा चालला गेला पाहिजे याचे एक सुदर उदाहरण सागितले मडळात एकदा बसल्यानतर कोठल्याही विषयावर आपले प्रामाणिक विचार स्वतत्र असतील ते स्पष्टपणे माडल्यानतर सर्वानुमते जे काही ठरेल त्याप्रमाणे वागले पाहिजे व ठरावही एक मताचाच असावयास हवा. उदाहरणादाखल शरीर यत्रणेचे कामाबद्दल उदाहरण दिले. एकदा आपण विशिष्ट काम करण्याचे ठरविले की, मग ज्याप्रमाणे शरीर यत्रणेचे हात, पाय, डोळे, कान, नाक वगैरे अवयव आपआपली कामे एकमेकाना विरोध न करता पूरक होतील अशी करतात व कार्य घडते. तसेच मडळाचे काम चालले पाहिजे असे त्याचे म्हणणे होते.

एखाद्याला काही सागावयाचे असल्यास स्वामी इतक्या सहजतेने शब्द वापरीत की, ऐकणाऱ्याला स्वामीजीना नेमके काय म्हणावयाचे आहे याचे पुष्कळदा आकलनच होत नसे. ती गोष्ट ऐकणाऱ्याला समजेपर्यत स्वामीजी मग त्याचाच पाठपुरावा करीत. त्यात कोठलाच आग्रह नसे. मडळ काढण्याचे सुरुवातीपासूनच मी मडळ काढण्याच्या अगदी विरुद्ध होतो. कारण मडळासारखा व्यवहार परमार्थात कशाला पाहिजे ? हे माझे मतभेदाचे कारण. स्वामीजीना ही गोष्ट आधीच कोणामार्फत तरी कळली होती. मी महिन्यातून ज्यावेळी दर्शनास जाई, त्यावेळी स्वामीजी सज्जनगड, जीवनविकास पुरुषार्थ वगैरे अक उघडून त्यात दिलेली मडळे सेवावृत्तीने कशा प्रकारे कार्य करतात ते मला दाखवीत. हे माझ्या मनाविरुद्ध असल्याने मी थोडा नाखूष होई.

तिसऱ्या महिन्यात दर्शनार्थ गेलो असताना तिसराच अक काढून देऊन हे मडळ कार्य करते पहा एवढेच दाखविले ! तिन्ही वेळेला मडळ हाच विषय होता. पण तिन्ही वेळी माझी समज पडली. स्वामीजीना मी मडळात काम करावे असे सूचित करावयाचे होते व मी मंडळात काम करू लागल्यापासून स्वामीजी मंडळ या विषयावर कधीच बोलले नाहीत. तिन्ही वेळेला ' तुम्ही मंडळात काम करावे ' असे शब्दानी मला त्यानी केव्हाच सागितले नाही. सर्वसाधारण माझ्यासारख्या दर्शनार्थ जाणाऱ्या भक्ताला पूजनीय स्वामीजीसारख्या सताची शिकवण लक्षात आणणे फारच कठीण होते. मलाही तसाच अनुभव येत होता.

पूजनीय स्वामीजीच्या घराचे दुरुस्तीचे काम चालू केले होते व त्यासाठी सुमारे १०–१२ सिमेंट पिशव्या लागतील असा अंदाज श्री. भाऊराव देसाई यानी

व्यक्त केला होता. सिमेटचा खर्च मी करणार व इतर सुतार मजुरी वगैरे खर्च श्री. भाऊ करणार असे ठरविले होते.काम वाढता वाढता १२ ऐवजी ४४ सिमेंट पिशव्या लागल्या. खर्चाचा बोजा मजवर जास्त पडत आहे, हे लक्षात घेऊन स्वामीजीनी गडी मजुरी सुतार मजुरी वगैरे कामेही बरीच वाढली आहेत, हे कागदावरून माझ्या लक्षात आणून दिले. बारीक सारीक व्यवहारसुद्धा स्वामीजी ततोतत पाळीत असत हे यावरून दिसून येते.

पूजनीय स्वामीजीजवळ विवेकानदाची व्याख्याने वाचावीत अशी स्वामीजीनी मला अनुज्ञा द्यावी अशी इच्छा वारवार मी स्वामीजीजवळ व्यक्त करीत होतो. पहिल्या प्रथम २-३ वेळेला रामकृष्ण वचनामृत किवा अन्य अशीच एक दोन पुस्तके वाचावयास दिली तरी माझी ओढ विवेकानदाची व्याख्याने वाचण्याबद्दल कमी झाली नाही, मी स्वामीजीना तोच प्रश्न केला. व्याख्याने वाचू का ? वारवार विचारल्याने शेवटी थोडेसे नाइलाजाने 'ठीक आहे' असे ते म्हणाले ती व्याख्याने वाचून माझा बुद्धिवाद वाढला, पण मन.शाती लाभली नाही. प्रत्येक भक्ताच्या जीवनाला पारमार्थिक दृष्टचा काय आवश्यक आहे याचे अचूक ज्ञान स्वामीजीजवळ होते. फक्त भक्ताला त्याची पूर्ण जाणीव नव्हती. स्वामीजीच्या प्राथमिक सागण्यामध्ये स्वामीजी आपले मत देत असत. एखाद्या भक्ताने वारवार विचारल्यास अगर आग्रह धरल्यास " ठीक आहे " इतकेच स्वामीजी म्हणत असत पण असे बोलणे हेच त्याचे मत नसे.

स्वामीजीना गुलाबाची फुले फार आवडत असत. स्वामीजीच्या खोलीमध्ये असलेल्या देवस्थानच्या आसपास खोलीत गुलाबाचे ताटवेच्या ताटवे लागून पडावेत अशी स्वामीजीनी एकदा इच्छा प्रदर्शित केली होती. इतकी गुलाबाची फुले त्याना आवडत असत मी एकदा ५ गुलाबाची फुले देठासह त्याच्यासमोर ठेवली होती. स्वामीजी स्वत.च्या हाताने देठ खुडत होते, तेव्हा थोडासा काटा त्याच्या हाताला लागला. मी म्हटले, 'मी देठ खुडून देतो.' त्यावेळी हातानेच त्यानी नको सागून 'गुलाब पाहिजे तर काटे लागायचेच ' असे म्हणून फूल रामकृष्णांच्या तसबिरीला वाहिले.

एका मोठ्या लेखकाचे भेटीत त्याला कमी ऐकू येत असल्याने तो स्वामीजीना म्हणाला, ' जरा मोठ्याने बोला, मी बहिरा आहे. ' तोडावर हात ठेवून लगेच स्वामीजी म्हणाले, ' मी मुका आहे. ' स्वामीजीच्या एकाच वाक्याने तो लेखक मनमुराद हसला.

स्वामीजीची सप्रेम भेट म्हणून साखरेची मोठी पुडी मिळावी अशी इच्छा मनात केली होती. त्याप्रमाणे ती मिळाली व माझ्या यात्रेमध्ये प्रत्येक देवदर्शनाचे वेळी ठिकठिकाणी दोन दोन खडे स्वामीजीचे म्हणून ठेवले जावेत असे मनात होते. पण सदरहू पुडी मी नेहमी विसरायचा. खुद्द वाराणशीला दोन–तीन दिवसाचा मुक्काम असता सुद्धा ती पुडी नेण्याचे विसरलो. इतकेच काय पण कलकत्त्यात कालीमातेच्या मंदिरात खिशात पुडी असूनसुद्धा साखरेचे खडे ठेवण्याचे विसरलो व त्यानंतर राम-

कृष्णांच्या मंदिरात गेलो त्यावेळी या साखरेच्या पुडीशिवाय रामकृष्णांना ठेवण्यासारखे मजजवळ दुसरे काही नव्हते. व तिथेच ती पुडी ठेवण्याचा योग आला. आणखी आश्चर्य म्हणजे १०–२० वस्तू रामकृष्णांच्यापुढे ठेवल्या होत्या. त्यातील फक्त हीच पुडी पुजाऱ्याने उचलून आत नेली. स्वामीजीचा व रामकृष्णाचा जिव्हाळ्याचा सबंध होता हे मला माहीत होते, पण यामुळे खात्रीच झाली.

पूजनीय स्वामीजीजवळ आपले म्हणणे काय आहे हे स्वतत्रपणे माडणे स्वामीजीना पसत होते. अशाच एका प्रसगी इतर सर्व ज्येष्ठ सहकारी व मी यामध्ये विचारभिन्नता होती. एका बाजूला मी एकटाच होतो सदरहू आमच्या सर्व मडळीचे बोलणे बाहेरच्या ओटीवरच होत असल्याने स्वामीजी ऐकत होते आतून मलाच बोलाविले गेले व स्वामीजीनी मला २–३ प्रश्न विचारले व गणितात पकडले ५०० पाने जेवावयास किती वेळ लागेल ? हा त्याचा प्रश्न मी लगेच उत्तर दिले, ‘अर्धा तास लागेल’ ‘मग ६००० माणसे प्रसाद घेऊन जायची झाली तर किती वेळ होईल ?’ हा त्याचा दुसरा प्रश्न. अर्थातच हिशेब करून ६ तास लागतील असे सागणे भाग पडले. सुमारे साडेअकरा वाजता प्रसाद वेळ सुरू होऊन ५–६ वाजेपर्यंत हे सर्व उरकेल असे स्वामीजी म्हणाले. स्वामीजीच्या मोजक्या प्रश्नाच्या गणितामध्ये मी पूर्णपणे सापडलो होतो. पण स्वामीजीना मी इतकेच म्हणालो की, ‘मी आपल्या गणितात सापडलो, पण व्यवहारात सापडणार नाही मी म्हणतो असाच व्यवहार सुखकर होईल’ त्यानतर घडलेल्या घटनाचा कागद तयार करून स्वामीजीजवळ दिला. स्वामीजीनी एकच प्रश्न विचारला. ‘सदरहू कागदाची नक्कल सस्थेजवळ दिली आहे ना ?’ मी ‘होय’ म्हटले. स्वामीजी समोर आत्मविश्वासाने बोलणाऱ्या भक्ताचे कौतुकच होत असे.

स्वामीजीच्या दर्शनाला जायच्या वेळी अनेक प्रश्न विचारावे असे वाटत असे. पण खोलीत गेल्यावर त्याचे मौनामध्येच अगर सोऽह ध्यानामध्ये अगर एखादे पुस्तक देऊन ते वाचण्यामध्येच प्रश्नाची उत्तरे असत. याचे अनुभव अनेकाना आहेत तसेच ते मलाही आहेत सद्‌गुरू आपली नेहमीच काळजी वाहात असतात. फक्त भक्तालाच त्याची नेहमी जाण नसते.एका कठिण प्रसगी कोल्हापूरला सौभाग्यवती ऑपरेशन टेबलावर व मी एकटाच बाहेर. अशा वेळी आल्या प्रसगाला तोड देण्यासाठी मजबरोबर कोणीच नाहीत का ? असा स्वार्थी विचार मनात आला व डोळ्यांतून पाणी येणार तोच सद्‌गुरूचा साक्षात्कार लगेच झाला. व तोच खोलीत दरवळणारा वास व तीच प्रसन्न मुद्रा व कृपेचा वरदहस्त पाहून पुन्हा रडू कोसळले.आपणास जरी सद्‌गुरूची आठवण नसली तरी सद्‌गुरू आपले पाठीराखे कायमचे असतात हे अनुभवास आले.

बारा वर्षांत जे कधीच वाटले नाही ते वाटून सद्‌गुरूचे उच्छिष्ट अन्नग्रहण करावे असे वाटले व त्याप्रमाणे प्रसाद घेतलाही. स्वामीजीना असे केलेले विशेष पसंत

नसे. उच्छिष्ट अन्न याचा अर्थ उष्टे अन्न असा नव्हे तर त्यांच्याकरिता शिजवलेल्या अन्नापैकी त्यांनी प्रसाद घेऊन राहिलेले अन्न असा अर्थ ते करीत असत. त्यानंतर तसे शिल्लक राहिलेले अन्न प्रसाद म्हणून घेत असत. व तेवढ्याच अन्नावर राहत होतो. मला आश्चर्य वाटते की, तेवढ्या अन्नानेही माझी भूक भागत होती व त्या अन्नाचा परिणाम म्हणून मला त्याचा इतरही उपयोग बराच झाला.

• • •

# फुलला गुरूस्मृतींचा हा रम्य सोनचाफा !

-- कुमारी कमल (तथा माई) पण्डित, वेंगुर्ला

सद्गुरु स्वामी स्वरूपानदाच्या प्रथम दर्शनाचा शुभयोग मला डिसेंबर १९७१ मध्ये आला. त्यावेळी मी माझे मामा ती. स्व. वैकुठराव पडवळ, वेंगुर्ला यांच्याकडे नुकतीच राहावयास आले होते. माझे मामा ह्यापूर्वी पाचसहा वर्षे पांवसला स्वामीच्या दर्शनाला वर्षातून दोन वेळा तरी जात असत. त्यावेळी स्वामी त्यांना प्रत्येक वेळी 'प्रसादभेट' म्हणून 'अभग-ज्ञानेश्वरी, सजीवनी गाथा, आत्मप्रभा, सिद्धचरित्र' वगैरे ग्रथ देत असत.

मी सन १९६९ मध्ये मुबईहून अशीच मामांकडे राहावयास आले असतांना स्वामी स्वरूपानदानी लिहिलेली 'अभग-ज्ञानेश्वरी' अगदी मननपूर्वक वाचली. तसेच याच साली प्रसिद्ध झालेला 'दीपलक्ष्मी'चा 'स्वरूपानद-विशेषाक' माझ्या वाचनात आला साहजिकच मला ह्या थोर सत्पुरुषाच्या दर्शनाची ओढ लागली. पण त्यावर्षी पावसला जाण्याचा योग नव्हता.

पू. मामाचे पांवसला बरेच वेळा जाणे येणे असल्याने तेथील सर्व ज्येष्ठ मडळीशी साहजिकच त्यांचा परिचय झाला होता. पावसला दरवर्षी स्वामी स्वरूपानंदांच्या गुरुवर्यांच्या पुण्यतिथीनिमित्त अभंग ज्ञानेश्वरीचा सप्ताह होत असे. सन १९७१ मध्ये मामाना वाटले वेंगुर्ल्यातही ह्या ग्रंथाचा सप्ताह व्हावा. ह्यासबंधी स्वामीजवळ ही सदिच्छा प्रकट करताच त्यांनी आशीर्वादपूर्वक संमती दिली.

अशा रीतीने कार्तिक महिन्यात वेंगुर्ला येथे सप्ताह आयोजित करण्यांत आला. स्वामीजीनी सप्ताहासाठी लागणारी ग्रथसामुग्री, आसने व सप्ताह कशा पद्धतीने करावा याची माहिती देणारा नकाशा वगैरे सर्व सामान एका पेटीत घालून व मार्गदर्शनासाठी डॉ. मिराशीना पाठवून त्यांच्या बरोबरच ही पेटी पाठविली.

माझ्या बरोबर काही स्त्रियाही सप्ताहास बसण्यास उत्सुक होत्या. त्यात कु. रजनी ठाकूर हिचा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल. कारण डॉ. मिराशींना तिचे

व माझे वाचन इतके आवडले की त्या आवडीतूनच मला व कु. रजनीला पांवसला स्वामींच्या प्रथम दर्शनाचा योग आला.

आमचा हा सप्ताह उत्कृष्टपणे पार पडला. समाप्तीनंतर डॉ. मिराशींनी वेंगुर्ले येथील सप्ताहाची इत्थभूत माहिती स्वामीना निवेदन केली. इतकेच नव्हे तर त्यांनी आमच्या दोघीच्या वाचनाची इतकी तारीफ केली की ते ऐकून स्वामीनाही अतिशय आनंद झाला. त्यानंतर त्याच्याच प्रेरणेने उत्सवातील सप्ताहास हजर राहाण्याची सधी आम्हा दोघीस मिळाली.

आम्हालाही स्वामीच्या दर्शनाची उत्सुकता होतीच. आम्ही दोघी पांवसकडे प्रथमच जात होतो. पण प्रवासात यत्किंचितही डगमगलो नाही. रत्नागिरीला आल्यावर पुढील प्रवास कसा करावयाचा हे मला काहीच सुचेना. पण योगायोगाने पांवसलाच जाणारी सोबत आम्हाला मिळून ह्या आमच्या अडचणींचे स्वामीनीच निवारण केले. मनात आले की अजून त्याचे दर्शन जरी झाले नाहीं तरी त्याचे संरक्षण पाठीशी आहे.

आम्ही मुक्कामी पोहोचलो तेव्हा पुण्याच्या सौ. रत्नप्रभा वैद्य जेवणखाण करून आश्रमात विश्रांति घेत पडल्या होत्या. त्यांनी उत्सुकतेने आम्हा दोघीस विचारले, "काय, तुम्ही सप्ताहासाठी आलात काय?' आम्ही होकार देताच त्याच्या मुद्रेवर इतका आनद ओसडत होता की विचारू नका. कारण अजूनपर्यंत सप्ताहासाठी त्याच्या-खेरीज कुणीच स्त्री आली नव्हती म्हणून त्या बऱ्याच निराश झाल्या होत्या. त्याबाबत स्वामीपुढे त्यानीं आदल्या दिवशीच आपली खिन्नता प्रकट केली होती. त्यावर स्वामी त्याच्याकडे पाहून खळखळून हसले व म्हणाले, " उद्यापर्यंत सप्ताहाला कोणी तरी येतील. "

आमच्या आगमनाची चाहूल स्वामीना आदल्या दिवशीच लागली होती. दुपारी चार वाजता मला व रजनीला स्वामींनी आत बोलावले. तेव्हा ते गादीवर बसले होते. त्याची ती प्रसन्न मुद्रा, तेजस्वी व्यक्तिमत्व, काळेभोर डोळे व कापरा-सारखी काति पाहून आम्ही अवाक् झालो. काही बोलणेच सुचेना. जवळच श्री. नाना संसारे त्याच्या एका खाद्याला अलगद हाताने धरून उभे होते.

आम्ही नारळ, फळे व फुले त्याच्या समोर ठेवली व गादीला डोके टेकून नमस्कार केला. स्वामीनी अत्यत क्षीण पण मृदु आवाजात आमची चौकशी केली. प्रथम ते म्हणाले, " तुम्ही सप्ताहासाठी आला आहात ना ? तेथे ( वेंगुर्ल्यास ) वाचन केले म्हणून तुम्हास येथे यावेसे वाटले काय? प्रवासात त्रास झाला नाही ना ? " वगैरे पाचसहा वाक्ये ते हळूवार बोलत होते की त्याच्या प्रत्येक शब्दाच्या श्रवणाने आम्ही सात्त्विक सुखाचा आस्वाद घेत होतो. त्याचा आवाज क्षीण प्रकृतीमुळे इतका खोल गेला आहे याची पूर्वी मला यत्किंचितही कल्पना नव्हती; पण त्यांच्या त्या अमृतमय

पुरचुडीतील पोह्याची मागणी केली असता त्याला जो अवर्णनीय आनंद झाला तसाच आनंद स्वामींनी माझ्या जवळील वस्तु मागतांना मला झाला.

मी त्याना मोसबी, बकुळीची फुले अर्पण केली व पंचधातूची गणपतीची मूर्तीही दिली. ती मूर्ति पाहून त्याच्या मूळच्या प्रसन्न चर्येत आणखीनच भर पडली. ती मूर्तीची पेटी पाहून त्यानी आपल्या उशाशीच ठेवून दिली. अजूनही ही पेटी स्वामीच्या गादीवर ठेवलेली आहे.

एक वर्षाच्या वास्तव्यात माझ्या बऱ्याच स्वामीभक्ताशी ओळखी होऊ लागल्या. त्यातील काही भक्तानी मला स्वामीचा अनुग्रह घेण्यास सुचविले. असेच एक सुविद्य भक्त व त्याच्या सौ. नी मला स्वामीचा अनुग्रह घेण्याचा तगादा लावला. मी त्याना म्हटले, "मला स्वामीचा अनुग्रह घेण्याची उत्कट इच्छा आहे. पण काय करूं ? मी पूर्वी एका दत्तभक्ताकडून अनुग्रह घेतला आहे. त्याना मी गुरू केल्यावर हे स्वामी मला अनुग्रह कसा देतील ? शास्त्रात तर एकच गुरू करावा असे म्हटले आहे. माझी तर द्विधा मन.स्थिती होते "

त्यावर ती दोघं म्हणाली, "अग मुली, तू तर पूर्वी एकच गुरू केला आहेस; पण आम्ही पाच गुरु केले आहेत. " तरी सुद्धा आमच्या मनाला शाति मिळाली नाही. म्हणून आम्ही स्वामीजवळ येऊन त्याच्याकडे अशी करुणा भाकली की " आम्ही सर्वत्र फिरून अगदी होरपळून गेलो आहोत आता यातून तुम्हीच आमची सुटका करा."

त्यावर स्वामी त्याना म्हणाले, "तळमळी पोटी मनुष्य भटकत असतो." शेवटी स्वामीच्या कृपाशीर्वादाने त्याना मन शाति लाभली हे सागणे नलगे !

त्याचे हे बोलणे ऐकून मलाही अनुग्रह घेण्याची उत्सुकता लागली. स्वामीनी मला गुरुवारी अनुग्रह द्यावा अशी मनोमन प्रार्थना मी करीत होते मी श्री. मोहन गोडबोले याना वारवार माझ्या अनुग्रहाविषयी स्वामीना विचारून पहा, अशी विनवणी करीत असे माझा हा हट्ट पाहून एके दिवशी गोडबोले मला म्हणाले, "बर, मी आताच स्वामीना विचारतो. मी ओटीवरच बसून राहिले. स्वामीकडून काय उत्तर येते याची मला उत्कठा लागून राहिली होती. पण मोहनने माझी निराशाच केली. ते म्हणाले की "तुला वर्षभर येथे रहावयाचे ना, मग आताच अनुग्रहाची घाई का?" त्याचे हे उत्तर मला अनपेक्षितच होते. कदाचित मोहनला माझी अनुग्रह घेण्याची उत्सुकता थोडी जोखायची असेल शेवटी खोलीत जाण्याची सधी मिळताच मीच स्वामीना अनुग्रहाविषयी विचारले. ते माझा शुद्ध भाव जाणून म्हणाले, " सागतो..... सागतो.... "

मला अतिशयच आनद झाला. माझे मनोगत जाणून त्यानी मला ८ फेब्रुवारी १९७३ माघ शुद्ध पचमीस अनुग्रह देऊन कृपाकित केले; माझ्या इच्छेप्रमाणे त्या दिवशी गुरुवारच होता !

।। ॐ ।।

# सोऽहम्



श्रीमत् सच्चिदानंद सद्गुरु स्वामी स्वरूपानंद

**' चैतन्य निजधाम–समाधि '**

श्रीक्षेत्र पांवस

माझ्या पांवस येथील वर्षभराच्या वास्तव्यात मी पहिले पाचसहा महिने श्री. देसाई याच्या घरी झोपत असे. ठीक ९।। वाजतां सर्व दिवे बद करून झोपण्याची वेळ असे. मी श्री देसाई याच्या घरात अगदी नि:सकोचपणे वावरत असे. त्याच्या ज्येष्ठ भगिनी ताई ह्या जुन्या वळणाच्या असल्याने त्याचे सोवळे ओवळे फार असे. पण त्या मला म्हणायच्या, "तू सारस्वत आहेस खरी तरीपण एक वर्षभर येथे राहून स्वामीची तू सेवा करणार आहेस म्हणून तुला सर्व माफ आहे."

ताई मला म्हणायच्या, " स्वामी तस सोवळ ओवळचावर जास्त भर देत नाहीत. ते पहातात भक्ताचा शुद्ध भाव. तुझे पारमार्थिक भाग्य फार थोर आहे. म्हणूनच स्वामीनी तुला येथे ठेवून घेतली आहे. स्वामीना पारायणाचा नदादीप तुझ्याकडूनच लावायचा आहे म्हणूनच तुला येथे आणली आहे"

स्वामीना सर्वजण अप्पाच म्हणत असत. त्याचे ऐकून मीही त्याना अप्पा म्हणे अप्पाचे जेवणखाण ताई म्हणजे आत्याबाई करीत अगदी बारीक शुभ्र तादळाचा भात, पडवळाच्या नुसत्या उकडलेल्या दोन तीन फोडी, आमसोलाचे सार व थोडासा ओवा असा सात्त्विक आहार असावयाचा. जेवणाचे ताट देसायाची सून सौ. शुभागी किवा माधुरी वहिनी खोलीत नेत असत. जेवणाची वेळ झाल्यावर बेल वाजत असे.

ताट खोलीत येण्यापूर्वी काही क्षण अप्पा अगोदरच हातात खडीसाखरेचा प्रसाद घेऊन ठेवीत. ताट आणणाऱ्याना अशी सूचना असे की ताट टेबलावर ठेवल्यावर आधी प्रसाद घेऊन मगच त्याना नमस्कार करावा. ताटात वाढलेल्या अन्नापैकी अर्धे जेवणच अप्पा ग्रहण करीत अगदी अल्प आहार ग्रहण करण्यास त्याना जवळ जवळ अर्धा तास तरी लागे कारण प्रत्येक घास घेताना ते 'ॐ ॐ' असा उच्चार करीत. सर्व सामान्य लोक ते जेवण एका घासातच फस्त करतील. परतु अप्पाचे सर्व व्यवहार अलौकिक !

रात्री एखादे वेळी पोटात त्रास होत असल्यास कधी १२ वाजता तर कधी दोन वाजता ताईना आतून मात्रा उगाळण्याबद्दल निरोप येई. ताई तितक्याच तत्परतेने आपल्या प्रकृतीमानाचा विचार न करता भरभर मात्रा उगाळून देत. मीही ताईजवळच झोपत असे मलाहि त्यावेळी जाग येई व अप्पाच्या क्षीण प्रकृतीविषयी काळजी वाटे. एकएकदा अप्पाच्या प्रकृतीमानाकडे पाहून ताई गहिवरून म्हणत असत की अप्पाना ह्या देहाच्या खूप यातना होतात. केवळ भक्तासाठीच ते देहात वावरत आहेत. एखाद्या वेळी अप्पाची प्रकृति ढासळली म्हणजे देसायाच्या घरात दळणकाडण वगैरे घरगुती व्यवहार बद ठेवण्यात येत असत

आम्ही पारायणाला बसताना सकाळी आठ वाजता सद्‌गुरूचे दर्शन घेऊन जात असू. भक्ताची खूप गर्दी असल्यास क्वचित आम्हाला बाहेरून दर्शन होई. पारायणाला

मोजकेच साधक असल्यास सबंध आठवडाभर आम्हाला आतूनच दर्शन मिळे. आतून दर्शन होताना क्वचित प्रसंगी ते पारायणाबद्दल चौकशी करत. " तुझी किती पारायणे झाली ? आसनावर कोण बसले आहे ? तुला कंटाळा आल्यास घरी जाऊन परत थोड्या दिवसानी आलीस तरी चालेल " अशा मोजक्या शब्दात ते विचारपुस करीत.

प्रत्येकाला दिवसातून एकच वेळ दर्शन मिळे. सकाळी दर्शन घेऊन समाधान झाल्याने एके दिवशी " सध्याकाळी वाचन सपल्यावर मी खोलीत येऊ काय ? " म्हणून शरद पडितला अप्पाना विचारण्यास पाठविले. त्याच्या समतीने मी आत गेल्यावर एकदम चारपाच वाक्यं मी त्याच्याशी बोलण्याचा प्रयत्न केला, पण त्याला उत्तर देताना व माझे बोलणे ऐकून त्याना लगेच शीण आला असावा कारण शरदकडे हाताने प्रसाद मागून घेऊन त्यानी हस्तस्पर्श करून मला दिला. मी मुकाट्याने खोली बाहेर गेले व दिवसातून एकदा दर्शन घेतल्यावर पुन्हा दर्शन घेऊन त्याना त्रास न देण्याचे मी ठरविले

ज्यावेळी मी खोलीबाहेरून दर्शन घेई, त्यावेळी अप्पा झोपल्या ठिकाणाहून मान वर उचावून माझ्यावर दृष्टिक्षेप टाकीत असे कैक वेळा मी अनुभवले किवा माझा नबर येताच ते आपल्या देहाची हळूवारपणे हालचाल करीत, त्या हालचालीतून त्याचे माझ्यावर पूर्ण लक्ष व कृपा आहे याची पुरेपूर जाणीव मला होई. त्याच्या ह्या विशिष्ट दर्शनातून माझ्या अगात फार शक्ति आल्यासारखे वाटे.

सुरूवातीला अप्पा हे देसायाच्या घरातील मडळीकडून एखादा अभग म्हणवून घेत. एकेकदा सौ. माधुरी वहिनीनी स्वामीना सजीवनी गाथेतील एखादा अभग ऐकविण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली. त्यावर ते म्हणाले की, " आता मला श्रवण करण्याची सहनशक्ति राहिली नाही " तसेच रात्री बराच वेळ व्यावहारिक गोष्टी संबधी साधकाने चर्चा केल्याम त्याना लौकर झोपण्याविषयी खोलीतून सूचना मिळे. अति गडबड करणाऱ्यास ते मौनही पाळण्यास सागत

खोलीत सेवेला असणाऱ्या मुलानी त्या त्या वेळेस हजर राहून आपली ड्युटी बजावलीच पाहिजे असा त्याचा कटाक्ष असे खोलीत कोणी साष्टाग नमस्कार घालू नये व न विचारताच अकस्मात कोणी खोलीत येऊ नये असा त्याचा दडक असे याबाबत अप्पा एका सेवकाजवळ बोलले होते " की लहान मुले एकदम खोलीत आल्यास मला बिलकूल त्रास होत नाही पण मोठ्यानी एकदम खोलीत प्रवेश केल्यास माझी नाडी जलद चालते " लहान मुलाच्या बुद्धीला फाटे नसतात तेथे सकल्प विकल्पाना जागाच नसते," हेच त्याचे कारण असेल.

खोलीत ज्यावेळी कनिष्ठ वयाचे सेवक असत त्यावेळी त्याच्याशी अप्पा अधुनमधून आध्यात्मिक चितन करीत. भावार्थगीतेतील १२ व्या अध्यायातील " मुक्ती-

वरची भक्ति साधुनि जगी धन्य तो होई. " या साकीवरील थोडेसे चितन त्यानी शरद पंडितजवळ प्रकट केले होते.

अप्पा तर प्रतिज्ञानेश्वरच होते. याचा स्पष्ट पुरावा त्याच्याच बोलण्यावरून एकेकदा सिद्ध होई. अप्पाची प्रकृति तोळामासा असली तरी त्याचे नित्याचे व्यवहार नियमितपणे चालू असत प्रकृतीला कितीही क्षीणता आली तरी ते सहसा स्नान कधी चुकवत नसत. स्नानाच्या वेळी मोहन गोडबोले त्याच्या खोलीत असे. असेच किरकोळ स्वरूपाचे दुखणे आल्याने दोन दिवस आघोळ करण्याचे राहून गेले. मोहन म्हणाले, " अप्पा, तुमची दोन दिवस आघोळ झाली नाही " त्यावर किचित् स्वस्थ राहून ते म्हणाले, " झाली नाही हे खरे पण सातशे वर्षात दोन दिवस काहीच नाही. " असा खुलासा देऊन श्रीज्ञानेश्वर महाराजाशी आपली एकरूपता त्यानी निदर्शनास आणून दिली

मिळकतीपेक्षा उगाचच जास्त गरजा वाढवून अवास्तव खर्च करणे त्याना पसत नसे. ज्याना ५०० रुपयात घरखर्च भागवणे शक्य नसे त्याना त्याना स्वामीजी विचारावयाचे, " शभर रुपयेच मासिक उत्पन्न आहे ते कसा ससार करत असतील ? "

पण लहान वयात मुलाच्या ज्या आवडीनिवडी असतील त्या ते मोठ्या हौसेने पुरवीत असत. उदाहरणार्थ, कधी धार्मिक चित्रपट अगर नाटक किवा एखादे उची कापड घ्यावेसे वाटल्यास ते सेवकाना तशी छोटीशी रक्कम देत कोणत्या ना कोणत्या प्रकारे शक्यतो लहान वयात शुभ सस्कार व्हावेत याची ते दक्षता घेत याच हेतूने शेवटी शेवटी मेघ जसा वर्षाव करताना सुपीक जमीन, खडकाळ जमीन वगैरे न बघता वर्षाव करतो त्याप्रमाणे अगदी दोन वर्षाच्या मुलानाहि अनुग्रह देऊन त्याना त्यानी कृतार्थ केले.

गुरुसेवा करताना आश्रमातीलही काही कामे सेवा म्हणून स्वेच्छेने करावीत यावर त्याचा कटाक्ष असे. एकदा अविनाश खातू नावाच्या मुलाला जवळ बोलावून त्याला अप्पा म्हणाले, " तुला एक काम जमेल काय ? " तो म्हणाला, " कसले ? " त्यावर अप्पा म्हणाले, " आश्रमात बडू एकटाच काम करतो सध्या आश्रमात भक्ताची खूपच गर्दी आहे. तरी बडूला पाट पाणी ठेवायला तू मदत कर."

मलाहि अप्पानी एकदा स्वयंपाकीणबाई बरोबर पोळ्या करण्यासाठी मदत करण्यास सुचविले.

मी १९७३ मध्ये पावसला असताना अप्पाचे प्राणशिष्य स्वामी सत्यदेवानद सरस्वति हेही एक वर्षभर पावसला होते. अप्पाचा त्याच्यावर फार जीव. मुख्यतः अप्पानी त्याच्यासाठी " तपोवन " बांधले होते. स्वामी सत्यदेवाना अप्पा स्वत.च्या जेवणापूर्वी थोडा वेळ अगोदर गादीवर बसून दर्शन देत. त्याच्यासाठी साधारण दुपारी बारा वाजता दर्शनाची वेळ ठरलेली असे. एखादे दिवशी स्वामीसत्यदेवाना तपोवनातून

यावयास उशीर झाला म्हणजे अप्पा येथे कासावीस होत. ते आतील सेवकाजवळ सारखी चौकशी करीत–"स्वामी कसे अजून आले नाहीत ?" जसे नरेन्द्राची बरेच दिवस भेट झाली नाही म्हणजे रामकृष्ण अगदी व्याकूळ होत असत, त्याचप्रमाणे स्वामीजीची वेळेवर भेट झाली नाही की अप्पाचा जीव खालीवर होई.

एकदा बाबूराव देसाईकडून अप्पाच्या खूप जुन्या आठवणी ऐकावयास मिळाल्या. ते म्हणाले की, "स्वामी सत्यदेवानी प्रथम भेटीच्या पूर्वी म्हणजे १९६६ साली अप्पांना संस्कृतमधून पत्र लिहिले होते. त्याचे हस्ताक्षर पाहून ते इतके खूष झाले की त्याचे पत्र सर्वांना दाखवून ते म्हणाले की, 'ह्या मुलाचे अक्षर पहा किती वळणदार आहे.'"

पुढे बाबूराव म्हणाले की, "स्वामी सत्यदेवानदाना प्रथम पाहिल्याबरोबर अप्पा काही वेळ समाधीत मग्न झाले होते. रामकृष्णानी नरेन्द्राला प्रथम पाहाताच त्याचीही अशीच अवस्था झाली होती."स्वामी सत्यदेवानद खोलीतून बाहेर गेल्यावर अप्पा बाबूरावाना हात वर करून म्हणाले की "हा मुलगा तीन वर्षे माझ्याजवळ राहील तर खूप खूप मोठ्ठा होईल" अशा रीतीने स्वामी सत्यदेवानदाची पारमार्थिक योग्यता एका क्षणातच अप्पानी ओळखून आपला आध्यात्मिक वारसा त्याच्याकडे सोपविण्याची खूणगाठ त्यानी बाधली.

अप्पाची रामकृष्ण परमहसावर गाढ श्रद्धा होती. किबहुना अप्पा हेच रामकृष्ण परमहस होते रामकृष्ण व अप्पा याच्या निकटच्या सबधाची प्रचीति अनेक साधकाना आली आहे.

समाधी घेण्यापूर्वी काही दिवस अगोदर एके रात्री अप्पा स्वमुखाने असे म्हणाले होते की, "मी राम आहे, मी कृष्ण आहे, मी रामकृष्ण परमहस आहे" असे स्पष्ट सागून त्यानी रामकृष्णाशी एकरूपता दाखविली होती. एकदा देसायाची दोन वर्षाची नात बेलूरच्या मठात आपल्या आईवडिलाबरोबर गेली असता रामकृष्णाचा पुतळा पाहून एकदम "हे पहा आमचे अप्पा" असे म्हणाल्याचे माझ्या ऐकिवात होते.

रामकृष्णानी आपल्या शिष्याना समाधिकाळाच्या पूर्वी असे सागितले होते की, मी आता २०० वर्षानी पुन्हा अवतरणार आहे परतु १०० वर्षाच्या आतच अप्पाच्या रूपात श्रीरामकृष्ण प्रकट झालेत हे कोणीही नाकबूल करणार नाहीत. अप्पाकडे येणारे बहुसख्य भक्त रामकृष्णाचेच उपासक असावयाचे

माझ्या एक वर्षाच्या वास्तव्यात स्वामीशी अगदी मोजक्या शब्दात काही तरी पारमार्थिक चितन करण्याची, त्याना एखादा अभग ऐकविण्याची अगर ज्ञानेश्वरीचे अल्प वाचन करण्याची सुसधी मला कधीच मिळाली नाही माझी ज्ञानेश्वरी वाचण्याची पद्धत बहुतेक सर्वांना आवडे शुद्ध व सुस्पष्ट उच्चार व अर्थानुकूल वाचन असावे यावर अप्पा भर देत. माझ्या स्पष्ट व शुद्ध वाचण्याबद्दल इतराकडून त्यानी बरेच वेळा ऐकले

होते. कारण श्रीज्ञानदेवीची पारायणे आश्रमात होणार होती. त्यावेळी ते मला म्हणाले की, " मूळ ज्ञानेश्वरी वाचताना एकदा तरी तो ग्रथ नीट वाचला पाहिजे. पण तू त्याला अपवाद आहेस."

आमच्या काही पारमार्थिक शका असल्यास स्वामी सत्यदेवानंदाकडे जाण्यास ते आम्हास सुचवीत. त्याच्या सान्निध्यात राहून आम्ही विवेकाचे व वैराग्याचे धडे घ्यावेत अशी त्याची मनापासूनची अपेक्षा असे.

साधकाने नेहमी प्रसन्न असावे असे ते म्हणत. एकदा शारीरिक व्यथानी सत्रस्त झालेली एक स्त्री अप्पाकडे येऊन आपली कहाणी सागत होती. आप्पा 'आशीर्वाद' ' आशीर्वाद ' म्हणून तिचे सात्वन करीत होते व मधून मधून तिला उपदेशाचे अमृत पाजत होते पण प्रत्येक वेळी ती अप्पाना म्हणायची. " स्वामी, मला हे जमायचे नाही मला तेहि जमायचे नाही. माझ्याकडून काहीही उपासना व्हायची नाही. "
त्यावर अप्पा तिला म्हणाले,

**" सोऽहं स्मरणीं सावधान । तो नित्य निर्भय शांत प्रसन्न ।**
**अलिप्तपणे करी सहन । देह-दुःखें ।।**
**देह-दुःख नाना यातना । ती ईश्वराचीच करुणा ।**
**ऐसी विवेकें ठेवितां धारणा । खेद कैचा ।।**
**हर्ष–शोक सुख दुःख । देही द्वंद्वे स्वाभाविक ।**
**मन कोनि अंतर्मुख । स्वरूपी ठेवी ।।**

" घरातील कामकाज करीत असताना अतरी देवाचे स्मरण असावे. आपण आनदात जन्मलो, आनदात जगायचे व आनदातच विलीन व्हायचे."

हा गुरुमुखातील बोध ऐकून तिचे बरेच समाधान झाले.

आमच्या वेगुर्ल्यातील श्रीज्ञानेश्वर मदिर हाही स्वामीचा महाप्रसाद आहे. त्यातील श्रीज्ञानेशाची मूर्ति ही माझे मामा पावसला गेले असताना त्याना विकतच घ्यायची होती पण काही कारणाने पुढच्या खेपेस ती मूर्ति घेण्याचे त्यानी ठरविले. अतर्ज्ञानी स्वामीना ही गोष्ट कळावयास किती उशीर ? त्यानी त्याच खेपेस ती मूर्ति ' प्रसादभेट ' म्हणूनच मामाना दिली.

जवळ जवळ एक वर्ष ती मूर्ति वेगुर्ले येथील श्रीविठ्ठल मदिरातच ठेवण्यात आली होती. त्यासाठी ज्ञानेश्वर मदीर उभारून त्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्याची इच्छा मामानी स्वामीजवळ प्रकट केली. त्यानाही ही योजना पसत पडून कोणत्या जागेवर मदिराची उभारणी करावी ती जागाही स्वामीनी निश्चित करून दिली. मात्र मदीराच्या बाधकामासाठी कुणाकडे एकाही पैशाची याचना करावयाची नाही अशी गोड सूचना त्यानी मामाना दिली.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे स्वामीजीच्या प्रेरणेने व काही लोकांनी स्वखुशीने दिलेल्या मदतीने अवघ्या पावणेदोन महिन्यांत मंदीर उभारले गेले. ह्या मंदिरातील प्रत्येक वस्तू स्वामीच्या हस्तस्पर्शाने पुनीत झाली आहे.

मदिरातील नैवेद्य करण्यासाठी मामांनी माझी योजना करण्याचे ठरविले. पण यासाठी स्वामीजीनी परवानगी दिली तरच हे शक्य होते. स्वामीजी म्हणाले, "श्रीज्ञानेश्वर महाराजाचा नैवेद्य कमलने केला तरी चालेल. भक्तीने व प्रेमाने केलेले कर्म परमेश्वराला आवडते. त्याबद्दल काही शका घेणे नको."

पांवसला माझी तिसरी खेप सन १९७४ च्या मार्च महिन्यात पडली. त्यावेळी स्वामीजीची प्रकृति तर अगदीच कृश झाली होती. ते त्यापूर्वीच अधूनमधून निर्वाणीची भाषा बोलत होते. एके दिवशी ते म्हणाले की "माझे अवतारकार्य आता संपत आले आहे. मला आता मोठ्या प्रवासाला जावयाचे आहे."

मी ह्यावेळी एकनाथी भागवताच्या पारायणासाठी आले होते. हे पारायण पधरा दिवसाचे होते. नतर रामनवमीला दासबोधाचे पारायण सुरू झाले हे पारायण एका दिवसात करण्यासाठी आम्ही त्याची परवानगी मागितली, पण ते म्हणाले, "एका दिवसात करण्यापेक्षा सात दिवसाचा 'सप्ताह' करणेच योग्य. वाचताना मनन व चितनही झाले पाहिजे."

२८ जुलैला स्वामीची प्रकृति फारच खालावली स्वामी सत्यदेवानद सरस्वति त्यावेळी आळदीसच होते सत्पुरुष आपला देह ठेवण्यापूर्वी आपली आध्यात्मिक शक्ति योग्य शिष्यामध्ये सक्रमित करून शातपणे ब्रह्मस्वरूपात विलीन होतात. त्याप्रमाणे शक्तिसक्रमणाची वेळ जवळ आली होती. स्वामी सत्यदेवानद येताच त्यानी त्याना खोलीत बोलावून आपल्या दिव्य नेत्राद्वारा त्याच्यात शक्तिसक्रमण केले त्यावेळी सत्यदेवानदाना चार तास समाधि लागली होती.

स्वामी स्वरूपानदानी काही साधकाना वेळोवेळी जी गद्यपत्रे लिहून उपदेश केला ती खालीलप्रमाणे :—

मूळ तत्त्व ओळखून सशय सोडून भजन गुरूपदिष्ट मार्गाने करावे म्हणजे हळूहळू प्रगति होऊन मूळचीच वस्तू पुन्हा लाभल्याचा ब्रह्मानद मिळेल.

जीवास सर्व अवस्थातून जावे लागते! एकदम परम लाभ, शाति कशी प्राप्त होणार बरे? एखादाच पूर्वतयारीने नुसते कर्णी पडताच उमजून पूर्ण होतो. पण बहुतेकास श्रवण, मनन, चितन निदिध्यासपूर्वक निष्ठेने भजन करीत करीत प्रगति करणे प्राप्त पडते; मग लागोत का काही जन्म ते प्राप्त व्हावयाला! आपण नित्यनेमाने ससार करता करताच ह्या मार्गाने आपले मूळ ठिकाण शोधून "स्वस्थ" व्हावयाचे आहे.

जीवास बोध देण्यासाठी व त्यातून व्यवहार, पारमार्थिक अर्थ जाणून मी य विश्वात कोण ? कसं वागायचं ? काय बधनमुक्ति काय ? मुक्ति काय ? या कल्पनाचा पसारा माडून कोडी उलगडण्याचे प्रयत्न करायचे काय ? का श्रीसद्गुरुनी सांगितलेल्या महावाक्यावर पूर्ण श्रद्धा ठेवून त्याप्रमाणे मार्ग आक्रमून आनंदधाम गाठायचे ? ते उमजून प्रयत्न सातत्याने ठेवावा व यानेच कार्यभाग साधेल याची खात्री बाळगा. मार्ग भिन्न भिन्न असतील. पण आपणाला आपल्या मार्गाने त्वरित पल्ला गाठायचा आहे तर तसा प्रयत्न ठेवावा व यानेच कार्यभाग होईल याची खात्री बाळगा.

नामदेव महाराज म्हणतात त्याप्रमाणे एक ओवी जरी सद्ग्रथाची श्रवण, मनन व निदिध्यासानी अनुभवास आणली तरी मुमुक्षूच्या उद्धारास पुरे होईल. पण सर्व ग्रथच्या ग्रथ पारायणे करूनही काही महाभागाना उमज पडत नाही. नशिब त्याचे. सर्व काही सोपे व उघड उघड आहे पण ते स्थिरत्वाने व विवेकाने पाहणारा क्वचित! आपणास काय करावयाचे ? कसे जावयाचे ? त्याप्रमाणे ठरवून तसे वागावे म्हणजे आज ना उद्या ते साधते

अभ्यास सतत असला की मृत्युसमयी न डगमगता शातचित्ते परमात्मतत्त्वात लीन होता येते व त्यासाठी १।२ मिनिटे आपण (मृत) नाहीच. एक आत्मतत्त्वच अतर्बाह्य भरून आहे फक्त देहाची खोळ आश्रयाने ते कार्यप्रवण झालेले दिसते हा अनुभव साधकाने घ्यावा. म्हणजे मृत्यूची भीति पुढे पुढे अभ्यासाने वाटणार नाही.

"आपुले मरण पाहिले म्या डोळा ।
तो झाला सोहळा अनुपम्य ।"

असा अनुभव घ्यावा.

सर्व कर्म कृष्णार्पण करून कर्तव्य करायचे फलापेक्षा सोडल्यावर बधमुक्त ही वार्ताच गळून पडते. अभ्यासाने स्वरूपानदाचा – स्वरूपाचा आनद लाभतो. फुटक्या मडक्यात पाणी जेवढे राहील तेवढेच घालायचे नाही तर फुकट !

मग शाभवी नको, तसेच शास्त्रीय पूजा-अर्चा नको. सोऽह भावानेच मर्व प्राप्त होते.

श्रीविवेकानद याचे व्याख्यानातील कर्तव्य कर्मयोग व श्रीशकराचार्यांचे मंत्र शिवोऽह शिवोऽह ' अखड आचरून देहपतनापर्यंत कर्माचरण करावे.

कोणताच आग्रह व बधन उपाधि न होता जे जे सहज व्हायचे ते होईल. मग- भगवंताची जसजशी इच्छा तसतसे घडते.

शुद्ध भावनेने केलेले प्रयत्न जरी ईशइच्छेने सफल झाले नाहीत तरी शुभेच्छा

कांही वाईट नाहीत. कोणतेही कर्म अमुक तऱ्हेनेच व्हावे व होणार अशा तऱ्हेचा आग्रह नसावा. सर्व संकल्प ईश्वरेच्छेप्रमाणे व त्याच्या प्रेरणेनुसार सफल व्हावयाचे तसतसे घडतात. आपण त्यांत निमित्तमात्र !

ह्याच जन्मी कृतकृत्य व्हावे, तर का नाही असे होणार ? जसा दृढ संकल्प, प्रयत्न व गुरुकृपा तशी सिद्धता! जर तसे घडले तर सिद्धी फार दूर नाही. मूळ स्व-प्रयत्न व त्यास योग्य मार्गदर्शन हेच खरे !

श्रीज्ञानेश्वरीचे वाचन योग्य स्थळी वाचून केले असता भाव अतरी व्यक्त होतो.

बाळानो! बाह्य व अत:सृष्टी कार्ये चालतात त्यावरील साक्षित्व करायचे. युक्त्या, स्थिरत्व, दृढ श्रद्धेने सद्गुरुनिष्ठेने 'अह ब्रह्मास्मि' याचा प्रत्यय अखड घ्यायचा. ह्व्यासाने अध्यात्म दूरावतो व चितेने तो फारच लाब जातो.

– इति शिवम्



# अमृतमय ठेवा

श्री. सुभाष सौंदलगेकर, पुणे

**" सद्गुरु माउलीचे चैतन्यमय स्वरूपात अखंड वास्तव्य इथे आहेच हे माउलीचे आश्वासन हाच आमचा सर्वांचा अमृतमय ठेवा आहे. "**

आमचा पावसचा प्रवास सुरू झाला. अत.करणात एकच विचार – श्रीस्वामीचे दर्शन. त्याचा आशीर्वाद. साडेनऊ वाजता पावसला पोचलो. गाडीतील सर्व मडळी पावसेत उतरली. सर्वजण श्रीसद्गुरु माउलीचे दर्शनाकरिता आले होते. दर्शनाची वेळ झाली माउलीचे सेवक गुरुबधू श्री मोहन गोडबोले हे बाहेर आले. त्यानी कोठून आलात ? श्रीस्वामीची तुम्हास काय माहिती आहे ? वगैरे चौकशी केली. त्याना ज्येष्ठ गुरुबधू श्री. तात्यासाहेब पाडे व श्री. माडवगणे याचा परिचय सागितला. डॉ. रा. य पराजपे यानी लिहिलेले 'श्रीस्वामी स्वरूपानद चरित्र' वाचले आहे असे सागितले. घरी नियमित श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ वाचतो अनुग्रहित नाही म्हणून केद्रात जात नाही असे म्हटले. तसेच दीपलक्ष्मी दिवाळी विशेषाकातील ' श्रीस्वामी 'चा फोटो फ्रेम करून घेतला आहे देव्हाऱ्यामध्ये प्रतिष्ठापना केली असून नियमित पूजा करतो असे सागितले. व येण्याचे प्रयोजन श्रीस्वामीची कायम कृपादृष्टी हे होय असे सागितले थोड्याच वेळात दर्शनास खोलीमध्ये बोलाविले डोळ्याना अतिविलक्षण असा तेजोगोल दिसला सर्वत्र 'सोऽह'ध्वनी निनादत होता. श्रीभगवान विष्णू ज्याप्रमाणे शेषशय्येवर दिसावेत तद्वतच श्रीस्वामी स्वरूपानद पलगावर होते. जवळ बाकावर बसण्यास सागितले. श्रीस्वामीनी कुठे असता ? काय करता, येताना मुलाना काही त्रास झाला नाही ना? इत्यादि गोष्टीची चौकशी केली व नतर दत्तात्रेय सौदलगेकर ( माझे वडील ) निपाणीचे, ते व मी चाळीस वर्षापूर्वी टिळक कॉलेजच्या पिछाडीला दोन वर्षे एकत्र रहात होतो, असे आपल्या अत्यत हळुवार आवाजात श्री स्वामीनी आम्हास सागितले. खोलीत प्रवेश केल्यावरच देहभान हरपले होते. श्रीगुरुमाऊली व त्याचे ते हळूवार शब्द या खेरीज काहीच दिसत नव्हते. कळत नव्हते. प्रत्यक्ष श्रीभगवान विष्णू नारायणाचेच दर्शन झाले. मन शात झाले. श्रीगुरु माऊलीशी पाचसात मिनिटे वरील प्रमाणे बोलणे झाले. श्रीमाऊलीने खडीसाखर, पेढे, प्रसाद भेट-पुस्तके

दिली. आम्ही खोलीतून श्रीस्वामीकडे पहात तसेच बाहेर आलो. दिव्यत्वाची, अलौकिकतेची त्याच क्षणी साक्ष पडली. प्रत्यक्ष परमेश्वराचेच दर्शन झाले.

अनुग्रहाची वेळ दुपारी १२ वाजता असते. स्वामीनी बोलावले तर तुम्ही सर्वानी इथे असणे जरूर आहे असे आम्हास श्रीस्वामीचे घर पाहणेस जातानाच श्री. देसाईनी याना सागितले होते. पावणेबारा वाजता परत आश्रमात आलो. हातपाय धुवून बसलो इतक्यात सौदलगेकर याना बोलवा असा निरोप आला. खोलीमध्ये गेलो. श्रीस्वामी पलंगावर बसलेले होते. चेहरा अत्यत तेज.पुज होता. चेहऱ्यावर हास्य विलसत होते. पराशातीचे वैभव ओसडत होते श्रीस्वामीनी बाकावर बसण्यास सागितले व अनुग्रह म्हणजे काय, गुरुपरपरा म्हणजे काय, याची माहिती दिली. नतर मी तुम्हास तीन वेळेला अनुग्रहाचे श्लोक सागतो ते तुम्ही म्हणावयाचे असे म्हटले. श्रीस्वामीनी श्लोक सागितले ते मी म्हटले. नतर सोऽहं ध्यान म्हणजे काय? ते कसे करावयाचे हे सागितले. मी सोऽहं ध्यान करून दाखवितो ते नीट पहा असे म्हटले. तीन वेळेला सोऽहं ध्यान केले श्रीभगवान शकर हिमालयात तपश्चर्या करण्यासाठी बसलेले श्रीस्वामीचे स्वरूपात दिसले स्वामीनी सोऽहं ध्यान करून घेतले. याच प्रमाणे ध्यान करा व हळूहळू वेळ वाढवा असे सागून खडीसाखरेचा प्रसाद व पुस्तके दिली नतर सौभाग्यवतीसही वरील प्रमाणे अनुग्रह दिला लहान मुले त्रास देत होती श्री. विजय व पुण्यातील गुरुबधू गाधी यानी चि कु विनीता व चि. महेश याना साभाळले. नतर मुलानाही आशीर्वाद दिला. प्रसाद दिला हाच तो परमभाग्याचा, आनदाचा व अत्यत भाग्यशाली दिवस ११ जानेवारी १९७२ मगळवार ज्या दिवशी श्रीसद्गुरु माऊलीनी आम्हास अनुग्रह देऊन कृपाशीर्वाद दिला जीवन धन्य केले जीवन पूर्ण निर्भय झाले

लहान मुलाना श्री देसाई याचे घरी दूधभात खाऊ घातला मुले तृप्त झाली. धन्य ते श्री देसाई याचे घर व धन्य जी देसाई मडळी ज्याचे घरी प्रत्यक्ष " श्रीभगवान विष्णू अनत निवासा "त सतत निवास करीत आहेत.

श्रीक्षेत्र पावस येथील सर्व वृत्तात थोडक्यात पुणे येथे केद्रात श्री प पू. सत्यदेवानद सरस्वती स्वामी याना सागितल्यावर " तुम्ही आनदाने खूपच भावावून गेला असाल नाही ? " असे म्हणून त्यानीही आशीर्वाद दिला

" अवघाची देह झाला हरिमय – पहाता स्वामी स्वरूपानदा ।
चित्तवृत्ती शुद्ध झाल्या प्रसन्न आता अखड सोऽहं ध्यान ।। "

आतापर्यंत पावसला सातआठ वेळा जाणे झाले असेल. पण प्रत्येक वेळेस एक वेगळीच उत्कठा असते. पण १५ ऑगस्ट १९७४ गुरुवार रोजी जे जाणे झाले ते म्हणजे श्रीसद्गुरु माउलीने आपणहून कसे नेले त्याची मला प्रचीती आली.

माझ्या लहान बहिणीची पहिली मगळागौर पूजा दिनांक १३ ऑगस्ट १९७४ रोजी निपाणीस आमच्या घरी होती, म्हणून मी सोमवार दिनाक १२ रोजी निघालो. निपाणीस पहाटे पाच वाजता पोहोचलो. तिचे सासरची सर्व मडळी सागलीहून आली होती. पूजेचा कार्यक्रम उत्तम पार पडला. रात्री एकपर्यंत जागरण झाले. बुधवारी दि. १४ रोजी सर्व मंडळी सागलीस जाण्यास निघाली. त्यांना स्टॅंडवर पोचविले. नतर घरी मी बहिण, आईवडील व इतर भाऊ गप्पागोष्टी, क्षेम, कुशल इत्यादि बोलत बसलो. तसेच ती. वडलाना व सौ. आईस आता एकदा तुम्ही पावसला जाऊन श्री-स्वामीचे आशीर्वाद घेऊन या असेही म्हटले. नतर मला अचानक आपण लगेच आजच पुण्यास जावे असे वारंवार वाटू लागले. गुरुवार १५ ऑगस्ट सुट्टी होती. जागरण झाले होते. सर्वजण गुरुवारी सुट्टी असताना आज रात्री जाण्याची काय जरूरी आहे, असे म्हणू लागले. म्हणून पुण्यास निघण्याचा बेत रद्द केला. नतर जेवावयास बसलो. चारपांच घास जेवण घेतले असेल नसेल तोच मी आजच रात्री निघावे असे वाटू लागले. सर्वांचा हिरमोड करून पुण्यास बुधवारीच १४ ऑगस्ट रोजी रात्रौ १० वाजता निपाणीहून निघालो. पुण्यास सकाळी ७-३० वाजता पोहोचलो. विश्रांति घेतली. चहा घेऊन स्नान केले. देवपूजा व श्रीस्वामीची पूजाही केली. ध्यान करून बाहेर आलो बरोबर ११ वाजता श्रीसद्गुरु माउलीनी गुरुवारी सकाळी नऊ वाजता समाधी घेतल्याचे कळले आम्हा सर्वांवर वज्राघात झाल्यासारखे वाटले. श्री. वसंतराव देसाई याच्या दुकानी जमलो स्वामीची समाधीची वार्ता ऐकून अनेकाची एकच धावपळ झाली. आम्ही दुपारी दोन वाजता ५०–६० मडळी श्रीक्षेत्र पावसला जाण्यास निघालो. पहाटे साडेतीन वाजता पोहोचलो गाडीमध्ये "रामकृष्ण-हरी"चा जयघोष चालू होता हातपाय धुवून अत्यत जड अत करणाने श्रीगुरुमाउलीचे दर्शन घेतले शुभ्र वस्त्रे परिधान केलेली, गळ्यामध्ये तुळशीहार घातलेली श्रीस्वामीची मूर्ती श्री. देसाई याचे अनत निवासात श्रीस्वरूपाश्रमाकडे तोंड करून ध्यान अवस्थेतच ठेवली होती. मी व आणखी काही गुरुबधूनी सर्व आश्रम परिसर माऊलीपाशी उभे राहून "रामकृष्ण हरी" या मत्राच्या जयघोषानी निनादून सोडला श्रीस्वामीची पालखी फुलानी व तुलसीपत्रानी सजविलेली होती श्रीगुरुमाऊलीचा चेहरा अत्यत तेजस्वी दिसत होता. त्या सकाळी श्रीज्ञानेश्वर माउली व श्रीगुरुमाऊलीची आरती झाली मिरवणूक बरोबर दहा वाजता निघाली. दहाबारा हजार स्वामी भक्त मिरवणुकीत "रामकृष्ण हरी" या मत्राच्या जयघोषांत रगून गेले होते भगवान श्रीसूर्यनारायण व वरुणदेव या सोहळ्यात आलटून पालटून व काही वेळ एकदम सामील होत होते पूर्वी बाधून ठेव-लेल्या ध्यान गुफेजवळ येण्यास दीड वाजला होता.

ध्यानगुफेतील जमीन गाईच्या शेणाने सारवली होती रागोळी घातली होती. दर्भ टाकून त्यावर मृगाजिन घातले होते. श्रीगुरुमाऊलीस स्पर्श करून त्यांच्या चरणावर मस्तक ठेवावे असे एकसारखे वाटू लागले. गर्दीतून पुढे पालखी जवळ आलो व तसेच

पालखीबरोबर ध्यानगुफेजवळ आलो. इतर सर्व समाधीसोहळा पहात तिथेच थांबले. श्रीस्वामींना पालखीतून खाली उतरविताना दोन्ही हातांनी त्याचे पाठीस धरून खाली उतरविले. श्रीसद्‌गुरु माऊलीस पश्चिमेकडे तोंड करून ध्यानस्थ अवस्थेतच ध्यान-गुंफेत बसविले. समाधीजवळ श्रीपरमपूज्य सत्यदेवानद सरस्वतीस्वामी, ब्रह्मवृन्द, रामदासी, श्रीबाबा व भाऊ देसाई त्याची मुले, सुरेश भावे, डॉ. वाडदेकर, श्री. गाधी व व्यवस्थापक होते. एका अनोळखी व्यवस्थापकाने मला ध्यानगुफेपासून जाण्यास सागितले. त्यावेळी श्री. बाबा देसाई यानी व्यवस्थापकास दोनदा सांगितले—तो श्री-स्वामीचा भाचा आहे त्यावेळी मला अतिशय भडभडून आले

बुधवार दि १४।८।७४ रोजी निघाणीस राहिलो असतो तर गुरुवार दि १५ ऑगस्ट १९७४ रोजी रात्रौ निघून शुक्रवारी १६ तारखेस पुण्यास आलो असतो. कोणती शक्ति बुधवारीच पुण्यास जाण्यास प्रवृत्त करीत होती याचा उलगडा झाला. श्रीसद्‌गुरु माऊलीनीच दर्शनाकरिता, सेवेकरिता बोलावून घेतले. ध्यान गुफेजवळ थाबवून घेतले. असा हा श्रीसद्‌गुरु महिमा आम्हास प्रत्ययास आला. आमचे सारखी जी असख्य अनुग्रहित लेकरे आहेत त्याचेवर श्रीसद्‌गुरु माऊलीची सतत कृपा राहो हीच त्याचे मगलचरणी अनन्यभावाने प्रार्थना !

"श्रीसद्‌गुरु माऊलीचा पार्थिव देह जरी नसला तरी त्याचे चैतन्य स्वरूपात अखड वास्तव्य इथे आहेच हे माऊलीचे आश्वासन हाच आपल्या सर्वाचा अमृतमय ठेवा होय."

● ● ●

# परब्रम्ह स्वामी स्वरूपानंद

-श्री. के. न. गांधी, सासवड

**स्वामीजींचे वर्णन अगर त्यांचे सामर्थ्य शब्दात सांगणे माझ्यासारख्या पामरास अशक्य आहे. मी एवढेच म्हणतो की मला परमेश्वर मानव-देहधारी स्वरूपात भेटला.**

सरकारी नोकरीत देशावरील माणसास रत्नागिरी येथील बदली म्हणजे अतिशय अप्रिय गोष्ट वाटते. मीही त्याला अपवाद नाही. बदली रहित होण्याचे अनेक प्रयत्न केले. तीन महिने रजा काढली. परतु अखेर मे १९६८ मध्ये रत्नागिरीस हजर झालो. दु:खित मनाने नोकरीचे कर्तव्य बजावून कालक्रमणा करीत असताना १५ ऑगस्ट १९६८ या दिवशी दुपारी सुट्टीनिमित्त विहार लॉजमध्ये भोजन करीत असताना कोणीतर अचानक "परमपूज्य स्वामी स्वरूपानन्दमहाराज" याचा विषय काढला. भोजन होताच माझे परिचित सुधाकर अच्युत मलुष्ठे याना 'पावस' येथे जाण्याचा मार्ग वगैरे माहिती विचारली आणि लगेच दुपारी २ ते २-३० चे सुमारास देसाई आबेवाले याचे घरी दाखल झालो. परमपूज्य गुरुमाऊलीनी माझी सर्व माहिती विचारली. मी मनमोकळेपणाने माझ्या सर्व व्यथा निवेदन केल्या. गुरुमाऊलीनी त्यावेळी मजला नामस्मरणानेच दु ख दूर-हलके होईल असे सागितले. त्यावेळी मी बदली कधी होईल ? असे विचारले. चार महिन्यानी होईल असे गुरुमाऊलीनी क्षणार्धात सागितले. पुढे बरोबर चार महिन्यानीच माझी बदली रत्नागिरीहून कणकवली येथे झाली. तेथे बऱ्याच वेळा परमपूज्य भालचद्र बाबाचे दर्शन घडले माझ्या मनातील सोयीस्कर बदलीचा ध्यास कमी झालेला नव्हताच. पुढे अवघ्या चारच महिन्यात माझी चिपळूण येथे बदली झाली. यावेळेपावेतो मी स्वामीजीच्याकडे दोनचार वेळा गेल्याचे स्मरते. चिपळूण येथील वास्तव्यात मात्र वर्षभरात चारपाच वेळा गेल्याचे चागले आठवते. मे १९७० मध्ये माझे मुलासह स्वामीजीच्या दर्शनास गेलो असता स्वामीजीना मी कळकळून विचारले की आता बदल्यांचा हंगाम आहे. अजूनही तरी कांही चिन्हे दिसत नाहीत. त्यावर गुरुमाऊलीनी प्रसन्नतेने मंदस्मित केले. यावेळेपावेतो गुरुमाऊलीची थोरवी मला बऱ्याच कारणानी पटली असल्यामुळे मी अधिक काही विचारले नाही·

गुरुमाऊलीच्या निवासस्थानाबाहेर येऊन पूल ओलांडून एस. टी. स्टॉपकडे वळतो तोच रत्नागिरीचे जोशी वकील भेटले व त्यानी माझी बदली पुणे जिल्ह्यात झाल्याचे सागितले. पुढे रत्नागिरी येथे येताच खात्री करून घेतली. वस्तुत: मी विचारले तेव्हा माझी बदली झाली होती पण गुरुमाऊलीनी मला तसे स्पष्ट सांगितले नाही केवढी त्याची ही अगर्वता आणि नम्रता! पुढे मी देवरुख येथे आल्यानतर मजला पुणे जिल्ह्यात बारामती येथे नेमणूक मिळावी म्हणून पत्र पाठविले व स्वामीजीच्या कृपेने बारामती येथेच नेमणूक झाली. सदर बदली प्रकरण ही एक अनेक गोष्टीपैकी एक गोष्ट आहे. स्वामीजीच्या कृपेने माझे अनेक हेतु परिपूर्ण झाले सर्वच गोष्टी तपशीलवार लिहिणे केवळ अशक्य आहे कारण सर्वच अनुभव शब्दामध्ये गुफता येत नाहीत. स्वामीजीच्या शब्दामध्ये साखर किवा गूळ याची गोडी चाखूनच पहावयास पाहिजे. त्याचे वर्णन यथार्थ करता येणे शक्य नाही

वानगी दाखल एक दोन अलौकिक अनुभव खाली देत आहे. माऊलीच्या मते चमत्कार सागू नयेत तथापि काही गोष्टी सागण्याचा मोह आवरत नाही बारामती येथे असताना १९७१ साली एका अधिकाऱ्याच्या कारवाईमुळे मी सकटात सापडलो होतो नैतिकदृष्टचा मी निर्दोष होतो परतु व्यावहारिकदृष्टचा मी आयुष्यातून उठेन किवा काय ? अशी परिस्थिती निर्माण झाली होती मनाचा हिय्या करून एक आतर-देशीय पत्र गुरुमाऊलीचे चरणी लिहून पाठविले त्यात तपशीलवार सर्व हकीगत कळविली सुमारे दहाबारा दिवसानी पत्रोत्तर आले गुरुमाऊलीनी लिहिले होते की–

" स्वामी म्हणे आता राहावे निश्चित जाणोनी भगवत पाठीराखा" आणि मजला पत्रोत्तर मिळाले त्याच दिवशी मी सकटातून पूर्णत: मुक्त झालो होतो

यासारखे अनत अनुभव मी अनुभवले आहेत स्वामीजीचे वर्णन अगर त्यांचे सामर्थ्य शब्दात प्रगट करणे माझ्यासारख्या पामरास केवळ अशक्य आहे. मी एवढेच म्हणू शकतो की मजला परमेश्वर मानवदेहधारी स्वरूपात भेटला. मजला व माझे पत्नीस अनुग्रह दिला. माझ्या मुलाना प्रेमळ आशीर्वाद दिले. आज जरी देहधारी स्वरूपात स्वामी नसले तरी मी एवढेच म्हणू शकतो की, " पडो देह त्याचा परि ते नाही गेले " त्याची आपणा सर्वाच्यावर निरतर कृपादृष्टि राहावी एवढीच त्यांचे चरणी नम्र प्रार्थना करून हा छोटासा लेख सपवितो.

।। ॐ तत्सत् सोऽह हस: ।।



# श्री संत विनोबांचा कृपाप्रसाद

श्री. ना. वा. तथा रंगनाथ कुलकर्णी, कोल्हापूर.

**एकदा विनोबा मला म्हणाले होते, " तू गुरुमार्गात येणार आहेस पण त्याला वेळ यायची आहे. दक्षिणेकडे पश्चिम समुद्रकिनाऱ्याजवळ एक तेजस्वी सत्पुरुष मला दिसत आहे. . . तो तेजस्वी सत्पुरुष म्हणजेच स्वामी स्वरूपानंद !"**

१९६५ च्या एप्रिल महिन्यात अशी एक ठळक घटना घडली की त्यामुळे माझ्या पुढील जीवनावर त्याचा परिणाम घडला परमहंसपदी पोचलेले साधु वा संतांच्या सहवासात थोडा काळ तरी माणसाने राहावे असा संस्कार माझ्या मनावर घडलेला असल्याने असा सत्संग ईश्वरकृपेने घडून आला. कोल्हापुरात श्री गोविंदराव गबाळे नावाच्या माझ्या मित्रांनी असे सांगितले की पूर्ण परमहंस पदी पोचलेले– कुंडलिनी जागृत झालेले सत्पुरुष कुणाला पहायचे असल्यास पावसला जाऊन जरूर पाहून यावे, अशा व्यक्ति पहायला मिळणे दुर्मिळ असते माझी उत्सुकता शिगेला पोचली पण योग नव्हता त्यावर सहा महिने गेले

१९६५ च्या एप्रिल महिन्याचे दिवस होते. पावसला जाण्याचे उद्देशाने जे पाचजण निघाले त्यात मी एक होतो श्री पाटणकर नावाचे कुडाळचे एक गृहस्थ आमचेबरोबर होते. त्यांनी आम्हा सर्वांना पूज्य स्वामी स्वरूपानंदाचेबद्दल बरीच माहिती देऊन आमची उत्सुकता अधिक वाढवली त्यावेळी मी खादी ग्रामोद्योग कमिशनमध्ये नोकरीस होतो. त्या पाचात माझ्यापेक्षा वरच्या ग्रेडवर असलेले श्री. गोटेही होते.

पावसला पोचल्यावर आम्ही सर्वजण श्री. सामंत (तिथल्या हायस्कूलचे हेडमास्तर व संचालक) यांच्याकडे उतरलो. श्री. देसाई यांचे घरी केव्हा जातो असे मला झाले होते. हातपाय धुवून श्री. देसाई यांचे पडवीत आम्ही सर्वजण बसलो. पाच मिनिटांनंतर आम्हा सर्वांना एकदमच आत बोलावले गेले. आत गेलो. तेथे नीटनेटक्या लाकडी कॉटवर अत्यंत दैदिप्यमान तेजस्वी सत्पुरुष बसलेले होते. हेच ते पूज्य स्वामी स्वरूपानंद ही माझी खात्री झाली. यावेळी मात्र मला पूज्य विनोबांची आठवण झाली व " अरे

ते व हे तेज एकच आहे, एकच तत्व आहे." असे आतून कोणी तरी सांगितल्याच भास झाला. मी भानावर आलो ते त्यांच्या हाताच्या इशाऱ्यानेच. त्यानी आम्हा सर्वान बाकावर बसायला खुणावले आम्ही बसलो. एका वेगळ्याच वातावरणात गेल्यासारर वाटले. मोजक्या शब्दानी व हाताच्या खुणानी "कुठून आलात" ? अशी विचारण झाली श्री पाटणकरानी सर्वांची नावे व कामे थोडक्यात सांगितली. आम्हा प्रत्येकाचे चेहरे त्यानी न्याहाळले. माझ्याकडे पाहून त्यानी उजव्या हाताच्या तर्जनीने खुणावले व माझ्या हृदयाचा ठोकाच चुकला. त्यानी हळू आवाजात सांगितले की नतर भेटायल बोलावतो बाहेर थोडा वेळ आम्हा सर्वानाच बसण्यास सांगितले

काया कृश पण कांती अतिशय तेजस्वी नजरेत करुणा—दुसऱ्याचा वेध घेणार पण अत्यंत शीतल. मुद्रा प्रसन्न जणु तेजोवलय ! आम्ही सर्व बालके त्या शांत तेजा बागडत होतो. असे एकंदर भाव पूज्य स्वामी स्वरूपानंदाचे बद्दल त्यावेळी माझ्य मनात निर्माण झाले, ते आठवले तसे लिहिले.

इतक्यात माझ्या नावाचा उल्लेख करून मला आत बोलावले मी गेलो बसता क्षणीच विचारले, "तुम्ही काय करता ?" हा प्रश्न माझ्या मनाचा वेध घेणारा ठरल मी त्या दिवसापर्यंत वर्षानुवर्षे जे करीत होतो त्यासंबधीच तो प्रश्न होता हे समजू विशेषत पहाटे दहापाच मिनिटे बसून ॐकाराचे ध्यान – श्वासाचे लयीवर बसव होते ते मी करीत असतो असे सांगितले "करून दाखवा बघू " अत्यंत मृदु शब्दा मला पूज्य स्वामी स्वरूपानंदानी आज्ञा दिली. आसनस्थ होऊन मी जे करीत होतो प्रत्यक्ष करून दाखवले. त्यानी ते सर्व लक्षपूर्वक न्याहाळले. त्यात थोडीशी सुधारण करायला सांगितले स्वत प्रत्यक्ष करून दाखवले आणि माझ्याकडून करवूनही घेतले असे येथून पुढे असेच करीत जा हे इतक्या हळुवार शब्दात सांगितले की मी थक्कच झालो विशेष आश्चर्य म्हणजे इतका आमचा सुखद संवाद झाल्यावर ते अत्यंत नम्र शब्दा शांतपणे म्हणाले, "हा ॐकार म्हणजेच सोऽहं (स्वतःकडे बोट दाखवून) त्याचे ध्या इथे सतत सुरू आहे " त्यावर मी विचारले, "सतत म्हणजे रात्री झोपल्यावरसुद्धा ? या माझ्या बालिश प्रश्नावर त्यानी मृदू हंसून 'हो'कारार्थी मान हालवली माझ्य आश्चर्याला मात्र काही पारावार राहिला नाही. तेथे त्यावेळी सेवेसाठी कोण हो ते मात्र मला अजिबात आठवत नाही. त्या सेवकास खुणेने बोलावून "स्वामी स्वरूपा नंद जीवन – चरित्र आणि तत्त्वज्ञान" हे डॉ. रा य. परांजपे यानी लेखबद्ध केले मोठे पुस्तक काढायला सांगितले "हे पुस्तक वाचा व काही शंका असल्यास पत्रा कळवा " असे सांगून माझ्या हातात ते पुस्तक दिले. अर्थात् कोल्हापुरास असतांन श्रीदत्ता बाळाचे सत्संगासाठी जात होतो व काही शंकाचे समाधान झाले नसल्या त्यानी ओळखले होते. यावेळी त्याचे वयहि पूज्य स्वामीजीनी विचारल्याचे आठवते साधकाची साधना मुरब्यासारखी मुरावी लागते त्यासाठी ही चौकशी असावी. त्यावेळ

पंचविशीही अद्याप न उलटलेला एक तरुण असल्याचे बोललो. त्यावर ते स्तब्ध झाले. एवढ्या वेळात 'पुस्तक' हाती आले होते. थोडे बोलण्याचे श्रम घेतल्यावर थोडी विश्रांतीची जरूरी असते असे त्यानी सांगितल्यावर मी उठून बाहेर आलो.

एवढा वेळपर्यंत – वीस मिनिटांपर्यंत बाहेर माझी वाट पहात स्नेही मंडळी बसून होती. त्या दिवशी रात्री आम्ही पांवसला मुक्काम केला होता मुक्कामास श्री. सामंत यांच्याकडे होतो. श्री. सामंतानी आम्हा सर्वांचा पाहुणचार अपेक्षेबाहेर चागला केला. जेथे संत असतात तेथल्या वायुमंडलात, वातावरणात, त्या वास्तूत निदान एक रात्र तरी घालवावी असे स्पष्ट सांगून त्यानी आम्हा सर्वांना ठेवून घेतले.

या दहापधरा मिनिटाच्या भेटीमध्ये मला कितीतरी सूचना अत्यंत सूचक शब्दात सागितल्या. त्याचा बोध त्यावेळी मला होऊ शकला नाही. पुढे त्याचा प्रत्यय येत असे. ' रोज जमेल तसे पाचदहा मिनिटे हेच तुम्ही जे करता ते सुधारणा करून करीत चला. बाकी इतर दृष्टीने तुम्हाला मार्गदर्शक भेटत राहातील." या त्याच्या बोलण्याचा अर्थ मी त्यावेळी समजू शकलो नाही. मार्गदर्शक त्याचा अर्थ भौतिक दृष्टीने एवढेच समजलो.

ही पहिलीच भेट हृदयाचा ठाव घेणारी ठरली.

नंतर तब्बल चार वर्षे लोटली. माझे आपले यंत्रवत् स्वस्थ बसणे ज्याला मी ध्यान म्हणतो ते चालू होते. त्यांनी दिलेले पुस्तक कोल्हापुरास आल्यावर उघडले. पहिल्याच पानावर पूज्य स्वामी स्वरूपानंदांनी परमार्थाची व्याख्या देऊन नाथसंप्रदायाचा मार्ग कसा आहे हे थोडक्यात लिहिलेले ते वाक्य मी वाचले. विचारमग्न झालो. पुस्तक मिटले. ते पुढे सहा महिने उघडलेच नाही. रॅपिड रीडिग करावे इतके ते साधे पुस्तक नाही.

१९६९ साली मी अत्यंत विपन्न स्थितीत होतो. स्वतःच्या चागल्या पाणस्थळ जमिनीचे दानपत्र आम्ही दोघाही बधूनी १९५४-५५ सालीच भरून–त्यावेळेच्या भूदान आदोलनात मुक्त सचार करण्याची सवय लागलेल्या मनाला नोकरी करणे जमेना– सोडून दिली. पुन्हा पदयात्रा सुरू केली. स्वावलबनाचा स्वाद असला पाहिजे यासाठी थोडा काळ दुसरी नोकरी केली. तीही सोडली. सभा-संमेलने गाजवलेली असल्याने आत्मविश्वास होता. परंतु तशा प्रकारच्या सेवेसाठी लागणारी तितीक्षा नव्हती. त्यामुळे या विपन्नावस्थेमध्ये गृहस्थाश्रम कसा नेटाने चालवणार ? जीवनात एक पोकळी निर्माण झाली. नेमके याच वेळी मला कोकणात जाण्याचा योग आला. देवरूखला जायचे होते. अत्यावश्यक घरगुती काम होते. सांगलीहून निघालो. रत्नागिरीच्या दिशेने बस गती घेत होती.

पांवसला आलो तो १९६९ चा ऑक्टोबर महिना असावा. परंतु घटना मात्र अगदी ताजी वाटावी अशी ! श्री. देसाईंनी खोलीत जायला सांगितले. दुपारची वेळ

होती. पूज्य स्वामी स्वरूपानंद नीटनेटक्या कॉटवर बसले होते. श्वास रोखून मी आत गेलो. माझ्याकडे पाहून " तुम्ही पूर्वी आला होता. " इतकेच बोलले. त्यावर विचार-शृखला तुटली. सावरत सावरत मी 'हो' म्हणालो. कारण इतकी वर्षे झाली. त्यानी अनेक हजारोचे चेहरे पाहिले असतील. माझ्या सारख्या सामान्याला त्यांनी ओळखले. मी माझे नाव व कोल्हापूराहून मागे केव्हा आलो ते सांगितले. मला बसायला सागितले. मी बाकावर बसलो. थोडा वेळ स्तब्ध राहून मला अत्यत हळुवारपणे विचारले, " नाम मत्र घेता का ? " मला तर आश्चर्याचा धक्काच बसला. वीज कोसळावी तसे झाले. क्षणभरच बावरलो. पण दृढपणे म्हणालो, " आपली इच्छा ". त्यावर स्पष्टपणे म्हणाले, " आज तुम्हाला येथे रहावे लागेल. उद्या दुपारी तुमचे काम होईल रत्नागिरीस तुमचा मुक्काम पडेल. परवा दिवशी तुम्ही मार्गस्थ व्हाल. " मी आपली समती दर्श-वली. माझ्या आठवणीप्रमाणे ते जसे बोलले तसेच शब्द मी टिपले आहेत. मी पूज्य विनोबांना विचारले होते परंतु त्यांनी नकार दिला होता. इतकेच यावेळी आठवले. हे मला अनायासे मिळते ते घ्यावे पण चित्त दोलायमान असल्याने " आपली इच्छा " हे शब्द खरे म्हणजे द्विअर्थाने मी वापरले होते. त्यानी मात्र कृपाछत्रात न कळत घेतले ही प्रक्रिया किती हळुवार होती ? ते आठवले की आजही स्तभित होतो! कठोर परीश्रम करून न मिळणारा ठेवा मला कोणतेही सायास न करता मिळत होता. श्री. भाऊ देसाई यांना पूर्वी केव्हा आलो हे सागितले. मला त्याचेकडेच जेवावे लागले. जेवायला बरीच मंडळी होती त्यात भगवी वस्त्रे वापरणारे एक तरुण सन्यासी होते. त्यावेळी त्याचेशी परिचय नव्हता. परिचय करून घेण्याची उर्मी नव्हती. त्याचे बोलण्यावरून ते बरेच विद्वान तपस्वी असावेत असा अदाज बाळगला. तो अक्षरशः खरा ठरला. एरवी ' माणसे ओळखता येत नाहीत तुम्हाला ' असा कुटबाचा टोमणा असतोच पण अपवादाने नियम सिद्ध होतो त्याप्रमाणे झाले हे तपस्वी पूज्य स्वरूपानदाचे खोलीतून इतक्या अदबीने त्याना पाठ न दाखवता येत होते की, माझी मात्र कालवाकालव होत होती. कारण त्याचा तो भाव माझ्यात नव्हता. पूज्य विनोबाच्या बरोबर असताना तर्काच्या कसोटी-वर एखादा विचार खरा उतरला नाही तर तो स्पष्टपणे डोळ्याला डोळा लावून ठामपणे पण मनात आदर ठेवून सांगत असे. भोवतालच्या मडळीना मात्र माझे हे वागणे न आवडल्याने ते बोलत असत. तरी माझा ठेका कायम! पण येथे तर्काच्या बुद्धीच्या पलि-कडच्या क्षेत्राशी सबध होता. केवळ भाव हवा. अन् नेमका माझ्या जवळ नव्हता. हे विद्वान तपस्वी संन्यासी म्हणजेच श्रीस्वामी सत्यदेवानद सरस्वती! अर्थात् तब्बल तीन वर्षे गेल्यावर परिचय झाला. त्याच्या बाअदब नजाकतीने त्यावेळी परिचय करून न घेण्याने साहित्य, कला व कवित्वाच्या चर्चेला मुकलो. अनोळखी ठिकाणी जेवणाची मला सवय होती. कारण पदयात्रेत रोज नवे घर ! परंतु यावेळी श्री. देसाई याचेकडे सकोचलो ! कारण एका वेगळ्या दालनात प्रवेश करायचा होता. फार सा भाव नस लेल्या मला दुसरे दिवशी पूज्य स्वामी स्वरूपानंद कृपा करणार होते. केवढी ही करुणा !

दुसरे दिवशी दुपारचे जेवण झाले. तोपर्यंत माझ्या बावरलेल्या मनाची तयारीही त्यांनी करून घेतली. विश्रांतीही पार पडली. तीन साडेतीनचे सुमारास मला बोलावणे आले.

मी खोलीत गेलो. बरोबर काहीही घेऊन गेलो नव्हतो. ते कॉटवर बसले होते. शांत दृष्टि रोखून माझ्याकडे पहात होते. त्या दृष्टीतील शीतलता व करुणा मला अद्याप ताज्या वाटतात. मी चित्रकार असतो तर नीटनेटके नेमके चित्र जरूर रेखाटले असते. मला बाकावर बसण्यास सांगितले. मी बसलो नीटस शब्दात सायक्लोस्टाईल केलेले काही श्लोक असलेले व शेवटी शाईने काही शब्द लिहिलेला 'कागद' मला त्यांनी दिला. माझ्याकडून एकदा वाचून घेतला. एका शब्दाचा उच्चार सुधारून घेतला. शाईने लिहिलेला 'महामंत्र' माझ्याकडून तीन वेळा म्हणवून घेतला. हा जप रोज सकाळी जमेल तितका वेळ करा, अशी सूचना दिली. जीवन कृतार्थ झाले. धन्य झालो. अन् खोलीतून त्या धुदीतच बाहेर आलो. मी अनुग्रहीत झालो.

यापूर्वी मी बावरलो त्याला आणखी एक कारण घडलेले. खरे म्हणजे त्याचा उल्लेख मी करणार नव्हतो; पण व्यक्तिगत असूनहि सद्‌गुरु द्रष्टे कसे आहेत ते गुणगान करावे अशा विचाराने लिहितो. आदल्या दिवशी त्यांनी 'नामा'बद्दल विचारल्यावर थोडी व्यक्तिगत चौकशी केली. १९६४ सालीही मी सांगितले त्याचे स्मरण देऊन सध्या खादी ग्रामोद्योग कमिशनच्या नोकरीतून राजीनामा देऊन मुक्त झालो असल्याचे बोललो. जमीनदान दिल्याचीही आठवण दिली. अत्यंत हळुवारपणे चेहऱ्यावर शांत भाव ठेवून म्हणाले–"खादी कमिशन सोडायला नको होते!" अनेक विद्वान तार्किकांना मी माझ्या राजीनाम्याच्या कारण मीमांसेने समाधान देऊन त्यांच्या तर्कांना बेतोड जबाब दिला होता, पण सद्‌गुरु देवाच्या केवळ वरच्या एका वाक्याने मी अवाक् झालो. अर्थात् मी नोकरीत असतो तर पांवसला आलो नसतो. 'नोकरी'च्या ठिकाणी दाही दिशा भटकत राहिलो असतो. आता पूज्य स्वामी स्वरूपानंद माझे सद्‌गुरुमाऊली बनले. ते द्रष्टे असल्याने त्यांच्या एकेका वाक्यातून मला प्रेरणा मिळाली व मी पुढे तसतसे वागण्याचा प्रयत्न केला आहे. सूत्र कायम आहे ते आता त्यांचे हातात आहे. ते स्वतः सार्वजनिक कामात होते त्यातल्या अडचणीची त्यांना कल्पना असल्याने त्यांनी मला जवळ केले आहे असे वाटते. १९६५ पासूनच ते माझी तयारी करीत आले असावेत असे वाटते.

१९७२ साली माझी तिसरी भेट म्हणजे संपूर्ण जीवनपरिवर्तन करणारी ठरली. सेवाकामाचे निमित्ताने मी ठाणे जिल्ह्यात कै. पूज्य आचार्य भिसे यांना आदिवासी भागात मदत करीत होतो. १९७२ च्या पूर्वी जवळ जवळ १५ महिने मी त्या कामात होतो. १९७१ साली पूज्य आचार्य भिसे वारले. ठाणे जिल्हा ग्रामस्वराज्य समिती-महाराष्ट्रात ग्रामदान पुनर्निर्माण समिती– बाहेर स्वतः पायावर उभा राहू शकेन

अशी कोणतीच कला माझे जवळ नाही. मी गृहस्थाश्रमी असल्याने कांही तरी करणे आवश्यक असल्याने बाहेर शोध घेत होतो. घरगुती कारणामुळे मला रोज पहाटे ध्यानस्थही बसता येईना. दुसरी कारणे तर होतीच; पण रोज ध्यानास न बसणे ही गोष्ट मला अधिक लागली. अर्थात् त्यामुळे दिवसभर अनुसंधान चालू होते. खरे म्हणजे सततच्या अनुसंधानासाठीच रोजचा नित्यनेम असतो. परंतु वर्षानुवर्षे चालू असलेल्या ध्यानास खीळ बसली याचे दु.ख वाटले. परिस्थितीचे चटके इतके बसू लागले की सांगलीहून घरातून बाहेर पडलो. स्वत: जिवंत रहावे असे वाटेना. परंतु मृत्यू येत नव्हता. कृत्रिम रीतीने कांही करू शकलो नाही. कोल्हापुरास आलो. गुरुबंधू श्री. शांतारामबापू जामसांडेकर याना थोडक्यात सर्व निवेदन केले. पांवसला जाण्याची इच्छा होती. कसाबसा येथपर्यंत आलो होतो. प्रवासखर्चाची व्यवस्था नव्हती. रोजच्या जेवणाखाण्याचा प्रश्नच होता. ते दिवस आठवले म्हणजे अंगावर काटा येतो. बहिणीचे घर कोल्हापुरास असल्याने व मेहुणे श्री. मगळे मित्रत्वाचे संबंध ठेवून असल्याने त्यांनी आग्रहाने ठेवून घेतले. लगेच श्री. शांतारामबापूनी त्याच दिवशी पांवसला जाण्यासाठी माझ्या प्रवासखर्चाची व्यवस्था केली. चारसहा दिवस राहावे अशा विचाराने मी पांवस गाठले. खऱ्या परमार्थाच्या व्याख्येत मी कुठेच बसत नव्हतो. त्यामुळे सद्गुरु पूज्य स्वामी स्वरूपानंदांचा मार्ग खडतर समजलो. मग आपल्याला जे जमत नाही ते जू खांद्यावर घ्या कशाला ? ज्यांनी आपल्याला नाथ संप्रदायात आपणहून आणले ते त्यांचे त्यांना देऊन आपण मोकळे व्हावे. दिलेला महामंत्र परत देऊन टाकावा. अशा विलक्षण विचाराने भारलो होतो. पांवसला पोचताक्षणीच माझ्या भेटीची व्यवस्था लगेच झाली. तब्बल तीन वर्षांनी मी येथे आलो होतो.

खोलीत प्रवेश केला. सद्गुरुमाऊली निजून दर्शन देत असत हे मला माहीत नव्हते. खोलीत प्रवेश मिळाल्यावर एका वेगळ्याच दालनात आलो. कारुण्याने, प्रसन्नतेने व शांतीच्या महासागराने ओथबलेली गुरुमाऊलीची दृष्टी माझ्यावर पडली. मी माझ्या येण्याचे प्रयोजन एकाच वाक्यात बोलून गेलो– " आपण दिलेले मला साभाळता येत नाही ते परत करायला आलो आहे. " मला काय यातना होत होत्या हे ते समजले. महापुरुषाना थोडक्यात बोलून वा न बोलता सर्व काही समजते. गुरुमाऊलीनी माझ्याकडे पाहून मंद स्मित केले व अत्यत हळू पण स्पष्ट व दृढ शब्दात म्हणाले, "हे परत घेता येत नसते! जमेल तेवढे व तसे करीत चला. " एवढे बोलून ते थांबले नाहीत. तर प्रसाद भेट म्हणून नुकतेच प्रकाशात आलेले स्वरूप-पत्र-मजुषा मला दिली. कोणतेही पान उघडायला सागितले, " कुठूनही वाचा "म्हणाले. मी पुस्तक उघडले. ६४ वे पान निघाले. तब्बल साडेतीन ओव्या माझ्याकडून वाचून घेतल्या. त्या खालीलप्रमाणे आहेत—

मग सद्गुरूसी रिघोनि शरण ।
कृपादान मागतसे ।। २० ।।
उदार सद्गुरु होती प्रसन्न ।
शिष्यास सन्मुख बैसवोन ।
दाविती स्वानुभवाची खूण
संशय निरसन जेणे होय ।। २१ ।।
तै भ्रान्तीचे मसैरें फिटे
बुद्धीस न फुटती फांटे ।
संकल्प-विकल्पांचे कांटे ।
होती वाटे वेगळे गा ।। २२ ।।
दिसे चैतन्याची ठेव ।
तेथे चित्त घेई धांव
प्रकट होता सोऽहं भाव
नुरे नांव अहंतेचे ।। २३ ।।

माझ्या एकेक शकाचे निरसन झाले. माझे मलाच आश्चर्य आजही वाटते की, पांवसला तर मी चंग बाधून गेलो होतो परतु झाले निराळेच! –या साडेतीन ओव्या मार्फत मी निरुत्तर झालो, नव्हे समाधान पावलो. एखाद्या प्रश्नावर श्रोत्याना निरुत्तर मी अनेक सभा समेलनातून केलेले आहे. पण समाधान करण्यासाठी वेगळ्याच धारणेची आवश्यकता असते समाधानाच्या आनदात मग्न असताना खोलीतून बाहेर येताना गुरुमाऊलीनी मला आशीर्वाद दिला. मी तर चारसहा दिवस राहाण्याच्या दृष्टीने गेलो होतो. परतु राहाण्याचे प्रयोजन त्या पाचदहा मिनिटाच्या भेटीच्या सोहळयात नाहीसे झाले होते. पण गुरुमाऊलीचा सहवास आणखी मिळावा अशी अपेक्षा असल्याने सेवकामार्फत खोलीत मी निरोप पाठविला. आतून उत्तर आले " जायला हरकत नाही. माझा तुम्हाला आशीर्वाद आहे. " त्या नतर मी पुन्हा निरोप पाठवला की सध्या लगेच कुठेही जाण्याची तातडी नाही कारण कामच नाही. तेव्हा चारसहा दिवसाची सवड आहे व जाणार तरी कुठे ? त्याच सेवकाने आतून स्पष्ट आदेश आणला, " तुम्ही कोल्हापुरास जायला हरकत नाही. माझा तुम्हाला आशीर्वाद आहे. " त्यावर मात्र मी लगेच हललो. खोलीतून बाहेर पडताना प्रसाद तर मिळालाच पण जीवनाचे पाथेयही मिळाले. त्रिवार आशीर्वाद!

कोल्हापुरास आलो. यथाशक्ति ध्यान प्रार्थना उत्साहाने चालू केली ती अद्याप टिकून आहे. काम नव्हते. शुक्ल यजुर्वेदी माध्यदिन शाखेने एक स्वाहाकार ( यज्ञ ) करण्याचे ठरवले होते. मेहुणे श्री. मनोहर मुंगळे तर माझी वाट पाहात होते. कोल्हापुरास येताक्षणीच त्यांनी सागितले, " स्वाहाकार समितीचे चिटणीसपदाची जबाबदारी

तुझेवर पडली आहे. कालच सभा झाली. त्या सभेत ठराव एकमताने पास झाला आहे. तेव्हा कमीत कमी अडीच तीन महिने कामात लक्ष घालावे लागेल." मी ज्या समाजात जन्मलो त्या समाजाची थोडीफार सेवा करण्यासाठीच ही जबाबदारी माझेवर पडली होती. एरवी जात, वर्ग व सप्रदाय या संकीर्ण बधनात न गुंतणारे माझे मन पण स्वतःची विशिष्ट मते बाजूला सारून गुरुप्रसाद समजून यथाशक्ति सेवा केली. त्याचा मोबदलाही मिळाला. मेहता आणि कपनीचे मालक प्रथमपासूनच माझ्या सुपरिचयाचे व सर्वोदयाचे कामात असताना माझेवर लक्ष देणारे असे असल्याने मला म्हणाले,"कामावर केव्हा-पासून येणार?" "स्वाहाकाराचे हिशेब पूर्ण झाल्यावर येतो", असे सांगितले. पण त्यांचे-कडून पुन्हा निरोप आला. तेव्हा मात्र रात्रंदिवस काम करून सर्व हिशेब पूर्ण केले. सबंधिताकडे हवाली केले. मेहता आणि कंपनीत कामावर रूजू झालो. तेव्हापासून अद्यापपावेतो येथेच आहे. पुढचे गुरुमाऊलीच जाणे.

माझी पांवसची पहिली भेट १९६५ मधली. नतर प्रत्यक्ष कृपा झाली १९६९ मध्ये. ही माझी दुसरी भेट. तिसरी भेट १९७२ ची वर वर्णन केलेली. त्यानतर मात्र दर तीनचार महिन्यानी पावसला जाणे घडले. कोल्हापूर येथील स्वामी स्वरूपानद भजन केंद्र माझे आश्रयस्थान बनले. प्रथमपासून परिचय असलेले श्री. शातारामबापू जामसाडेकर व इतर गुरुबंधूभगिनीशी जिव्हाळ्याचे सबध निर्माण झाले. पहिल्या प्रथम या केंद्रावर एके दिवशी नवीन मडळीशी परिचय करून देताना एका गुरुबधूनी माझा परिचय खालीलप्रमाणे करून दिला.

"श्री. रगराव कुलकर्णी याना पूज्य विनोबानी सद्गुरु पूज्य स्वामी स्वरूपा-नंदांचेकडे पाठवले." खरे म्हणजे पूज्य विनोबानी मला त्याचेकडे पाठवले नव्हते. मी थोडा ओशाळलो. किंचित् रागही आला. त्या दिवशी ध्यानास बसलो व खालील-प्रमाणे मला स्मरण झाले. १९५९ साली पूज्य विनोबाच्या बरोबर पदयात्रेत गुजरात-मध्ये होतो. त्याच्या सारख्या आतरराष्ट्रीय ख्यातनाम संताचे शिष्यत्व पत्करावे असा विचार माझे मनात आला. त्याच्या विचाराचा प्रचार तर मी अनेक वर्षांपासून पूर्वी केलेला होता, करीत होतो. त्याचे विचार स्वतःच्या तर्कावर कसून तपासून घेतलेले असल्याने ते माझे बनले. तेव्हा त्यांनी आणखी जवळ वात्सल्याने घ्यावे असे वाटून एक दिवस पहाटे चालत असताना स्पष्टपणे म्हणालो, "बाबा ! तुम्ही माझे गुरु व्हावे असे वाटते !" त्यावर चालण्याचा वेग थाबवून थोडे थबकून बोलले, "तू पहातोस की मी 'जगम' आहे. मी हे काम एकेकाळी केले आहे वल्लभस्वामी वगैरे मडळीना चागले तयार केले आहे. पण हल्ली हे काम मी करीत नसतो. तू गुरुमार्गात येणार आहेस पण त्याला वेळ यायची आहे. दक्षिणेकडे पश्चिम समुद्र किनाऱ्याजवळ एक तेजस्वी सत्पुरुष मला दिसत आहे." इतके बोलल्यावर काय झाले कुणास ठाऊक ? त्या अतींद्रीय दर्शनाकडे कोणाचेही ध्यान जाऊ नये या विचाराने की काय कोण जाणे

दुसऱ्याच मुद्यांची चर्चा छेडून त्यानी विषय बदलून टाकला. दुसऱ्या एका सहकाऱ्याकडे वळन ते माझ्या विषयी म्हणाले, " पूर्वजन्मीच्या दोषामुळे या बुद्धिमान मुलाला त्रास होत आहे. " पूर्वजन्माचे समजते वाटते या हेतूने आणखी गर्दी वाढायची या विचाराने पुन्हा विचाराचा ओघ दुसरीकडे वळवून पूज्य विनोबा मला म्हणाले, " तू बोधगयेला पायी जातोस का ? गावोगावी जावे हिंदीतून भाषण द्यावे. प्रचार करावा, पुढे चालावे. बोधगयेला पोहोचून तेथे तुला जेवढे दिवस राहायचे असेल तेवढे दिवस रहा ! " अर्थात मी विचारपूर्वक ही लाब पल्ल्याची पदयात्रा केली तेथे राहिलो. हा सर्व इतिहास माझे दृष्टिपुढे उभा राहिला. तेवढयात ध्यानप्रार्थना संपली होती. माझा राग गेला दक्षिणेकडे पश्चिम समुद्र किनाऱ्याजवळ चे सत्पुरुष म्हणजेच पूज्य सदगुरुमाऊली स्वामी स्वरूपानद ही भावना स्थिर झाली.

१९७३ साली एक दिवस पूज्य गुरुमाऊलीचा स्पर्श होईल तर बरे होईल या विचाराने खोलीत प्रवेश केला प्रसाद घेण्यासाठी मी खाली वाकून हात पुढे केला तर त्या हातावर खडीसाखरेचा प्रसाद देत असताना दाबून स्पर्श करून माझ्या तळहातावर पाची बोटे दाबून ठेवली. चागले अर्धा मिनिट तरी तशी ठेवली. मी तर आनंदाच्या सागरात बुडालो.

• • •

# सद्‌गुरूकृपेच्या सन्मार्गावर

**– श्री. रा. वा. गोडबोले, बेळगाव**

मी मोटर धद्यात १९४८ पासून आहे. स्वत:चा ट्रक मी स्वत.च चालवीत असे. ट्रकड्रायव्हर म्हणजे त्याला आध्यात्मिक ज्ञान काय असणार ? परतु ड्रायव्हर असून देखील मला कोणतेही व्यसन अथवा कसलाही वाईट नाद नव्हता. पुढे १९५६ मध्ये दुर्दैवाने स्वत:ची गाडी गेली व दुसऱ्याकडे ड्रायव्हर म्हणून काम करू लागलो. २९।३।६६ ला मी रत्नागिरीस बोटीचे लाकूड घेऊन गेलो होतो. तिथे मला स्वामीविषयी हकीगत समजली. गाडी खाली करून तियेच कौले भरण्यासाठी गाडी लावली आणि तसाच पुढे भाटयेस जाऊन पावस एस. टी. ने पावस येथे आलो.

श्री देसाई याचेकडे गेलो. तिथे मला श्री. मोहनराव गोडबोले भेटले. त्यानी सागितले की, " तीन दिवस झाले स्वामीजीचे दर्शन बद आहे. " मला वाईट वाटले. जवळच "स्वरूपाश्रम" आहे, आश्रम पाहणेस गेलो. त्यावेळी श्री. देसाई याच्या घरा-शेजारीच स्वरूपाश्रमाची व्यवस्था होती. आश्रमात जाऊन तेथे असलेले फोटो पाहात उभा राहिलो आणि सुमारे पधरा मिनिटानी मला बोलावणे आले मी दर्शनासाठी गेलो. स्वामीना नमस्कार केला. स्वामीनी मला बाकावर बसण्यासाठी खूण केली. स्वामीनी मला नाव विचारले, नतर त्यानी मला " श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ " हे छोटे पुस्तक आणि खडीसाखरेचा प्रसाद दिला. अशा तऱ्हेने प्रथम भेटीतच अमृताचा आनद मिळवून मी रत्नागिरीस परत गेलो.

पुढे त्याच वर्षी आणखी दोनदा मी पावसला गेलो. त्या वेळी देखील स्वामीनी मला तीच पुस्तके दिली. परतु माझ्या सारख्या एका ट्रक ड्रायव्हरला त्यामधले कितीसे बरे कळणार? परतु माझी आई ते जाणत होती. कारण ती स्वत: ज्ञानेश्वरीवर प्रवचने करीत असे. त्यामुळे मला ते पुस्तक वाचण्याची मनापासून इच्छा झाली. मी ते पुस्तक वाचून काढले आणि गाडीत ठेवून दिले. मी ते पुस्तक रोज वाचू लागलो व नकळत का होईना रोज काही वेळ भक्तिमार्गाकडे जाऊ लागला.

पुढे परत एकदा मी पावसला गेलो. स्वामीचे आडनाव देखील गोडबोलेच आहे. तेव्हा आपले कुलदैवत आणि कुलदेवी कोण कोण आहेत हे स्वामीना विचारावे म्हणजे

आपणास नक्की कळेल असे वाटले, म्हणून त्याना विचारणार होतो. परंतु स्वामीचे दर्शन घेतल्यानंतर त्यांनी मला एक कागद दिला. सोबत भावार्थगीतेचे पुस्तक व खडी-साखरेचा प्रसाद होता. मी कागद उघडून बघितला. त्यामध्ये कुलदैवताचे नाव, गाव सर्व कांही लिहिलेले होते. मी स्वामीना न विचारताच माझ्या प्रश्नाची उत्तरे कशी काय दिली ? त्याना कसे काय समजले ? असा विचार करत असतांनाच माझी स्वामीवरील असलेली श्रद्धा अधिकच दृढ झाली.

त्या दिवसापासून मी वर्षातून तीन वेळा पावसला जाऊ लागलो. प्रत्येक वेळी मला वेगवेगळी पुस्तके ' प्रसादभेट ' म्हणून मिळत होती आणि मी ती वाचून काढीत होतो. आता मला पहिल्या तीन दर्शनाच्या वेळी स्वामीनी तेच तेच पुस्तक का दिले होते याचा उलगडा झाला होता त्या पुस्तकाचे वाचन मी केले नव्हते म्हणून तेच तेच पुस्तक स्वामीनी मला प्रसाद रूपाने दिले होते. वरील घटनेमुळे माझे मन अधिकाधिक स्वामीजीकडे आकर्षले जाऊ लागले.

मी ज्या कपनीमध्ये नोकरीला होतो त्या कपनीमध्येच ड्रायव्हर म्हणून काम करणारे श्री. रा. रा. मालडीकर माझे स्नेही आहेत. आज ते त्या कंपनीत दहा वर्षे नोकरीस आहेत. एकदा त्यानी एका कपनीचा माल आणला असतांना त्या कपनीने त्यांना एक डाग (नग) कमी आहे अशा आशयाची पोहोच लिहून दिली. कंपनीने डागाचे ४५०० रुपये भरा असा श्री. रा. रा. मालडीकर याचे मागे तगादा लावला. मला वरील गोष्ट श्री. मालडीकरानी अत्यत कळवळून सागितली. मी त्याना सागितले की " स्वामीचेवर श्रद्धा ठेवा. तेच खरा मार्ग दाखवतील " आठवण म्हणून महिना दहा रुपये इमारत निधी (स्वरूपाश्रम) पाठवावा. त्या प्रमाणे ते महिना दहा रुपये पाठवीत असत चार महिन्यानतर ज्या इसमानी एक डाग (नग) कमी मिळाला अशी तक्रार केली होती. त्याच इसमाने " मला डाग मिळाला आहे तेव्हा श्री. मालडीकर याचे पैसे परत करा " म्हणून कपनीस पत्राने कळविले. श्री. मालडीकराचे पैसे परत मिळाले.

पुढे परत महिन्याने त्याचेच १२०० रुपये असलेले पाकीट बेगलोर येथे हरविले. परत श्री. मालटीकरानी मला ही गोष्ट सागितली. परतु श्रीमन् सद्गुरू स्वामींवर त्याची श्रद्धा होती. ते पैसे देखील श्री. मालडीकर याना २०० रुपये कमी करून १००० रुपये मिळाले. श्री. मालडीकर याची देखील वरील घटनेपासून स्वामीवर नितांत श्रद्धा बसली. वरील घटना श्री. मालडीकर यानी त्याच्या " दि कोल्हापूर कझ्युमर्स सोसायटी, बगलोर " येथील शाखेचे मॅनेजर श्री. दिवाण याना सागितली. ते ऐकल्यानंतर श्री. दिवाण यांनी पावस येथे जाऊन स्वामीचे दर्शन घेतले व स्वामीजीनी अनुग्रह दिल्या-नंतरच ते बंगलोरला परत गेले.

पुढे मी स्वामीच्या प्रेरणेने बेळगाव येथे १९६८ साली आलो आणि ड्रायव्हरचे काम सोडून "साई ट्रान्स्पोर्ट कंपनी" या नावाने ट्रान्सपोर्ट ऑफीस चालू केले. ऑफीस चालू करते वेळी माझेकडे केवळ २२ रुपये होते. परंतु मी केवळ गुरुमाऊलीच्याच प्रेरणेने काम चालू केले होते. म्हणून अत्यंत कमी भांडवल असले तरी खचलो नाही आणि स्वामीच्या कृपादृष्टीमुळेच ऑफीस अत्युत्तम स्थितीत चालू आहे व मला कोणत्याहीं. गोष्टीची कमतरता नाही आज माझी ही संपन्न स्थिती हा केवळ स्वामीजीचाच प्रसाद आहे

ऑफिस उत्तम चालू असलेने मी पुढे लवकरच किल्ल्यामध्ये असलेल्या बगल्या-मध्ये भाड्याने रहाण्यास आलो आता आणखी थोडा धंद्याचा व्याप वाढविला पाहिजे. मुलासाठी पुढली काही तरी व्यवस्था केली पाहिजे असे वाटत असे. मी पावसला गेलो होतो आणि श्रीमत् सद्‌गुरु स्वामीना विचारले "आपल्या नावाने मी दुसरे ऑफिस काढावे म्हणतो आहे आपली अनुमती आहे का? तेव्हा त्यानी मला त्याच्या नावाने ऑफिस चालू करायला अनुमति दिली. परतु त्यानी मला माझ्या तब्येतीला झेपेल येवढाच व्याप वाढवण्याची सूचना श्री. देसाई याचेकडून पत्र लिहून कळविली. वास्त-विक मला कांही आजार आहे, तब्बेत ठीक नसते हे त्याना ठाऊक नाही तथापि पत्रातून तब्येतीस जपून व्याप वाढवावा ही स्वामीची सूचना होती.

आमचे घरमालक......माझेकडे नित्य येतात. ते दररोज मी स्वामीच्या फोटोसमोर बसून ध्यानधारणा वगैरे केलेले बघत. कुठलेही देवाचे नाव हे मनातल्या मनात घेऊ नये तर शक्य तेवढ्या मोठ्या आँवाजात घ्यावे तरच आपली कूड (देह) शुद्ध होते अन्यथा नाही असे त्याचे ठाम मत होते. वरील गोष्ट त्याना त्याच्या गोव्यातील एका स्वामीनी सागितली होती. वरील वाक्ये ऐकल्यावर मला अत्यत वाईट वाटले. एकदा घरमालक म्हणाले की त्या गोव्यातील पवित्र स्थानावर जाऊ चला तेव्हा मी त्यांना एवढेच म्हणालो की योग्य वेळ येऊदे मी तेथे नक्कीच जाईन.

पुढे एके दिवशी मी दुपारी झोपलो असताना साधारण ३।। ते ४ याच्या दरम्यान मला एकदम प्रेरणा मिळाली. " ऊठ योग्य वेळ आली आहे. " असा आदेश झाला. ताबडतोब मी उठलो. स्वामीचा आदेश मिळाला आहे; त्याची आज्ञा झाली आहे. याचा मला त्वरीत खुलासा झाला. वरील गोष्टीची साधारण कल्पना मी घरी दिली आणि दुसरे दिवजी गाडी काढून चार लोकाना बरोबर घेऊन गोव्याच्या स्वामीकडे प्रयाण केले.

तेथे गेल्यावर मी आमच्या घरमालकाच्या स्वामीना भेटलो. आमच्या घर-मालकाना त्या महाराजानी असे सागितले होते की " तुमच्या घरातील सर्वजण तुमच्या वाईटावर आहेत. तुमचे वडील, भाऊ, बहीण सर्वजण पैशासाठी तुमच्यावर मत्रप्रयोग करतात. भाऊ, बहीण, वडील किवा कोणत्याही नातेवाईकाकडे काहीही खाऊ अगर जेऊ नका. ते परान्न आहे."

मी वरील प्रश्नांबाबत योग्य ती उत्तरे स्वामीना देण्याबाबत सांगितले. वर उल्लेख केलेल्या गोष्टी सचारामधून त्या स्वामीनी वदविल्या होत्या. मी त्या स्वामीना तुम्ही असे कसे विचारलेत ? आणि बोललात ? असे म्हणालो. स्वामीला इराणी हॉटेलात जेवलेले चालते. हे कसे काय ? असा त्यांना प्रश्न केला. स्वामी निरुत्तर झाले. मी त्यांना पुढील प्रश्न खालीलप्रमाणे केला–

बायकोला न सागता न विचारता आपले काम करावे असे सागून सोन्या-चादीचे दागिने आटवून त्याची विक्री करायला लावून आलेले पैसे भक्ताचे – अर्थातच आमच्या घरमालकाचे तुम्ही कसे काय घेतलेत ? शेतीभाती विकण्यास सागून विकायला लावून पैसे घेतलेत हे कसे काय? तू उद्योग न करता हजारो रुपये मला कसे काय देतोस, असा तुम्ही तुमच्या भक्ताला का प्रश्न केला नाही ? देवासाठी घरदार, मुलेबाळे, बायको वगैरे सर्व सोडावेच लागते. अन्यथा देव भेटतच नाही असे तुम्ही तुमच्या भक्ताला का सांगितलेत ? वरील सर्व प्रश्नानी स्वामी निरुत्तर होते. नतर मी त्यांना पुढील प्रश्न केला–– " जो मनुष्य खिशातील एक पैसा खर्च करायचा झाला तर हजार वेळा विचार करतो तो एकदम एवढी रक्कम तुमच्याकडे कशी आणून देतो " हे सागा. यानंतरही मी आणखी त्यांना प्रश्न केले. मी त्याना विचारले–– की तुमच्या पायाशी गोव्याचे श्रीमगेश आहेत म्हणे. पंढरीचा पाडुरंग देखील तुमच्या पायाशी आहे, असे तुम्ही म्हणालात. प्रत्यक्ष देवच तुमच्या पायाशी आहेत म्हणून गादीखालून हजारो रुपयाच्या नोटा काढता असे ऐकले आहे; तेव्हा एखादे तरी नोटाचे बडल आता काढून दाखवा. तुम्ही तुमच्या भक्ताला त्याचे घर का मोडायला लावलेत, संत लोक ससार मोडत नसतात. सर्व लोकांना प्रेम देतात व शिकवितात. तेव्हा तुमची ही असली कसली शिकवण? अशी प्रश्नाची सरबत्ती केली. परंतु एकाहि प्रश्नाचे त्या स्वामीनी योग्य उत्तर दिले नाही.

नंतर मी त्या स्वामीचा बनवाबनवीचा प्रकार आमच्या घरमालकाना सागितला. त्यांना देखील संचार वगैरे खोटा आहे, हे पटले. आपण जो महाराज म्हणत होतो तो महाराज नव्हे तर तो एक तोतया आहे व जादूगार आहे हे त्याना पटले.

जे गृहस्थ संसारात लक्ष घालत नव्हते जे अखड ९–१० वर्षे अंधारात होते; त्यांनी सर्व घरदार त्या स्वामीच्या पायात मोडले होते, तेच गृहस्थ आज संसारात आनंदाने आहेत. सर्वजणाबरोबर एकत्र राहात आहेत. हे सर्व केवळ स्वामी स्वरूपानंद यांच्या कृपेनेच झाले, असे त्यांचे ठाम मत झाल्याने आज त्यांची देखील स्वामीवर श्रद्धा बसली आहे.

तेव्हा अशा तऱ्हेने संकटात सापडलेल्या आमच्या घरमालकांच्या घटनेचा शेवट श्रीस्वामी स्वरूपानंद यांच्या कृपादृष्टीमुळेच अत्यंत गोड झाला आहे.



## पाडव्याची तिथि – संत पातले पंगतीं !

**–सौ. काशीबाई ऊर्फ कालिंदीबाई बाळकृष्ण इनामदार, कोल्हापूर**

**माऊलींचे मला कोल्हापूर मुक्कामी पत्र आले. तो पाडव्याचा दिवस होता. ते पाकीट पाटावर येऊन पडले. मला वाटले श्रीस्वामीच पाटावर येऊन बसले आहेत.**

लहानपणापासून मला परमेश्वरभक्तीची फार आवड. त्या आवडीमुळे आपल्याला कोणी तरी गुरु भेटावा अशी इच्छा झाली. त्यानंतर माझी श्री. दादा पंचवाघ, सौ. माई पचवाघ यांच्याशी ओळख झाली. त्या दोघानीही गुरुमाऊलींचा अनुग्रह घेतला आहे. त्यामुळे मला सद्गुरूविषयी अधिक तळमळ लागून राहिली. माऊलीच्या अनुग्रहाचा लाभ मला केव्हा लाभेल याची वाट पाहात राहिले.मी पावसला पत्र लिहिले.

माऊलीचे मला कोल्हापूर मुक्कामी पत्र आले. तो पाडव्याचा दिवस होता. पानावर बसायच्या सर्वजण तयारीत होते, इतक्यात पोस्टमनने एक पाकीट टाकले. ते नेमके पाटावर येऊन पडले. ते पाहिले तर पांवसच्या गुरुमाऊलीकडून आलेले होते. त्या पत्रात मला अनुग्रहासाठी पावसला बोलावणे केलेले होते. तो पाडवा मला अतिशय महत्त्वाचा वाटला. कारण त्यावेळी स्वामी घरी येऊन पाटावर बसल्याचा मला भास झाला. त्यावेळेपासून स्वामीच्या कृपेने पुढचे दिवस आम्हांला आनंदाचे आले.

त्यानंतर पंधरा दिवसातच सौ. माई पंचवाघ, मामी आणि माझा मुलगा असे अनुग्रह घेण्यास पावसला गेलो. जातांना सर्व प्रवासात मला अनुग्रह केव्हा मिळेल किवा मिळणार नाही अशी शका येत होती. कारण अनुग्रह दोघांनी मिळून घ्यावा असे काहीच्या म्हणण्यात येई. दापत्य असल्याशिवाय अनुग्रह देत नाहीत असेही कांही म्हणत, परतु माझ्या गुरुमाऊलीचे प्रेम फार वेगळे होते. आम्ही पांवसला पोचलो. दर्शनाची वेळ संपली होती. तरी माऊलीच्या मनात दर्शन देण्याचे होते. माझ्या मनाचा सकल्प होता–माऊलीचे दर्शन घेतल्याखेरीज अन्नग्रहण करावयाचे नाही.माझा संकल्प माऊलींनी ओळखला आणि आम्हाला दर्शनाला बोलावणे केले. मी स्वामीचे खोलीत पाऊल टाकले.

आत जाताच प्रसन्न वाटले. माऊलीचे दर्शन होताच पोट भरून आले. कोमल स्वरात माऊलींनी सागितले. " बाळ, तू जेवून घे. चार वाजता मी तुला बोलावतो. " दर्शन घेऊन आम्ही बाहेर आलो. श्री. भाऊराव देसाईंकडे जेवण घेतले. ते जेवण म्हणजे अमृतपानच वाटले. माऊलीच्या सल्ल्याप्रमाणे चार वाजेपर्यंत विश्राती घेतली. त्यावेळी मला गाढ झोप लागली.

त्यानंतर चार वाजता स्वामीचा निरोप मला मिळाला मला प्रथम भीति वाटली स्वामी आपल्यास काय विचारतील या विचाराने मी घाबरून गेले. तेव्हाच न विचारता माऊलींनी मला मत्रोपदेश सांगितला. माझे मन हलके झाले. नंतर मी माझी सर्व परिस्थिती गुरुमाऊलीचे कानावर घातली.

आम्ही पावसला जाताना तिघेही बरोबरच निघालो. परंतु भाटयास माझ्या मुलास पांवसला जाणाऱ्या गाडीत जागा मिळाली नाही. तो मागाहून येणाऱ्या गाडीने येणार होता परंतु पांवस येथे त्याची कोणाशी ओळख नव्हती. आम्ही तर पुढे निघून गेलो होतो. स्वामीस माझा मुलगा मागे राहिला आहे असे बोलत होतो. दुसऱ्या गाडीने, तो आला, त्यावेळी आम्ही माऊलीचे घरी होतो. मुलगा स्वामीचे दर्शनास गेला त्यावेळी त्यांनी 'काशीबाईचाच मुलगा काय' ? म्हणून त्यास विचारले व आम्ही होतो त्या ठिकाणी पोचविण्यास सागितले. त्यावरून आमची खात्री पटली की माऊली सिद्ध पुरुष आहेत.

आता आमच्या घरातील सर्व मंडळींनी स्वामीचा अनुग्रह घेतलेला आहे आम्हा सर्वांची त्याचेवर भावभक्ति आहे. आमच्या अडचणीच्या वेळी माऊली हजर असते. त्याच्या आशीर्वादे सर्व कामे होत आहेत. त्याचे आम्हा सर्वांवर अखड आशीर्वाद असोत.



# मौनजपाचे गंगास्नान

—श्री. का. नी. जोशी (आण्णा), पुणे

**शिक्षकाविषयी बोलतांना स्वामींना नेहमीच आपुलकी वाटे. पण त्यातल्या त्यात मी बालवर्गच शिकवणारा नव्हे तर निष्पाप आणि निरागस अंतःकरणाच्या बालरूपी साधनेत मला विशेष आनंद वाटतो हे स्वामीना विशेष जाणवले व त्यांनी विशेष आपुलकीने माझी वास्तपुस्त केली.**

मला श्रीस्वरूपानद स्वामीचे प्रथम दर्शन १९५७साली झाले मी भारत प्रवासी यात्रा कपनीबरोबर पावसला गेलो होतो. प्राथमिक नमस्कार चमत्कार झाल्यानंतर ते प्रत्येकाशी वैयक्तिक बोलू लागले. येता येता माझी पाळी आली. मी एक प्राथमिक शिक्षक असून उभी हयात फक्त बालवर्ग शिकविण्यात घालवतो हे ऐकून त्याना एक प्रकारचे समाधान वाटले शिक्षकाविषयी बोलताना स्वामीना नेहमीच आपुलकी वाटे. पण त्यातल्या त्यात मी बालवर्ग शिकविणाराच नव्हे तर निष्पाप आणि निरागस अंतःकरणाच्या बालरूपी परमेश्वराच्या साधनेत मला आनद वाटतो हे विशेष महाराजाना जाणवले. व त्यानी विशेष आपुलकीने माझ्या जीवनाची वास्तपुस्त केली. ‘सजीवनी गाथा’ हे पुस्तक माझे हातात देऊन वाटेल तो श्लोक काढून वाचावयास सागितले. नतर म्हणाले, “तुमच्या जीवनाची सार्थकता आध्यात्मिक मार्गाने पूर्ण होणार आहे. त्याकरिता लागणारे सर्व मार्गदर्शन तुम्हाला घरीच लाभेल.” असा आशीर्वाद दिला. त्यावेळी मी पूर्ण सासारिक असल्यामुळे या आशिर्वादाचा मला कोणत्या जन्मी फायदा मिळणार कोण जाणे, अशा सभ्रमात मी प्रसाद घेऊन बाजूला झालो. माझ्यानतर काही वेळाने एका शिक्षिकेची दर्शनाची वेळ आली. जावे न जावे या सभ्रमात त्या बाई पुढे जाऊन बसल्या. साधुपुरुषाच्या दर्शनाचा फायदा काय, कसा व केव्हा होतो, या संबधाने महाराजानी त्या बाईस उपदेशिले. यापूर्वी त्या बाई अत्यंत संशयी, चिकित्सक, नास्तिक वृत्तीच्या होत्या. त्यानी महाराजाचा उपदेश ऐकल्यावर पुढे त्याचे वृत्तीत हळूहळू फरक होत गेला हे मी प्रत्यक्ष पाहिले, अनुभवले. तेव्हा माझ्या त्या जीवनातला सभ्रम हळूहळू कमी होऊन मी आध्यात्मिक जीवनाकडे जरा डोळसपणे वळू लागलो.

पुढे १९६२–६३ मध्ये पुन्हा दर्शनाचा योग आला. तेव्हा माझ्यातील फरक महाराजांना जाणवला आणि त्यांनी संसार हा कसा मायिक आहे, यातूनच आत्मोन्नतीचा मार्ग सुलभतेने कसा काढावयाचा यासंबंधी थोडे विवेचन केले. मलाही जीवनात आपण काही तरी आध्यात्मिक उन्नतीचा मार्ग गाठीत आहोत व गाठणार आहोत असा आत्मविश्वास वाटू लागला.

पुढे १९६६ साली मी ससारातून पूर्ण मुक्त झाल्यावर श्री. योगीराज गुळवणी महाराजाच्या अनुज्ञेने परमपूज्य श्री. दादासाहेब नखाते याचेकडून दीक्षा घेतली व साप्रदायाप्रमाणे ध्यानाला बसू लागलो. त्यात श्रीपरमहस परिव्राजकाचार्य वासुदेवानद सरस्वती याचे दर्शन घडून त्यानीच दिलेल्या जपानुष्ठानात वृत्ती तल्लीन होऊ लागली; तेव्हा १९६७ साली पुन्हा पावसला जाण्याची सुसधी मिळाली. महाराजाचे दर्शन झाले पण लाबूनच. यावेळी ते काही बोलू शकले नाहीत. फक्त नजरेनेच काही आदेश दिल्यासारखे वाटले. जपानुष्ठान नित्यनियमाने चालू होतेच. स्वामीनी दिलेला आठ कोटी जप पूर्ण करावयाचा होता. १९७४ साली ५ कोटि जप पूर्ण झाला होता. मनाचा उल्हास वाढत होता. अंत:करणाची ठेवण बदलली होती, आचारविचार खूपच उन्नत झाले होते. अशा वेळी एके दिवशी पहाटे ध्यानाला बसलो असता मला स्वामीचे दर्शन घडले स्वामी मजकडे आले आहेत. अत्यत क्षीण दिसताहेत मला म्हणाले, "या आग्नेय कोपऱ्यात मला अथरुण घालून दे." मी अथरुण घालून दिले. तक्क्या, उशा आजुबाजूस ठेवल्या आणि काही अतरावर हात जोडून उभा राहिलो स्वामीनी जवळ बोलावले व मोठ्या कष्टाने उजव्या हाताची तीन बोटे मजपुढे धरली. मला त्याचा अर्थ उमजेना म्हणून मी विनती केली की, 'आपण काय सुचविता हे लक्षात येत नाही.' तेव्हा स्वामी म्हणाले, " तीन दिवस मौन धरून जेवढा जप होईल तेवढा तू मला देशील ? " मी एकदम 'हो' म्हणून कबूल केले. ध्यानातून भानावर आल्यावर स्वामीचा दर्शनदृष्टान्त परमपूज्य दादासाहेब नखाते याना जाऊन सागितला. ते म्हणाले, " हा अति उत्तम दृष्टान्त तुम्हाला झाला आहे. तुम्ही तो ताबडतोब पूर्ण करा. उद्या सोमवार आहे. उद्याच बसा जपाला. कालच मला श्री. प प. सत्यदेवानदाचे पत्र आले आहे आणि त्यात स्वामी स्वरूपानद हे अत्यवस्थ स्थितीत आहेत असा उल्लेख आहे. तुम्ही ताबडतोब तीन दिवसात होईल तो जप करून त्याना अर्पण करा. " मी सर्व योजना करून दुसऱ्याच दिवशी जपानुष्ठानाला बसलो. वेळही भरपूर ठेवला होता. पहाटे ५ ते रात्री १-३०. अधूनमधून थोडी विश्राती घेत असे. पहिल्या दिवशी ४०००० जप उरकून मी झोपण्यापूर्वी ध्यानाला बसलो. तोच महाराज ध्यानात आले. उजव्या बाजूस पाठीशी उभे राहून विचारते झाले, " काय आटोपले ? " मी मागे वळून ताबडतोब "होय" सागितले. वास्तविक हा एकच दिवसाचा कार्यक्रम पुरा झाला होता. अद्याप दोन दिवस शिल्लक होते. पण माझा होकार ऐकून महाराज म्हणाले, " चला

आता आपण गंगास्नानाला जाऊ." व त्यांनी मला प्रयागला नेले. संगमांत गर्दी बर
असल्यामुळे महाराज म्हणाले, " चला आपण गगास्नान करू." असे म्हणून दारागंजच
पुलाकडे आम्ही दोघे वळलो. पुलाच्या मध्यापर्यंत आल्यावर महाराज विचारता
'काय, पोहता येते?' मी होकार दिल्याबरोबर म्हणाले, "चला, करा स्नानाची तयारी
मी कपडे काढून लगोट नेसून गगेत उडी मारण्यास तयार झालो. तोच स्वामी महारा
म्हणतात, " थांब, अशा महानद्या पात्राच्या मध्यावर उथळ असतात आणि कडे
खोल असतात. तेव्हा त्या कडेला जाऊन उडी मार." मी पळत कडेला गेलो. गंगेत उ
मारली व पोहत पोहत मध्यावर येतो तो खरेच छाती एवढे पाणी. मी त्या ठिका
येऊन उभा राहिलो तोच महाराज माझे वरचे बाजूस पाचसात हातावर गंगेत उ
आहेत व स्नान करीत आहेत. त्याचेकडून येणारे पाणी हेच तीर्थ समजून मी त्य
आंघोळ केली. तोच महाराज जवळ येऊन, आई जसे लेकराला चोळूनमाखून न्हा
घालते तसे महाराजांनी मला स्नान घातले आणि ओंजळीत पाणी देऊन काही म
म्हणून मजकडून तीन अर्घ्य देवविले आणि 'चला आता घाटावर' अशी आज्ञा दिल
मी घाटाकडे पोहत जाऊ लागलो तेव्हा म्हणाले, " वहात्या पाण्यात पाण्यावर तरंग
जावे आणि निघण्याचे ठिकाण जवळ येताच दोन हात मारावेत म्हणजे कष्ट होत नाहीत
मी प्रवाहाबरोबर तरंगत जाऊ लागलो व निघण्याचे ठिकाण येताच दोन हात मार
पाण्याजवळ आलो. सातआठ पायऱ्या चढता चढता माझ्या डोक्यात विचार आल
आपले कपडे पुलावर आहेत तेथपर्यंत आपल्याला ओलेत्यानेच जावे लागेल. पण पायऱ
चढून वर येतो तो माझे कपडे तेथे आहेत व त्याचे मागे गुडघ्यापर्यंत पचा नेसून महारा
उभे आहेत. त्याच्या डाव्या हातावर एक कोरे पिताबराचे फडके आहे आणि उजव
हात मोकळा आहे. महाराज म्हणाले, 'घाला कपडे. आता आपण मुक्कामावर जाऊ
माझे कपडे घालून होताच महाराजानी हवेमध्ये उत्तरेच्या बाजूला एक लचका, पूर्वेच
बाजूला एक व दक्षिणेच्या बाजूला एक असे लचके मारून एक कवठाएवढा गोळा तया
केला आणि तो त्या पितांबराचे फडक्यात गुडाळून " हा घे तुला प्रसाद " म्हणून मा
हाती दिला. तो मी हातात घेऊन पहातो तो शिश्यासारखा जड व त्यातून निळे, गुलाब
स्पार्क-ठिणग्या बाहेर जोराने येत आहेत असे दिसले. केवळ हवेत मारलेल्या लचक्याच्य
गोळ्याला एवढे वजन यावे आणि त्यातून अग्नितुल्य स्फुल्लिग बाहेर पडावेत.पण गोळ
मात्र हाताला थड लागावा हा काय चमत्कार आहे म्हणून मी प्रश्नार्थक दृष्टीने मह
राजाकडे पाहू लागताच ते वळले व 'चला आपण निघूया' म्हणाले. आम्ही गर्दीत मार
पुढे चालता चालता त्यांची माझी चुकामूक झाली. म्हणून मी घाईने पुढे जाऊन एक
उंचवटयाचे उजव्या बाजूस असलेल्या दत्तमंदिराचे ओटयावर गर्दीत महाराजा
शोधत उभा राहिलो. इतक्यात पाठीमागून आवाज आला, " काय पहातोस रे! " म
मागे वळून पहातो तो प.प. वासुदेवानंद सरस्वती व त्यांचे समवेत एक फेटा असलेल
दाढीवाला आणि पोटऱ्याखाली पाय बारीक अशी एक व्यक्ती पाठमोरी दिसली

मी महाराजांना ओळखले व म्हणालो, 'मी स्वामी स्वरूपानंद महाराजां बरोबर आलो होतो, पण गर्दीत त्यांची माझी चुकामूक झाली.' प.प. वासुदेवानंद सरस्वती म्हणाले, " चल, आम्ही तुला पोहोचवितो " असे म्हणून ते दोघे पुढे चालू लागले व मी त्यांचे पाठीमागून निघालो, तोच भानावर आलो.

या दृष्टातातील तो पीताबराच्या फडक्यात गुडाळलेला गोळा, त्यातून निघणारे स्फुल्लिग आणि अद्याप दोन दिवसाचा कार्यक्रम पुरा व्हावयाचा असून महाराजांनी दिलेला प्रसाद हे काय गौप्य आहे, याचे मथन चित्तात बराच वेळ झाले. पण बोलावयाचे नसल्याने आणि विचारावयाचे तरी कोणास? तेव्हा याचा खुलासा परमपूज्य दादासाहेब नखाते यानाच विचारू आणि या प्रासादिक सभाषणानेच मौन सोडू असे ठरविले. आणि पुतण्याबरोबर श्री. दादासाहेब नखाते याचेकडे निरोप पाठविला व विचारणा केली की मौन कसे सोडावयाचे ? तेव्हा निरोप आला की मौन सोडावयाचे काही विशेष नियम नाहीत. पण चित्ताला ते पटेना. दुसऱ्या दिवशीचा ४०००० जप, पूर्ण झाल्यावर रात्री झोपण्यापूर्वी ध्यानाला बसलो. तो स्वामी ध्यानात आले व म्हणाले "एखादा पवित्र ग्रंथ वाचून मौन सोडावे किवा सत्पुरुषाशी बोलून मौन सोडावे किवा निरागस बालकाशी बोबड्या बोलात बोलून मौन सोडावे." या तीन रीती स्वामीनी निवेदन केल्या. सद्ग्रंथ वाचन करण्यास दृष्टीची अनुकूलता नाही. तेव्हा सत्पुरुषाशी बोलण्याकरिता म्हणून श्री. दादासाहेब नखाते याना गुरुवारी सकाळी ७-३० वाजता बोलवावे आणि त्यानाही वेळ जमला नाही तर आपल्या नातवाशी बोलावे असा विचार केला. पण दादासाहेब यास निरोप कळताच ते बरोबर ७-२० लाच आले. माझी जपसख्या सव्वालाख पूर्ण होऊन मी देवाची आरती आटोपून व दादासाहेब याचेशी या उत्तमोत्तम दृष्टान्त सागण्याच्या निमित्ताने बोलून मौन सोडले. चित्तात घोळत असलेला प्रश्न मी त्याना विचारला. त्यानी त्याचे समर्थन केल्यावर माझे जीवन कृतार्थ झाल्याचा आनद मला झाला. सर्वानी मला जीवनात कृतार्थ केले. तो अर्थ असा. परमपूज्य नखाते म्हणाले, " स्वामीनी हवेत जे तीन दिशास तीन लचके मारले ते सत्-चित-आनद जमविण्याकरता आणि त्याचा घन करून तो विष्णूच्या पवित्र वसनात गुडाळून तुम्हाला सत्-चित्-आनद घनाचा प्रसाद दिला. तुमचे जीवन कृतार्थ आहे. "

या प्रसादाचा आणखी काही अर्थ निघतो का, याचे कुतूहल वाटून मी हा घडलेला दृष्टान्त परमपूज्य काणेमहाराज, बेळगाव आणि पावस येथे महाराजाचे दरबारी कळवला. त्याचेवर परमपूज्य काणे महाराज याचेकडून पुढीलप्रमाणे उत्तर आले. 'सद्गुरु सच्छिष्याला बोटाशी धरून कसे आनदमय करतात त्याचाच हा प्रत्यय आहे. पावसहून उत्तर आले– त्यात उल्लेख होता की जो मला ध्यानात स्पष्ट दिसत होता तो असा–महाराज अत्यवस्थ स्थितीत असून एका अगावर झोपले आहेत. मध्ये पाथरे

आडनावाचे गृहस्थ बसले आहेत. त्यांचे समोर पंधरावीस लोक बसले आहेत. पाथरे हा दृष्टांत वाचून दाखवीत आहेत. ते पधरावीस लोक विस्मित होऊन ऐकताहेत आणि महाराज सावकाश तोड फिरवून मोठ्या कष्टाने हात उचलून हास्यवदनाने आशीर्वाद देत आहेत आणि हाच मजकूर पावसचे दरबारातून आलेल्या पत्रात होता. मी जीवनात कृतार्थ आहे.



# गुरुवचने – माझी श्रुतिस्मृति

–सौ. सुशिला ग. दिवाण, पुणे

**" चालतिल सदगुरू त्या मी पंथे जाईन**
**उमटतील पाऊले त्या मी धुळीत न्हाईन "**

"ह्या दोनच ओळीत माझे जीवन क्षितीज विस्तारत आहे त्या गुरुचरणाच्या सोबतीने मला इथला खेळ खेळायचा आहे म्हणून सद्‌गुरूना सागूनच काही लिहायचा प्रयत्न करते तशी 'आण' घेतल्यावाचून मला काही लिहिणे शक्यच नाही कारण यापुढे मला त्याच आधाराने जगायचे आहे, आणि शेवटी गुरुरूपात एकरूप होऊन जायचे आहे. "

१९६९ च्या एप्रिलचा दीपलक्ष्मीचा अंक वाचून आम्ही पावस गाठलं. त्याच वेळी आमच्या जीवनात अखड वैभवाच्या लाखलाख दीपज्योतीची रोषणाई झाली. त्या रोषणाईत डोळे दिपले नाहीत तर समाधानाने तृप्त झाले. श्रीस्वामीच्या खोलीत प्रवेश केला आणि त्या सतेज, सुदर श्रीमूर्तीला पाहिले तोच तिथे एका तेजावाचून दुसरे काहीच दिसले नाही. मला ते सहन करणेही शक्य नव्हते. श्रीनी आपल्या मृदु-मधूर शब्दानी मोजक्या वाक्यात आमची चौकशी केली. प्रसाद-भेट म्हणून काही छोटी पुस्तके दिली आणि प्रसाद म्हणून डबा ठराविक पद्धतीने हलवून प्रत्येकाला खडीसाखर दिली. त्या प्रसादातही काही विलक्षण सामर्थ्य आहे. तिथे मुक्कामाची सोय असते हे माहीत नसल्याने आम्ही पुळयाला जाण्यास निघालो; पण मागे मन रेंगाळत होते. हे जाणवत होते. पुळयाचा समुद्र पाहताना पावसच्या खोलीत सोऽहं नादात रगलेल्या शाती सागराची ओढ मनाला खेचून घेऊ लागली आणि त्या दोन सागराच्या दर्शनाने पावन होऊन पुण्याला आलो काही तरी हुरहूर वाटू लागली सागराजवळ जायचे आणि त्यात न्हाऊन न निघताच केवळ दर्शन घेऊन परत यायचे असाच प्रकार घडला होता परब्रह्म सद्‌गुरु खूप द्यायला समर्थ होते. पण ते पेलायला तेव्हा माझीच ओजळ अपुरी होती प्रसाद घेताना झालेल्या स्पर्शाने आगळीच सवेदना जाणवू लागली आपली गुरुमाऊली कोण हेही माऊलीनीच सागावे इतके अज्ञान आमचे ! पण सगळे अपराध क्षम्य मानून प्रेमाने जवळ घ्यावे हा सद्‌गुरुचा सहजस्वभाव. तेव्हा मीही माझी त्याच्या भेटीची तळमळ गुरुदेवाना पत्राने कळवली व आता तुम्हीच एक

समर्थ आहात या भवसागरातून सोडवायला असे लिहिले. आठदहा दिवसांनी पत्र आले की, 'सवडीने थोडा वेळ थांबण्याच्या दृष्टीने यावे.' नतर लिहिले होते की 'सर्व प्रापंचिक कर्तव्ये शाततेने व हरिस्मरणपूर्वक करावीत.' 'श्री'नी पहिल्याच पत्रातील अनेक शब्दाचे सामर्थ्य माझ्या ध्यानी आणून दिले. 'सवडीने' हा एक शब्द मला 'घाई करू नये' प्रवास लांबचा तेव्हा घरची सोय पाहून यावे इतके सागून गेला. तसेच प्रपंच अन् परमार्थ हे भिन्न वाटले तरी त्या सकुचित प्रपचाला विशाल परमार्थाचे रूप द्यायला शीक असेच सुचवून दिले. सिद्धाच्या शब्दामागे स्वानुभवाचे तप असते. मी पुन्हा १९७० च्या एप्रिल महिन्यात पावसला गेले साप्रदायिक परंपरेची अक्षरे असलेली प्रार्थना मला बाकावर बसून म्हणायला सागितली. सोऽहं प्रक्रिया स्वत: करून दाखविली व करवून घेतली. आणि हलक्या स्वरात म्हणाले, 'रोज प्रार्थनेला बसताना वरील सर्वांना बोलावून त्याच्या मागे आपण बसायचे' किती गोष्टी समजावून द्यायच्या! आजही सगळी समोर आहेत असे बघताना त्याच्या मागे बसताना मला अवर्णनीय आनंद होतो. साधना 'सहज' असावी असा एकच शब्द पुढे सांगितला. त्या 'सहज' शब्दाने मी श्रीचरणी विनम्र झाले त्या वेळचा तो 'सहज' आज मला वारवार जाग देतो.

गेल्या चार वर्षात दिवाळीची व मे ची सुट्टी पावस पढरीच्या वारीवाचून सरली नाही प्रत्येक भेटीत नवीन गोडी चाखायला मिळायची. खोलीत बोलावून नुसते दर्शन दिले तर भेट सफल झाल्याचा आनद व्हायचा त्या वातावरणात असले तरी समाधान होई 'श्री'च्या मौनानीच खूप शिकवले जायचे. एका सुट्टीत माझी ही वारी काही कारणाने चुकली पण त्यामुळे अस्वस्थ वाटू लागले एक दिवसात पावसला गेल्यावाचून आपण इथे राहूच शकणार नाही असे झाले आणि तसे घरात सगळ्याना मी बोलून गेले. अशी तळमळ होण्याची ही पहिलीच वेळ! कसलाच विचार न करता मी स्वामीच्या फोटोसमोर उभी राहून त्याना म्हटले, 'तुम्ही भक्तासाठी धाव घ्या आणि चमत्कार करून मला घेऊन जा' हे चार वर्षापूर्वी बोलले ह. सगळे अज्ञानच त्याना साक्षात् परब्रह्म म्हणायच आणि असल काही मागायच. त्यानी माझा शुद्ध भाव जाणून मला चार दिवसाच्या आत पावसला जाण्याचा योग आणला घरी मी सगळ्याना म्हटले मला स्वामीचा फोन आला तर कुणाला खरे वाटेना अतर्यामीचा फोन कुणाला कळणार? मी ससारात सतत घुटमळणारी. त्यावेळी अलिप्तपणाने गाडीत बसून पावसला पोचलेसुद्धा. 'श्री'च्या खोलीत गेले आणि अश्रूचा अभिषेक सुरू झाला. मी त्याच्याजवळ जाऊन म्हटले, "मी चमत्कार करा असे पुन्हा कधी म्हणणार नाही." माझा देव भक्ताना अतिम कल्याणाचा, स्वरूपज्ञानाचा मार्ग दाखवणारा आहे त्याला भक्ताच्या भावासाठी असल्या क्षुल्लक गोष्टी पुरवाव्या लागतात पण हे खऱ्या भक्ताला न शोभणारे. हे मला नतर कळले म्हणूनच मी पुन्हा कधीच अशाश्वत गोष्टीसबंधी बोलले नाही. चारपाच दिवसाच्या मुक्कामात मला साधनेसबधी काही सागणे झाले.

मला नित्यजीवनात एकदोन गोष्टी लक्षात ठेवायला सांगितल्या. त्याचं सतत स्मरण राहणे आवश्यक म्हणून तेच वाक्य रोज एकदोनदा सांगत. हळुवार स्वरात बोलले, ' काय लक्षात ठेवायचे ?' " मामेकं शरणं व्रज " आणि निघताना म्हणाले– ' सदैव चित्त प्रसन्न ठेव ' ही दोन वाक्ये म्हणजे माझ्या दृष्टीने श्रुतिस्मृतिच होती. ह्या दोन वाक्याचे आचरण माझ्या हातून घडले तर मला वेगळी साधनाच नको करायला असे त्याचे मोल आहे आता त्याच्याच जवळ त्यानी माझ्याकडून तसे करून घ्यावे हा हट्ट सुरू आहे. आज चुकून कशाने मन खिन्न झाल्यास दुसऱ्या क्षणी त्याची जागा प्रसन्नता घेते. मी प्रयत्न करून अतरी स्वस्थ राहणे मला कधीच जमले नसते. पण जिने मला आपल्या कृपेच्या छत्राखाली घेतले आहे तिलाच माझे परम श्रेयस् माहीत ! प्रसन्न मनात सकल्पविकल्पाला थाराच नसतो. प्रसन्नतेच्या शिवारात दुःखाला रिघावच नाही. सद्गुरूनी मुळातूनच सजीवनी ओतल्यावर माझी जीवनवेल मोहरली आहे. बाहेरच्या सीमित आनदात रमणारे माझे मन अंतरीच्या असीम, निरंतर, निजानंदाने वेडावून टाकण्याची किमया करणारा किमयागार आहे, माझे सद्गुरु स्वरूपनाथ ! कुठल्याही गोष्टीची, प्रसगाची वस्तूची मर्यादा ओळखायला त्यानीच शिकवले. आणि 'मर्यादा' कळली की मग सगळ्यात असून कशातही नसल्याचा अभ्यास सहज जमू लागेल असा विश्वास निर्माण केला. परमार्थाला अमुक वर्ज्य, अमुक त्याज्य असा जो आग्रह अभिनिवेष तो हळूहळू नाहीसा होईल सद्गुरूनी जे साधन दिले आहे ते जवळच असल्याने त्याला बाहेरच्या कुठल्याच गोष्टीची बाधा होण्याचे कारण नाही. मला एका पत्रात लिहिले होते–

" सोऽहं म्हणजे आत्मा तो मी । शुद्ध बुद्ध नित्य स्वामी ।
ऐसे भाविता अतर्यामी । अहता-उर्मि मावळेल ।। "

कुणावर, कशावर अवलबून नसलेल्या स्वानदाचे लेणे श्रीनी ल्यायला दिल्यावर दुसरे काय हवय् ? आज 'श्री'नी दिलेल्या सर्व अनुभवापेक्षा, त्यानी दिलेल्या विविध दर्शनापेक्षा त्यानी मला सोऽहं बोधात रममाण होण्याचा परम पथ दाखवला याचे ऋण फेडण्याचा यत्न कशाला ? माऊलीने मुक्तहस्ते जी सोऽहं सुमनाची उधळण केली तिचा अमोल ठेवा अतरी सतत जतन करणे हेच अशन. उतराई होण्याचे साधन आहे.

सद्गुरूच्या कृपेचा नवलाव आपल्या नजरेत भरतो तो म्हणजे 'श्री'नी घरेच्या घरे, कुटुबेच्या कुटुबे आपल्या कृपेच्या दृष्टीत न्हाऊ घातली आमच्या घरातील लहानापासून थोरापर्यंत सर्वांना माऊलीनी कृपेच्या छायेत विसावू दिले ' आम्ही लहान असलो तरी समर्थघरचे आहोत त्याना रुचेल, मानवेल असेच आमच्याकडून आचरण व्हावे, अभ्यास व्हावा आणि जीवनज्योत सद्गुरू-रूपात मिळून जावी निवात, निश्चित, निर्भय करणाऱ्या श्रीसद्गुरु चरणाचे नित्य स्मरण राहावे एवढीच श्रीचरणी प्रार्थना-गुरुदेवा, ' तुझिया चरणी मस्तक ठेविले, उचलायचे भान न राहिले '

—: सोऽहं :—



# ' विसरू कसा मी गुरुपादुकांना ! '

– श्री. आ. शि. साडविलकर गुरुजी, चिपळूण

**" अनुग्रह झाल्यानंतर दिलेला मंत्र न चुकता जपणे, त्यांना प्रिय ते करणे, निंदा-स्तुती, मोठेपणाचा हव्यास या विषयी मौन पाळणे, सर्वत्र समभाव राखणे इत्यादि साधना हेतूपूर्वक कटाक्षाने चालू असते.**

त्यावेळी माझी आर्थिक स्थिती अगदीच केविलवाणी होती. पण वाटे की, श्रीगुरुमाऊलीच्या छोटयाशा रौप्य पादुका घडवून पूजनात ठेवाव्या. पण त्याचा आशीर्वाद मिळेल काय? अशी शका उपस्थित झाली तत्पूर्वी त्याच्या खडावा, सपाता काय मिळेल ते मिळवावे व पूजावे असा विचार होऊन एका दर्शनप्रसगी ही इच्छा श्री मोहन गोडबोले व श्री वसतराव देसाईजवळ प्रकट केली. त्यानी ती श्रीना सागितली बाकी काही त्याना समजू दिले नाही

थोडयाच वेळात आतून निरोप आला, " तुम्ही चादीच्या पादुका आणणार आहात ना ? त्याच आणा मी आशीर्वाद देईन "

असे अतीद्रिय दाखले अनेक आहेत पुढे लवकरच मी पादुका तयार करवून नेल्या व श्रीनी भावभक्तीने त्याना आशीर्वाद दिला! चारपाच महिन्यानी आमचे स्वतत्र घरही बाधून उभे राहिले! आज त्यातील दर्शनीय एका खोलीत, रोषणाईत त्या पादुका विराजत आहेत समोर श्रीराम मदिर असून श्रीरामराया समोर स्वामी आहेत. हा अपूर्व योग आहे. त्याच सरळ रेषेत आमचे जुने घर आहे श्रीराममदीरामागे व हे आहे राजरस्त्यालगत तत्पूर्वी आम्ही भाडयानेच रहात होतो! वरील घटनेमुळे व श्रीचा आशीर्वाद घेऊन घराला नावही 'आशीर्वाद' दिले आहे

ह्याच पादुका स्वामीच्या महासमाधीप्रसगी कधी नाही त्या सरळ उजव्या बाजूस पहाटेस वळल्या होत्या! सकाळी श्री बोडसगुरु बधूनी समाधीवृत्त सागताच डवडबलेल्या नेत्रानी सर्व कोडे उमगले. जड चैतन्य झाले! पादुकानीही सूचना दिल्या!

श्रीगुरुमाऊलीच्या कृपेने अनुग्रह झाल्यानतर दिलेला मत्र न चुकता, जपणे त्याना प्रिय ते करणे, निदा-स्तुति-मोठेपणाचा हव्यास याचे मौन पाळणे, सर्वत्र समभाव राखणे, सत्कृत्याकरिता स्वतःचीही पर्वा न करणे व सहज उपासना साधणे उघड स्वामी सकीर्तन करणे, व्यावहारिक गोष्टीतही परमार्थ जोडणे इत्यादीही साधना हेतूपूर्वक कटाक्षाने चालू असते.

अशीच साधना सन १९७३ मध्ये श्रीकृष्णधाम (संगम माहुली) सज्जनगड आणि पंढरपूर क्षेत्री गेलो असता चालू होती. पंधरा दिवसापैकी सुमारे सात दिवस पंढरपुरलाच होतो. तिकडे माझा पहिलाच प्रवास तोहि एकटयाचा, गाठीला पैसा बेताचा, ओळखीच्या नावाने पंढरपुरात शून्य! तेथे माझी जणू सत्त्वपरीक्षाच झाली! तिचे पारितोषिक अभग सनद श्रीगुरुमाऊलीनी कसे दिले ती अलौकिक घटना रहस्यमय आहे.

मी चिपळूणला येण्यासाठी पढरपूर सोडले व वाटेत माहूद गावी उतरलो काही घेण्यासाठी येऊन गाडी पाहातो तर ती पुढे निघून गेली! मला थोडा वेळ झाला होता. कडक्टर व मजशेजारील प्रवाशाना माझे नाव गाव काहीच माहीत नव्हते व व मीही उतरत आहे हे कडक्टरना माहीत नव्हते, गाडी खच्चून भरली होती. तिकिटाचे पैसेही दिले नव्हते! तिकिटे मात्र घेतली होती! पुरेसे पैसे नसल्याने चिपळूणला स्टॅड-वरच ते देण्याचे कडक्टरना सागितले व त्यानीही मान्य केले! तीनचार बॅगा, थर्मास, वॉटरकॅरियर, बॅगाची तोंडे उघडी, एका बॅगेत (प्लॅस्टिकच्या) श्रीस्वामीचा फोटो, गगेची लोटी, अनेक वस्तू मिळून सुमारे तीनशे रुपयाचे वर सामान बैठकीवर उघडे होते!

माझा चेहरा फटफटीत झाला! नामस्मरण चालूच होते, शात होऊन पुन: पढरपूरला आलो, स्टेट बॅकेच्या एजटानी ओळख नसता अडचण जाणून खर्च भागण्या-पुरते पैसे दिले! पुन. निघालो, रात्रौ कऱ्हाडला मुक्काम, दुसऱ्या दिवशी दुपारी चिपळूण स्टॅडवर हजर झालो, सर्व चौकशी केली पण व्यर्थ! इतक्यात आमचा कनिष्ठ एकमेव बधू तेथे आपल्या कामासाठी आला असता मला पाहून म्हणाला, "काय दादा! सामान ना? सगळ सुरक्षित घरी नेऊन ठेवले आहे तुम्ही चला आता, काळजी नको!" मी गहिवरून मनोमय श्रीगुरुमाऊलीचे चरण धरले

थर्मासवरून कॅटीनमधील श्री अनत नामक मित्राने माझे सामान ओळखले त्याने मी जाताना ते पाहिले होते ते सहज त्या एस टी त गेले होते, ते त्यानी तिकिटाचे पैसे देऊन सामान ताब्यात घेतले व बधूना निरोप देऊन ते सर्व त्याच्या हवाली केले.

पुढे त्या श्री एजटाचे पैसे मनिऑर्डरीने पाठविले. पावसला जाऊन श्रीना भेटलो सर्व साक्षेपाने सागितले. तेव्हा ते जणू मला सावध करून 'कळल ना' असे पटवीत आहेत हे त्याच्या हसण्यावरून स्पष्ट होत होते हसणे-ब रणे जाणवले 'गुरु तोचि देव, देव तोचि गुरु' पक्के झाले.

श्रीसद्गुरुच्या सन १९६७ सालातील जन्मोत्सव दिनी, त्याच्या मोठ्या फोटो-समोर भेट वस्तू न ठेवता समक्षच समर्पण करावयाच्या अशी बलवत्तर इच्छा झाली. किती वेळ होवो जेवण घ्यावयाचे नाही असा निर्धार झाला व बाहेर बाकावर नाम-स्मरणात लीन झालो.

गर्दी अतोनात, स्वत:ला पुढे पुढे करण्याची अरुची, श्रीना यत्किंचितही उपसर्ग होऊ नये ही दक्षता, अशात आमच्या अक्षता कसच्या सादर होतात ? असा विचार पडला.

सुमारे १२ नतर स्नानोत्तर ठराविक नामस्मरण करून आपल्या गुरूंना वंदन केले आणि डॉ. मिराशी व श्री. देसाई करवी मला त्वरीत बोलावून घेतले. मी दिङ्मूढ होऊन सर्व साहित्यासह झटकन आत जावून ते त्याना समर्पिले. त्यानी मुक्त हास्याने ते स्वीकारले व खडीसाखर प्रसाद दिला आणि आशीर्वाद दिला.

रात्रौ डॉ मिराशी महाशयानी 'देव भावाचा भुकेला' सदर्भात ही ताजी घटना सर्वाना सागितली देवाला नुसत्या वस्तूनी प्रसन्न करून घेणे अज्ञान आहे त्या असल्या नि नसल्या तरी सारख्याच ! मुख्य म्हणजे मातेप्रमाणे प्रेम पाहिजे ते नाही तर व्यर्थच ! हा बोध ठसला, साधनाचा, कर्मकाडाचा पसारा कमी होत गेला

● ● ●

# अमोल ठेवा स्वर्णक्षणांचा

—सौ. यमूताई कुलकर्णी, कोल्हापूर

**श्री सद्गुरूंच्या आठवणींचा गहिंवर दाटला की आपल्या धाकट्या बहिणीला – सौ. सुशीलेला पत्र लिहायचे हा लेखिकेचा नित्यक्रमच. त्यातलेच हे एक स्मृतिपत्र —**

प्रिय सुशा,

सद्गुरुकृपेच्या अमृत वृष्टीत आपण दोघीही अभ्यग न्हाऊन निघालो नाही ? ' केवढी पर्वणी साधली ही! एवढे पूर्वपुण्य गाठी दिले याचे भान तरी होते का आपल्याला? येतील त्या सर्व आप्त स्नेह्याच्या सह त्या आनद भाडाराकडे धाव घेतली अमृताचे भोजन पुन पुन्हा करताना अरुची थोडीच वाटणार ? पावसच्या देवाचे दर्शन झाले अन् ' गुरु तोचि देव ' ही अक्षरे जणू अ-क्षर झाली

गुरुकृपेचा नवलाव अनुभवावा तो सागावा कसा ? तरी पण परस्पर गुरु-भक्ताचे अनुभव ऐकताना अन् सागताना मन सहज उन्मनी अवस्थेत जाते अनुभवाला किती तरी एकरूपता असते.

सुशा, तसे पाहिले तर आपल्या सारख्या सामान्य ससारी व्यक्तीच्या जीवनात काय असणार ? पण लोहाला परिस लागले अन् ते सोनेच झाले त्याला मोल आले. आता जर कधी काळी कुणी आपली दैनदिनी पाहिली तर स्वरूप देवाच्या वारीत चालणाऱ्या आपल्या सारख्या भोळ्या भावड्या जीवाची दैनदिनी म्हणजे चमत्कार, श्रीचे मार्गदर्शन अन् स्वानदी विचरण. अशा तीनही अवस्थाचे हृदयगम दर्शन कुणाही पुढील साधकाना घडेल

१९७० ला पर्वणी आली श्रीचे दिव्य दर्शन अगदी अनपेक्षित घडले अनुग्रह म्हणजे काय, हे समजण्यापूर्वीच तो झाला. ' आधी केले, मग सागितले ' असे झाले. मधल्या अनेक अनुभूतीची पाने उलटून २८ जुलैची घटना आठवते. त्या रात्री श्री देह ठेवणार, ही वार्ता काळजाचे पाणी करीत होती. तरीही चटकन् प्रसाद घेऊन डोळ्यातले पाणी परतवून 'रामकृष्ण हरि' जप करीत आम्ही सर्व मडळी बसलो. दुसरे दिवशी आमची गाडी परतणार होती. आम्हाला परतावे लागले. येताना वाटत होते श्री आपल्याला नक्की सूचना देणार तसेच मुळीसुद्धा निघणार नाहीत.

रोज पहाटे चहा घेण्यापूर्वी श्रीची प्रसन्न प्रतिमा पाहावी सर्व ठीक आहे असे वाटून नित्य कामाला लागावे असा क्रम. १५ ऑगस्टच्या पहाटे स्वप्नात मीच ताम्हणात पितळेच्या पणतीत दिवा लावून तो खोलीत नेऊन ठेवला श्री समोर नव्हते. पण सुख-दु:खाचा कोणताही भाव न जाणवता मी बाहेर आले असे पाहिले. सकाळी नित्याप्रमाणे कपात चहा ओतला मात्र अन् एकदम तो दिवा ती खोली अन् श्रीचे दर्शन नाही हे आठवले. कमालीची अस्वस्थता जाणवू लागली. सकाळी शाळेत कार्यक्रम नऊ पर्यंत गडबडीत वेळ गेला अन् पुन्हा तो दिवा दिसू लागला. मी लौकरच घरी परतण्यासाठी बाहेर पडले. दाराशी आले तो मला बोलवायला हे बाहेर पडत होते. श्रीनी सगुण लीला आवरल्याची भयकर वार्ता मी ऐकत होते डोळ्यातून कुणीही पाणी काढू नये ही त्याचीच आज्ञा हुदके आडवत होती जणु ती पहाटेची दीपज्योत श्रीचे चैतन्यरूपातील वास्तव्य सागण्यासाठी आली होती

१६ ऑगस्टला ध्यानगुंफेतले श्रीदर्शन घेऊनच आम्ही परतलो. कोल्हापूरची स्पेशल गाडी तीन चारला परतणार होती. निघण्यापूर्वी खोलीच्या बद दाराशी तरी मस्तक टेकावे म्हणून मी एकटीच माझ्या मुलीसह खोलीकडे वळले. इतक्यात चिरजीव दिलीप हा भाऊचा मुलगा पायऱ्या उतरून समोर आला आणि त्याने दार उघडून दिले अन् आश्चर्य म्हणजे तो दिवा मी दारातूनच पाहिला हळुवार पावलानी आत जाऊन अलगद पाय असत तिथेच अलगद मस्तक टेकले श्रीचे चैतन्यमय वास्तव्य जाणवल्या-शिवाय राहिले नाही पुढे पधराच दिवसानी खोलीत पुन्हा जाण्याचा योग आला. चार वर्षात श्रीमूर्तीखेरीज काहीच न पाहणारी दृष्टी समोर गेली अन् पाहिले "अह आत्मा हे कधीची विसरू नये " चैतन्यस्वरूपात स्वरूपनाथ तिथे असल्याची पुन्हा अनुभूती– म्हणून तर सुट्टी झाली की पावसला जायला मन उतावीळ होते श्रीच्या भक्तासाठी निर्गुणातून सतत लीला चालूच आहेत त्यातलीच ही एक ऑगस्टच्या १५ तारखेला आपला सगुण भक्त भगवताचा खेळ थाबवून श्री ध्यान गुफेत विसावले.

१० डिसेंबर पावसला जन्मोत्सवाचा दिवस आता तर उत्सवाच्या स्थानीच श्री वसले आहेत या उत्सवाला जायचे हे ठरल्यासारखेच होते श्रीसत्यदेवानद सर-स्वतीचा एकदोन तारखेला कोल्हापुरला मुक्काम होता अकस्मात् शाळेच्या इन्स्पे-क्शनची तारीख १० डिसेंबरच आहे असे निश्चित पत्र आले मन विलक्षण व्यथित झाले काय करावे ते सुचेना आमची अडचण ऐकून स्वामी सत्यदेवानद म्हणाले, 'काय करणार? पण फोनच आला तर....' वाक्य अर्धवटच ठेवून त्यानी भाव स्पष्ट केला. आपल्याला जायला मिळणार नाही असे व्हायला नको होते असे सारखे वाटत होते सर्व दिवस श्रीच्या स्मरणात रहायच अशी धावऱ्या मनाची मी समजूत घालत होते ९ तारखेला दुपारी तीन वाजता मुख्याध्यापक अध्यापकाच्या खोलीत आले आणि त्यानी सांगितले. "आताच फोन आला आहे. इन्स्पेक्शन उद्या नाही. चार दोन

दिवसात होईल." माझ्या विस्मयाला पारावार राहिला नाही. मी चटकन् रजेची मागणी केली. पावसला खूप गर्दीत प्रत्यक्ष, माझ्या मुलीनाही आपली आई आली आहे ही वार्ता सत्य वाटेना. थोड्या वेळाने स्वामी सत्यदेवानदांना भेटायला गेले. त्यानी विचारले, " कस येणं जमल ? " " फोन आला " दोनच शब्द माझ्या तोंडून बाहेर पडले. "हा अप्पाचाच फोन–" मग अशा घटना आठवणीत सकलित होणार की नाही ? त्यांनी श्री. बाळासाहेबांना विचारले, स्मृती सकलनात चमत्काराना किती स्थान असावे, यावर तिथे बोलणे सुरू होते. मी म्हटले, " आमच्या जीवनात हे अनुभव म्हणजे अमोल ठेवा. यानीच आमची भक्ती दृढ होत गेली. सकलन होवो अगर न होवो.'' आणि एकच दिवसाचा मुक्काम करून मी परत आले. शाळेचा जिना चढत असतानाच मला समजले, ' उद्या इन्स्पेक्शन आहे! आमचा प्रपच परमार्थ दोन्हीही असा सद्गुरुच साभाळतो.

**" उठता बसता उभा पाठिशी माझा सद्गुरुनाथ । "**



# धन्य धन्य दिवस आजी संताचे दर्शन

–श्री. सुरेश मनोहर साळवी, राजापूर

**हळू आवाजात स्वामी म्हणाले, " सगळ्याच गोष्टी काही पत्रात लिहून कळत नाहीत. " लगेच 'आत्मप्रभा' हे पुस्तक मला वाचायला दिले., थोड्याच वेळात ते सोऽहम् च्या अनुसंधानांत रंगलेले दिसले.**

श्रीस्वामी स्वरूपानदाच्या दर्शनाकरिता पावसला गेलो. त्या सभामडपातील एकदर वातावरणातच अशी काही तरी विलक्षण शक्ती मला जाणवली, परंतु दिस शकली नाही. मी जीवनाला कटाळलो होतो. परतु आता मात्र जे पाहिजे होते ते मिळाले. ध्यानस्थ बसलेली ती स्वामीची तसबीर पाहिल्यावर मी त्यापुढे एकदम नतमस्तक झालो आणि सत शिरोमणी तुकोबारायाच्या अभगाचे चरण ओठावर नाचू लागले.

" धन्य धन्य दिवस आजी सताचे दर्शन " इतक्यात स्वामीचे दर्शन घेण्यासाठी आम्ही त्या पवित्र खोलीकडे वळलो स्वामीची ती तेजस्वी शात, प्रसन्न आणि हसतमुख मूर्ती दृष्टीस पडताच मन शाती तर मिळालीच आणि नरजन्माचे सार्थक झाल्याचे समाधानही मिळाले स्वामीचे मला परमेश्वर स्वरुप दिसू लागले मी पूर्ण आस्तिक बनलो. केवळ प्रथम दर्शनाने मी कृतार्थ झालो आणि स्वामी-भक्त बनलो.

स्वामीचे प्रसन्न मुखकमल पहाताच मला जे जे त्याना विचारावयाचे होते ते ते विसरून गेलो होतो परतु हे सर्व स्वामीनी अतर्ज्ञानाने जाणून आमची सर्व चौकशी केली. " नाव काय? वडील कुठे असतात ? गाव कोणते ? " वगैरे प्रश्न प्रेमाने विचारले त्याच वेळी माझ्या मनाने निश्चय केला की आपण स्वामीना आपले गुरु करावे. जे प्रेम स्वामीनी केले ते मला इतरत्र कोठेही मिळाले नाही याच वेळी नोकरीबाबतच यक्षप्रश्न चटकन् स्वामीना विचारला 'नोकरी' हे शब्द माझ्या तोडून बाहेर पडण्यापूर्वीच स्वामी म्हणाले, "बाळ, टपाल आले आहे" टपाल आले म्हणजे मला कोठून तरी नोकरीचा हुकूमच आला पाहिजे. आता तर माझा आनद गगनात मावेनासा झाला स्वामी ही माझ्या आनदात सहभागी होऊन स्वामीनी प्रसाद आणि नित्यपाठ अभग ज्ञानेश्वरी दिली. आम्ही नमस्कार करून आशीर्वाद घेऊन आनंदाने घरी परतलो, परंतु मन मात्र स्वामीच्या खोलीतच गुरफटून राहिले होते. घरी खरोखरीच नोकरीची

'ऑर्डर' आलेली होती. परमेश्वर नावाची शक्ती या जगात खरोखरीच आहे. तसेच-तुकोबारायाचे अभंग ही अ-भंग म्हणजे नाश न पावणारे असेच आहेत याची खात्री पटली. फक्त सतांच्या प्रथम दर्शनाने मला मन:शाती मिळालीच आणि माझ्या जीवनाचा उत्कर्षही होत गेला. अशा प्रकारे पुष्कळ स्वामी भक्ताना त्याचा लाभ मिळाला आहे, मिळत आहे व मिळेलही. अशी माझी मनोदेवता मजला सागत आहे. मात्र त्यासाठी भक्ती केली पाहिजे. स्वामी म्हणत, "जितकी भक्ती तितकी प्राप्ति."

सन १९७१ ला मी गुहागर मुक्कामी आलो. तेथील स्वामीभक्त श्री. चंद्रकात ऊर्फ बापू बारटक्के याच्याशी माझी ओळख झाली. त्यानी स्वामीचे चरित्र वाचावयास दिले. तसेच इतर ग्रथही वाचण्यास मिळाले. त्याच वेळी "गुरुप्रसाद" हे दादा आंबेकर महाराज (पुणे) याचे पुस्तक वाचनात आले. त्यातील "सोऽहम्"ने पुन्हा एकवार मी तन्मय झालो. या साधनेबाबत श्री. बापू बारटक्के याच्याशी चर्चा करून स्वामीना 'सोऽहम्' साधनेबाबत पत्र लिहिले, परतु पधरा दिवस झाले तरी उत्तर आले नाही. मला तर 'सोऽहम्'ने वेडच लावले. मी तोडाने वारंवार 'सोऽहम्', 'सोऽहम्' असा उच्चार करू लागलो. कधी वाटे आपल्या हातून काही तरी चूक झाली असावी. स्वामी आपल्यावर रागावले असतील काय? की आपण स्वत:च जाऊन 'सोऽहम्' साधनेबाबत विचारावे असे वाटले आणि लगेच प्रवासास निघालो. पुन्हा एकवार दर्शन. अलभ्य लाभ.

"या साळवी, आपले पत्र मिळाले" वगैरे सर्व चौकशी झाली. स्वामीनी प्रसाद दिला तो ग्रहण केला आणि स्वामी आता पुढे काय बोलतात याकडे लक्ष लागले होते. हळू आवाजात स्वामी बोलू लागले, "सर्वच गोष्टी काही पत्रात लिहून कळत नाहीत." लगेच 'आत्मप्रभा' पुस्तक काढून ते वाचण्यासाठी मला दिले आणि थोड्या वेळाने खोलीत येण्यास सागितले.

मी पुन्हा खोलीत गेलो. स्वामीनी मला माडी घालून बाकावर बसावयास सांगितले. आपण ध्यानस्थ बसून मला आपल्याकडे पाहाण्यास सागितले. मी पाहात होतो. तो स्वामी 'सोऽहम्' च्या अनुसंधानात रगलेले मला दिसले. त्याचे वर्णन मला करताच येत नाही. तोडाने उच्चार न करता 'सोऽहम्' शब्द कसे काय ऐकू येतात? असा प्रश्न मी विचारला, त्यावर स्वामीनी सर्व काही समजावून सांगितले.

एकदा वाटले, आपण काही तरी आध्यात्मिक लिहावे, परतु ते कशात लिहिणार? ते कसे काय प्रकाशित होईल? अशा शंका आल्याने सहजच पावसला आलो. स्वामीनी प्रसाद दिला आणि प्रसादभेट म्हणून परमार्थाचा अंक दिला. त्या दिवसापासून मी परमार्थाचा जिज्ञासू वाचक बनलो आणि त्याचवेळी मला स्फूर्ती आली की ज्या अर्थी स्वामीनी हा अंक मला 'प्रसाद'भेट म्हणून दिला त्याअर्थी यातूनच आपण लिहावे,

असा स्वामीचा आदेश मानून मी परमार्थाच्या संपादकांना पत्रद्वारे कळविले आणि त्यांनीही मला आपण आपले लेख प्रसिद्ध करू, म्हणून लिहिले. अशा अनेक तऱ्हेच्या शंकांचे निरसन स्वामींनी आनदाने केले.

सध्या 'सोऽहम्' साधना चालू आहे. या साधनेमुळे मला माझ्या जीवनांत समाधान व शाती मिळाली आहे. तसेच नरजन्माचे सार्थकही झाल्याचे वाटत आहे.



# सदा माझे डोळा

–कु. मीरा पंडित, कुर्णे

**" ज्या ज्या वेळी मन उदास होते, त्या त्या वेळी स्वामींचे ते पहिल्या भेटीतील मनमोहक, तेजोमय, आनंददायक व कारुण्याने भरलेले रुपडे आठवते. त्या आठवणीने आनंदात न्हाल्याचे समाधान मिळते. . . ." दत्तभक्त कु. मीरा पंडितने श्रीस्वामींच्या चरणीच श्रीदत्तात्रेयाचा साक्षात्कार झाल्यावर दिलेली ही आठवणींची हसतखेळत शरणागती.**

श्रीदत्तगुरु माझी मायमाऊली आहे. तिच्याशिवाय मला माझे असे कोणी नाही म्हणून मला जे जे पान, फूल आवडेल त्याने त्याचीच पूजा करायची, त्याचेच ध्यान, त्याचाच जप आणि स्मरण हाच माझा नित्यनेम. माझ्या बालबुद्धीनुसार पण भक्तियुक्त अंत:करणाने श्रीदत्तगुरूची पूजा करीत त्याचेशी मी मनमोकळेपणाने बोलत असे. " तुझ्या ह्या अज्ञानी बालिकेला सद्गुरूचे दर्शन घडवून दे. " अशी किती तरी दिवस दत्तचरणाजवळ विनवणी चालली होती.

तेव्हा मी बहुतेक दिवस मामाच्या घरीच रहात असे. मामा आमच्या बरोबरीचा असल्यामुळे मनातील सर्व कल्पना अगदी मनमोकळेपणाने त्याला सांगत होते तोही कौतुकाने आमच्या गप्पात समरस होत असे. त्याला माझे हे भक्तिप्रेमाचे वेड माहीत होते. अशाच एकदा गप्पा चालल्या होत्या. बोलता बोलता तो म्हणाला, " अग, पावसला स्वामी स्वरूपानंद आहेत, त्याच्याकडे जा. पण ते दत्त किंवा दत्ताचा काही नाममंत्र देत नाहीत. ते नुसते सोऽहम् ध्यान सांगतात आणि एखादे पुस्तक देतात. ' हे ऐकून क्षणापूर्वी माऊलीच्या भेटीसाठी अधीर झालेला जीव ते दत्तभक्त नसल्याने त्याचे दर्शन देखील घेण्यास तयार होईना. आणि मामाने आपली थट्टा केली म्हणून दु:ख मात्र झाले त्याला मी रागाने म्हटलेसुद्धा, " हे पहा, असले सद्गुरु मला नकोत. मी नाही त्याच्याकडे जाणार. नुसते सोऽहम्, सोऽहम्ही नाही करणार माझे मन काही सोऽहम्मध्ये रमणार नाही " झाले. एवढ्यावरच हे बोलणे राहून गेले. दुसऱ्याच दिवशी मी मुंबईला गेले.

वरील प्रकाराने मन मात्र बेचैन झाले. सद्गुरु माझ्याजवळ प्रगट होऊ पहात होते पण माझे अज्ञान अपार म्हणजे फार असल्याने हिऱ्याला गारगोटी समजून मी दूर

टाकीत होते. घरी देवाजवळ मनमोकळे बोलता तरी येत होते. परंतु मुंबईला गेल्यावर तर देवपूजा वगैरे सर्व मनातच करावी लागत होती. माझ्या नावावरून मला तेथील लोक जोगीण, संतीण म्हणून चिडवीत. त्यांच्या चेष्टांना असा काही ऊत यायचा की मला अक्षरशः रडू यायचे. असे पाच सहा महिने मुंबईत मावशीकडे काढले आणि घरी आले.

पुढे दोनतीन महिन्यातच मी रत्नागिरीला मावशीकडे गेले. ती मला म्हणाली, " येतेस का पावसला ? तेथे स्वामी स्वरूपानंद आहेत; त्यांचे दर्शन घेऊन येऊ. येत असलीस तर चल. आणि हे बघ, खोलीत त्यांच्या जवळ बोलायला मिळायचे नाही. तेव्हा तुला जर त्यांना काही विचारायचे असेल तर अगदी थोडक्यात लिहून दे म्हणजे ते वाचतील. " हे तिचे बोलणे झाल्यावर लगेचच आम्ही पावसला जायला निघालो. माझ्या मामाने जेव्हा स्वामी स्वरूपानंदांकडे जा म्हटले तेव्हा ते दत्तभक्त नसल्याने– आणि दत्तजप त्यांचेकडून मिळणार नसल्याने त्यांच्याकडे जाणार नाही असे सांगणारी मी मावशीने चल म्हणताच कोणत्याही प्रकारची चौकशी न करता– इतकेच नव्हे तर मागचे बोलणे देखील न आठवता अगदी सहजपणे स्वामींचे दर्शन घ्यायला निघाले होते. वाटेतच भाट्यात येऊन माऊलीला लहानशी चिठ्ठी लिहिली. त्यात भगवंताची सेवा करण्याची इच्छा आहे. मार्गदर्शन करावे अशी इच्छा दर्शविली होती. घरच्या वातावरणाविषयीही स्पष्ट लिहिले होते. अन् मी व मावशी पावसला आलो. लगेच माऊलींनी आम्हाला खोलीत बोलावले. त्यावेळी ते उठून बसत होते. मी त्यांना नमस्कार केला. माऊलींनी आशीर्वाद देत उत्सुकतेने माझ्या मावशीला विचारले, " ही कोण ? " मावशी म्हणाली, " ही माझी भाची मीराबाई "! माऊलींनी मंदस्मित करीत माझ्याकडे पाहिले विचारले, " तुझं नाव काय ? घरी कोण कोण आहेत ? तू काय करतेस? " अशा प्रश्नांमुळे माऊलीबद्दल मनात नकळत आदर, आपुलकी उत्पन्न झाली. लगेच मी लिहिलेली चिठ्ठी त्यांना दिली. त्यांनी ती स्वतः वाचली. म्हणाले. " मी एक लहानसे पुस्तक देतो. वाचशील ना ? " मी आनंदाने हो म्हटले ते नित्यपाठाचे पुस्तक होते; "पण दिवसा सर्वांसमोर वाचणार नाही. घरात आईशिवाय फारसे हे कुणाला आवडणार नाही तेव्हा सर्वजण झोपल्यावर रात्री वाचीन." त्यावर माऊलींनी म्हटले, "चालेल. रात्री तर रात्री केव्हाही वाच. पण वाच."एवढे बोलून पुन्हा प्रसाद आणि गोड आशीर्वाद देत म्हणाले, " पुन्हा केव्हा तरी यावं. " त्यांचे त्यावेळचे दर्शन मी केव्हाच विसरू शकणार नाही. ज्या ज्या वेळी मन उदास होते, त्या त्या वेळी ते पहिले मनमोहक, तेजोमय, आनंददायक, कारुण्यरसाने ओथंबलेले रुपडे आठवते. त्या आठवणीने देखील आनंदात न्हाऊन निघाल्याचे समाधान मिळते. आम्ही फक्त शरीराने पावस सोडले. मन माऊलींच्या खोलीत फिरत होते. नकळत त्यांच्या चरणी रमले होते.

माझ्या पावसला येण्यानंतर थोड्याच दिवसात माझे आईवडील माऊलींचे दर्शन घेऊन गेले. पुढे सुमारे आठनऊ महिन्यांनी माऊलींचा वाढदिवस होता. आम्हाला

काही तो ठाऊक नव्हता. तर माऊलींनी एका सेवकास सांगून माझ्या नावे पत्र लिहून उत्सवास येण्यास सांगितले. त्या पत्रावर त्यांचा आशीर्वाद आणि स्वाक्षरी होती. पोस्ट-मन ते पत्र घेऊन आला. त्याने ते मला देताच माऊलीचे ते सर्वप्रथम आणि माझ्या नावे असलेले पत्र पाहून गळा दाटून आला. अधीर होऊन मी ते पत्र वाचले तर त्यात उत्सवास येण्याचे आमंत्रण होते. मग काय विचारता ? माऊलीचेच बोलावणे आणि त्याच्या चरणी जडलेले मन त्यामुळे पावसला जायचा नामजप सुरू झाला. त्या वर्षी वडिलाबरोबर उत्सवाला गेले. माऊलीनी दर्शनासाठी खोलीत बोलावले आणि पत्र पोहोचले का, म्हणून विचारून मदस्मित केले. आशीर्वाद आणि माझे आवडते पेढे प्रसाद म्हणून दिले. नंतर 'या' म्हणाले. खोलीतून चार पावले मागे आले. तर पुन्हा आत बोलावले. जवळ जाऊन पुन्हा नमस्कार केला. तर म्हणाले, 'पेढा देतो बरं !' दिलेला पेढा तेथेच खायला सागितला. पुन्हा खोलीतून चार पावले मागे आले तर परत आपल्या जवळ बोलावून पेढा दिला. मला त्याच्या या वागण्याचा अर्थ त्यावेळी कळला नव्हता. पण आज वाटतय की, आपली बाळइच्छा आई अगदी आपल्या हस्ते, आपल्या डोळ्यादेखत पुरी करीत होती. आणि माझ्या मुखावरील तृप्तीच्या आनंदाचे सुख अनुभवीत होती. वाढदिवस झाल्यावर आम्ही निघालो तर म्हणाले, " सवड मिळेल तेव्हा यावे. त्यासाठी त्रागा करू नये. येण्याजाण्यात फार खर्च होतो. मी तेथे मनाने आहेच. " तेव्हा त्याच्या बोलण्याचा अर्थ मला कळला नव्हता.

त्यानतरही चारपाच वेळा मी गेले पण त्याच्या जवळ दत्तगुरूच्या जपासंबंधी काही विचारण्याचा धीर झाला नाही. एक दिवस तेच आपणहून म्हणाले, " बैस, तिथे. मी तुला 'सोऽहम्' ध्यान शिकवतो." ते स्वतः बसलेलेच होते. त्यानी सोऽहम्ची क्रिया करून दाखवली अन् माझ्याकडे पाहिले. मीही माझी हेकेखोर बुद्धी की दत्तगुरूच्या नावाशिवाय काही करायचे नाही हे विसरून त्यानी जसे दाखवले तसे ध्यान करण्याचा प्रयत्न केला. आणि एक क्षण, एक क्षणभरच डोक्यात हलल्याचा भास झाला. क्षणभर कसल्या तरी गोड नादात असल्याचे जाणवले सोऽहम् चाललेला असताना अगदी एक क्षणभर देहाचा विसर पडला आपण कुठे तरी फिरत आहोत असे वाटले. इतक्यात माऊलीनी हाक मारली. सोऽहम् थाबवायला सागितले. त्यामुळे मी घाबरून गेले. मला कळेना आपण आत्ता आलो कुठून? काय करीत होतो? एक प्रकारची भीती वाटली. माऊली माझ्याकडे पाहून हसली. आशीर्वाद आणि प्रसाद देत म्हणाली, 'रोज दोन मिनिटे तरी ध्यान करावे." मी खोलीतून बाहेर आले. आश्रमात आल्यावर माऊलीने शिकविलेले 'सोऽहम्' ध्यान जमते का ते पाहू लागले. पण जमेना. पुन्हा दुसऱ्या दिवशी माऊलीनी आपणच सोऽहम् शिकवला. त्या दिवसापासून सोऽहम् बद्दलचे वैर बरेच सहजपणे गेले. त्याच्या बद्दल आदर वाटू लागला. त्याची गोडी उत्पन्न झाली. मला शब्दाने सांगणे जमणार नाही. पण सोऽहम् हा नुसता माऊलीच्या तोडचा

शब्द ऐकल्यापासून एक आगळाच आनंद आमच्याभोवती खेळत असे. नव्हे अजूनही खेळतोय. मला जे वाटत होते की दत्तनामाखेरीज कसलाही जप किंवा ध्यान करणार नाही ते माऊलीनी माझ्यावर कसली जबरदस्ती, सक्ती न करता मला विसरायला लावले होते. मला आश्चर्य वाटते की लोकाना ते आधी गुरुमंत्र देत आणि नंतर ध्यान शिकवीत आणि मला सुमारे एक वर्षभर आधी 'सोऽहम्' शिकवून नतर मत्र दिला. मला वाटते. मामाला मी म्हटले होते ना! की स्वामीकडे पावसला जाणार नाही आणि सोऽहम् सोऽहम् पण करणार नाही हे अज्ञानाचे बोलसुद्धा माऊलीना आवडले नाहीत. खरेच, माऊलीचे हृदय गुरुमाऊलीच्या वात्सल्यप्रेमाने कळवळले आणि लौकरच आपणाकडे बोलावून घेऊन सोऽहम् मंत्राबद्दल आदर उत्पन्न केला. इतकेच नव्हे तर माझ्या मनात ते दत्तभक्त नसल्याबद्दल काही किंटाळ रहायला नको म्हणन एक दिवस पूजा करताना श्रीदत्तगुरूच्या तसबिरीत त्याचीच मूर्ती दिसली हे दृश्य पाहून मात्र त्याच्या चरणी असलेला भाव जास्तच दृढ झाला.

माऊलीचा वाढदिवस एक महिन्यावर येऊन ठेपला मला त्याच्या सेवामंडळा-कडून पत्र आले पत्र आल्यापासून मी सारखा विचार करीत होते की पावसला कसे जावे? खरे सागायचे तर एस टी च्या नुसत्या भाड्याचे पाच रुपये देखील जवळ नव्हते

माझ्यापुढे मोठा पेचप्रसग उभा राहीला या पेचातून सुटका होणे कठीण होते. माऊलीचे दर्शन लौकर होणार नाही ह्या जाणीवेने तर फार वाईट वाटले थोड्या वेळाने घरकाम सुरू झाले मनात माऊलीचे गोड दर्शन आठवीत कपडे धून होते मनात विचार आला माझे खरे प्रेम आहे ना त्या चरणावर? मग सत सखूला जसे भगवतानी पढरीला नेले आणि दर्शन देऊन इच्छा पूर्ण केली तशीच माझी माऊली देखील मला घेऊन जाईल अन् दर्शन देईल कदाचित् मला नेण्यासाठी कुणाची तरी गाडी येईल किंवा जाऊन येण्यासाठी माउली पोस्टाने पैसे पाठवील असा विचार मनात खरोखरच आला त्यानी आपल्या लाडक्या कन्येची इच्छा पूर्ण करण्यासाठी खरच पोस्टाने १५ रुपये पाठविले माझ्या नावानेच पाठवले आणि कूपनवर स्पष्ट लिहिले की हे पैसे वाढदिव-साला येण्यासाठी आहेत ज्याना येणे शक्य होईल त्यानी यावे आपण कोणी तरी यालच. असे लिहिलेले ते कूपन अर्थातच मी जपून ठेवले आहे

एक दिवस मं. दर्शनासाठी सध्याकाळी आले आल्याबरोबर खोलीतून दर्शन झाले माऊलीनी म्हटले, "लगेच जाणार का?" मी 'हो' म्हटले तर म्हणाले, "तुझ्याजवळ पिवळा कागद आहे का?" त्याच्या प्रश्नाचा विचार न करता त्याच्या दर्शनामुळे झालेल्या आनदामुळे मी पटकन् हो म्हणून सागितले मला वाटले की, पिवळ्या कागदावर पूज्य सत्यदेवानद स्वामीजीनी आरती लिहिली होती तोच तो कागद असेल असे वाटले. म्हणून कसलाही विचार न करता मी हो म्हटले तर म्हणाले, "ब्रह्मानदम्

पासून भवभ्रान्ति विनाशाय " येथपर्यंतचे श्लोक मोठ्याने म्हणावेत आणि त्या खालचे मनात म्हणून मंत्राचा तीन वेळा जप करावा. नंतर ध्यान करावे." इतके स्पष्ट ते बोलले. पण अज्ञानाचा एवढा गाढ अधार होता. त्याचा पडदा इतका चिवट होता की त्यांचे शब्द त्यातून आत गेलेच नाहीत असे मला वाटते. नतर प्रसाद घेऊन मी घरी गेले. असे दोन वेळा घडले. अगदी वरील प्रमाणे त्यानी विचारावे आणि मी पहिल्यासारखेच उत्तर द्यावे. तिसऱ्या वेळी गेले तेव्हाही माऊलीनी तोच प्रश्न विचारला. मीही पहिल्यासारखेच उत्तर देत होते पण उत्तर देताना मला कानात असंख्य शब्दाचा कडकडाट झाल्याप्रमाणे भासले. भीतीने कापरे भरले मी दोन्ही हातानी डोके गच्च धरले माऊलीनी माझ्याकडे पाहिले पण काहीहि न बोलता किवा क्षणभरसुद्धा मला न थाबवता प्रसाद देऊन येण्यास सुचविले मी आश्रमात येऊन २०-२५ मिनिटे ह्यावर विचार केला अन् लक्षात आले की आपल्या हातून काही तरी फार मोठा अपराध घडला आहे आपल्याला जे हवे आहे ते सद्गुरु आपणहून देत होते. पण माझेच काही चुकत असल्याचे वाटले आणि विमनस्क मन स्थितीत मी घरी आले. आल्या आल्या त्या कागदाचा शोध केला तर त्यावर नुसतीच आरती होती. कसलेही श्लोक नव्हते हे पाहून मात्र पश्चात्तापाने हृदय पोळले सद्गुरुजवळ आपण खोटे बोललो, त्याची फसवणूक केली असे वाटून अतिशय वाईट वाटले माझ्या अपुऱ्या बुद्धीमुळे घडलेल्या प्रकाराबद्दल सविस्तर पत्र लिहून, माफी मागून आणि त्या कागदातील गुरुगम्य मिळण्यासाठी वेडयावाकडया शब्दात पण शुद्ध अत करणाने त्याच्या चरणी चुकीची माफी मागणे भागच होते. त्यानी क्षमा केल्याशिवाय समाधान होणार नव्हते म्हणून तसे पत्र पाठवले. ते पत्र माऊलीनी स्वत.जवळ ठेवले आणि माझ्या भावाकडून ते वाचून घेतले अन् म्हणाले, " बघ, मी तिला विचारीत होतो एकदा नव्हे तर तीन वेळा विचारले तर आहे म्हणून सागितले आणि आता हे असे पत्र! तिच्या जवळ कागद नव्हताच. आणि हे काही मला माहीत नाही असे नाही मी दिलाच नाही तर असणार कुठून? बर, आता तू हा घरी घेऊन जा अन् दे " सुमारे महिनाभराने तो अनुग्रहाचा कागद माउलीनी पाठवून दिला.

माऊलीची प्रकृती फारच नाजूक होती त्यामुळे खोलीतून सर्वाना दर्शन देण्याचा सुद्धा त्रास होत असे तरी देखील पुष्कळ वेळा प्रत्येक जिज्ञासूची तीव्र इच्छा, तळमळ लक्षात घेऊन थोडया, थोडया वेळाने दर्शन देणे चालू असे पण दिवसेदिवस तब्येत फार क्षीण होत गेली नाईलाजाने खोलीच्या बाहेरून दर्शन घेऊन समाधान मानावे लागत होते पुढे तब्येत फार म्हणजे फार क्षीण होत गेली आम्हाला काही सुचेनासे झाले त्याची तब्येत सुधारण्यासाठी काही आपल्याकडून झाले तर पहावे म्हणून विचार केला पण मार्ग मिळत नव्हता मार्गदर्शन व्हावे म्हणून शेवटी पूज्य स्वामी सत्यदेवानदजी ह्याच्या जवळ मनाची विफलता उघड केली. त्यानीही कृपाळू होऊन 'रामकृष्ण हरी'

ग्रा मंत्राचा जप करण्यास सागितले. माझ्याजवळ माळ नव्हती. हातावर कसा करावा
ो दाखवला. खरे सागायचे तर माळ असल्याखेरीज मला समाधान वाटेना. म्हणून
न्हा माळेसंबंधी सुद्धा सत्यदेवानंदांनाच सागितले. तेव्हा अगदी माऊलीच्या मायेने
ृपाळू होऊन त्यानी आनंदाने आपल्या जवळची माळ दिली आणि आशीर्वाद देत
हणाले, ' जप करा बरं ! ' त्यांनी सागितल्यावरून जप करीत असे. त्यानंतर माऊलीची
कृती जरा सुधारली होती. काही दिवस आनदात गेले. पण तो आनंद फार काळ
ाहिला नाही.

● ● ●

# १५ ऑगस्टच्या सकाळची अद्‌भुत प्रचीति

**– श्रीमती वसुधा आपटे, पुणे**

**एखादा चिमण्या नवजात बालकाची आई दूर जाते तशी अवस्था आपल्या वाटयाला येणार की काय अशी रुखरुख लागली होती.**

रात्रीची साडेनऊची वेळ. माझा फोन खणखणला.

" दुपारी पांवसहून परमपूज्य स्वामीच्या प्रकृतिसंबंधी श्री. देसायांच्या दुकानात फोन आला, त्याची तब्येत ठीक नाही, त्यामुळे दुपारी स्पेशल बसेस, टॅक्सीज मिळेल त्या वाहनांनी पुण्यातील बरीच भक्त मडळी पावसला रवाना झाली आहेत, आपण काय करूया ? "

हा आवाज माझी मैत्रीण (सौ. परचुरे) हिचा होता.

दुसऱ्या दिवशी मी तिला भेटते, असे सागून फोन खाली ठेवला.

माझे मन सुन्न झाले, मी अगदीच बावरून गेले.

१९७२ फेब्रुवारीत मला अनुग्रह मिळाला होता. या क्षेत्रात मी अगदीच नवीन होते. अनोखी होते.

पारमार्थिक क्षेत्रात आत्ताच पाऊल टाकले होते, आणि त्या दृष्टिकोनातून बघितले तर, एकाद्या चिमण्या, नवजात पाखराची आई दूर जाते, तशी अवस्था आपल्या वाटचाला येणार का, अशी रुखरुख मनाला लागली होती.

मी देवापुढे उदबत्ती लावून स्वस्थ बसले, डोळयातून घळघळा अश्रू वाहात होते, एकीकडे मी मलाच समजावत होते.

' परमपूज्य स्वामीच्या शिकवणीप्रमाणे, आपण सगुणाची आस किती धरायची, निर्गुणात पहायला शिकायला नको का ?

" असे व्यापुनी अणुअणूतुनी, मीच अखिल जगतात । "

दोन दिवस बेचैनीत गेले, पांवसला जायचे आम्ही ठरवले, मुसळधार पावसांतच प्रवासाला सुरुवात केली.

आंबा घाटात पाऊस व वारा यांचे भीषण थैमान चालू होते. गुरुगृहीचा वाराच जणूं आमच्याकरता संदेश घेऊन दिलासा देत होता आणि सांगत होता, तुमचे गुरु खुशाल आहेत मन शात ठेवा. चित्त शात ठेवून गुरुदर्शनाला जा."

पांवसला गेल्यावर कळले, की परमपूज्य स्वामींची प्रकृती आता ठीक आहे. दुसरे दिवशी दर्शनही झाले.

परमपूज्य स्वामींनी आम्हा भक्ताना घरी जाण्याची अनुज्ञा दिली होती. दोन दिवसातच आम्ही परतलो

येऊन आठ दिवस झाले नाहीत तोच १५ ऑगस्ट उजाडला,

१५ ऑगस्टला माझ्या एका मैत्रिणीच्या मुलीचे लग्न होते. ते झाले की, मी दि. १६ पासून आळदीला अधिक मासानिमित्त जाणार होते.

महिनाभर घराबाहेर राहाणार म्हणून घरातली, बाहेरची काही कामे उरकायची होती म्हणून दि. १५ ला सकाळीच पावणेनऊच्या सुमारास घराबाहेर पडले.

काय योग आहे बघा! आमच्या परिचयातील एका बाईनी एकदीड महिन्यापूर्वी निरोप दिला होता की, घरातील काही अध्यात्मिक पुस्तके त्यानी माझ्यासाठी बाजूला काढून ठेवली आहेत ती मी घेऊन जावीत

मला 'दीपलक्ष्मी'चा परमपूज्य स्वामी स्वरूपानद विशेषांक हवा होता तो काही मला वर्ष दीडवर्ष मिळाला नव्हता

त्या बाईचा मला निरोप आला की, आज म्हणजे गुरुवारी सव्वानऊ पर्यंत मी घरी आहे. तेव्हा तू ये. मी त्याच्या घरी गेले. ती ९–९। ची वेळ होती. त्यानी गेल्यागेल्याच पहिला अक परमपूज्य स्वामीचा माझ्या हातात दिला. त्यातील त्याचा फोटो पाहून मला त्या क्षणी अत्यानद झाला

आणि तोच क्षण श्रीपरमपूज्य स्वामीच्या निर्याणाचा होता, हे मला मागाहून कळले.

त्यावेळी मला ते दर्शन तर देऊन गेले नाहीत ना? मी तुमच्याच जवळ आहे. असा सदेश तर त्यानी मला दिला

श्रीपरमपूज्य स्वामीच्या निर्याणाची वार्ता त्याच सध्याकाळी चार साडेचारला मला कळली.

पुण्यातील बरीचशी भक्त मडळी दुपारीच पावसला गेली होती. सायंकाळी साडेपाच वाजता एक बस श्री. देसाई यांच्या दुकानाजवळ येणार होती. आम्ही पंधरा मंडळी त्यातून पावसला जाणार होतो. पावसाची रिपरिप चालूच होती. रात्री १२ वाजेपर्यंत आम्ही बसची वाट बघत बसलो. शेवटी निराशा होऊं लागली.

डोळ्यासमोर कोकणातील ती गौतमीनदी त्यावरील पूल, लाललाल रस्ते, श्री. भाऊसाहेब देसाईंची ती मंगलवास्तू, परमपूज्य अप्पाची खोली, आश्रम व त्यात वावरणारे माझे अनेक श्रेष्ठ व ज्येष्ठ गुरुबंधू भगिनी मला दिसत होत्या सास्रू नयनांनी मी ते सर्व बघत होते.

दोन्ही काटे बारावर आले, आता मात्र बस आली तरी न जाण्याचा आम्ही निर्णय घेतला.

परमपूज्य स्वामीच्या फोटोपुढे बसून दुकानातच आम्ही आमची श्रद्धाजली वाहिली

सकाळचा प्रसग डोळ्यासमोर तरळत होता. एक मन दुसऱ्या मनाची समजूत काढीत होते, ' अग वेडे, अशी खिन्न का होतेस ? आठ दिवसापूर्वीच तर तू जाऊन परमपूज्य स्वामीचे दर्शन घेऊन आलीस ना ? आणि मुख्य म्हणजे तुझे गुरु परमपूज्य स्वामी सकाळीच येऊन भेटले नाहीत का ? ते तर तुझ्या जवळच आहेत. '

पण डोळे काही ऐकण्यास तयार नव्हते. तरी पण—

मृत्यु पावणे, पुनः जन्मणे हा मायेस्तव भास,
असे व्यापुनी अणूअणूतुनी मी अखिल जगतास ।।

—' सोऽह हस '—

• • •

## उपासकांचा आधारवड

—श्री. हरी रघुनाथ पटवर्धन, दापोली

**. . . . " सौ. विजयाच्या हातात पुडी दिली व सांगितले, " सवाशीण आहे. चोळीबांगडी करतो. पुडी उघडली तर त्यात ४१ रुपये . . . . . "**

पूज्य स्वामी स्वरूपानदाचे दर्शनाचा योग १९६९ साली आला. त्यानी 'संजीवनी गाथा' हे मोठे पुस्तक वाचणेस दिले. त्यातील १५३ वा अभंग " सखा माझा नारायण । करी चिता निवारण " आहे. त्या अभगावर " प्रसाद-भेट " स्वरूपानद ४–७–१९६९अशी सही करून दिली. त्याना वरील सर्व हकीगत सागितली. अतिशय आनंद झाला त्यावेळी सोऽहम् साधना करून घेतली वस्तीस या म्हणजे दोन शब्द सकाळी बोलेन असे सागितले. त्या प्रमाणे दरमहा वस्तीस जातो त्यानी सर्व प्रकारची पुस्तके, फोटो, पुतळा वगैरे प्रसाद म्हणून दिले आहेत शिवाय दिनाक १४–७–१९७१ रोजी पेटीत ठेवण्यासाठी ११ रुपये दिले माझी पत्नी सौ. विजया व मुलास घेऊन गेलो. दिनाक ३–२–१९७२ रोजी मुलगी चि. माधुरी हीस ५ रुपये, मुलगा चि श्रीपाद यास ५ रुपये खाऊसाठी दिले सौ. विजयाच्या हातात पुडी दिली व सागितले, " सवाशीण आहे. चोळीबागडी करतो " असे म्हणून खडीसाखर व पुडी दिली पुडी उघडून बघितले तर त्यात ४१ रुपये होते. हे स्वामीनी दिलेले सर्व रुपये प्रत्येकाचे नावाचे पाकिटात भरून ठेवले आहेत लक्ष्मीपूजनाचे दिवशी त्याची पूजा करतो तोच महाप्रसाद. दसऱ्याचे दिवशी स्वामीनी मला अनुग्रह दिला त्यावेळी स्वामीना विचारले, 'कोणता ग्रथ वाचू ?' त्यावेळी गुरुचरित्राची ९० पारायणे झाली होती, म्हणून त्याना सांगितले त्यानी सागितले, " १०८ पारायणापर्यंत नोद ठेवा. पुढे ठेवू नका. परंतु वाचन चालूच ठेवा. " त्याप्रमाणे आज रोजी १०२ पारायणे गुरुचरित्राची पूर्ण झाली आहेत. माघ शु।। ९ (दासनवमी) दिनाक १५–२–१९७४ रोजी चदनाच्या पादुका स्थापन करण्यास दिल्या. त्या दिवशी होमहवन, यज्ञ, पूर्णाहुती, बळी वगैरे शास्त्रोक्त पद्धतीने पादुकांची स्थापना झाली. तेव्हा महाप्रसाद घेणाऱ्या लोकांचे पान १४०० झाले. त्याच दिवशी संध्याकाळी स्वामीचे सागीवरून कु. सुमनताई ताडे यानी

स्वरूपानंद भजन केंद्राचे उद्घाटन केले. दोन दिवस अखंड कार्यक्रम चालू होते. दिनांक १०–६–१९७४ रोजी एक पुडी करून माझ्या हातात देत म्हणाले की, माझे कृपाछत्र तुमच्यावर आहे, असे सांगून पुडी दिली. त्यात त्यांचा वापरता स्वच्छ पांढरा रुमाल होता. त्यामुळे मला फारच आनद झाला. महायात्रेलाही उपस्थित होतो. अशा रीतीने स्वामींचा सहवास होऊन त्यांच्या कृपेने सोऽहम् साधना व रामकृष्ण हरी जप अखड चालू आहे



# स्वामी स्वरूपानंदांच्या हृद्य आठवणी

—ना. स. (नाना) करंदीकर

**" परिस्थिती बदलता येत नाही. दुसऱ्यांचे स्वभाव बदलता येत नाहीत. मग आपणच बदलायचे. ती शक्ती परमेश्वर देतो. असा बदल घडणे ही भगवंताचीच कृपा असे समजून समभावाने वागावे. "**

**—स्वामी स्वरूपानंदांच्या लेखकाला आलेल्या पत्रातील मजकूर.**

**(१) सद्‌गुरूंचे प्रथम-दर्शन :**

" साधकाचे परमार्थमार्गावर एक पाऊल पुढे पडले की परमात्मा चार पाउले पुढे सामोरा येऊन हात देतो. " असे योगी श्रीअरविंद म्हणत. तोच अनुभव सद्‌गुरूंच्या कृपेने भक्ताना लाभतो असे अनेकांच्या उदाहरणावरून दिसून येते. मलाही तोच अनुभव आला !

१९६६ सालच्या अखेरीस माझ्या पिताजीचे निधन झाल्यावर मला निराधार, एकाकी वाटू लागले पित्याचे वत्सल कृपाछत्र, कृपावरदहस्त मजवर सतत असल्याने मला कशाची कधी उणीव भासली नाही; पण नतर मात्र सद्‌गुरूची भेट व्हावी अशी ओढ वाटू लागली अशा साक्षात्कारी महान विभूतीचे दर्शन होणे ही सामान्य गोष्ट नव्हे. पण तो योग ११ मे १९६८ रोजी जुळून आला. रत्नागिरीस माझे स्नेही व स्वामीचे अनन्यभक्त श्री. नेने मला भेटले व म्हणाले, "नाना, तुम्हाला स्वामीचे दर्शन घ्यावयाचे आहे काय? चला तर मग उद्याच जाऊ. " मी होकार देताच ते तयार झाले. त्याच्या अगात त्या दिवशी ताप होता सौ. नेने यानी सावधगिरीचा इशारा दिला. त्यावेळी नेने म्हणाले, 'स्वामीच्या दर्शनास मित्राला नेण्याची संधी मिळत आहे—माझा ताप गेला!' —आणि खरेच स्वामीच्या कृपेने नेने याचा ताप निघाला व ते यायला निघाले " प्रसाद चिन्हानि पुरः फलानि " या उक्तीप्रमाणे स्वामीच्या असाधारण व्यक्तिमत्वाच्या पैलूची चमक मला त्याचे प्रत्यक्ष दर्शनापूर्वीच दिसू लागली. आम्ही पावसला पोचलो ते अत्यंत उत्साहाने, उत्कठतेने!

श्री. नेने यांनी माझी ओळख करून दिली. खोलीत प्रवेश करताच सुवास दरवळला. तेज:पुंज शांतब्रह्म, सुहास्य वदनाचे परमपूज्य स्वरूपानंद याचे दर्शन झाल्याबरोबर माझे कर जुळले. मस्तक नम्र झाले, नयन भक्तिभावाने पाणावले. दृष्टी मुखमंडलावर खिळताच अष्टसात्त्विक भाव उमटले. स्वामीच्या चरणी पुष्पे अर्पण केली व म्हणालो, " आज आपल्या दर्शनाचा योग भाग्याने आला " ' साधिकेची वाटचाल ', ' गीतांजलि अनुवाद ' ही पुस्तके त्याच्या चरणकमळी अर्पण केली. श्रीअरविंदाश्रमातून श्रीमाताजीकडून मिळालेला प्रसाद रुमाल त्याना अर्पण केला. पुस्तकात माझ्या मातापित्याची छायाचित्रे होती. त्याना वदन करून माताजीनी दिलेला रुमाल मस्तकी धारण करून स्वामींनी तो मला परत केला. ज्ञानेश्वरी नित्यपाठ,साधनाष्टक हे ग्रथ मला प्रसादभेट म्हणून दिले. सजीवनी गाथा हाती देऊन ते म्हणाले, " उघडा आणि वाचा " यदृच्छया उघडलेल्या पृष्ठावर स्वामीनी स्वाक्षरी करून ११।५।१९६८ हा दिनाक नोंदला व म्हणाले, उघडलेल्या पानावरील श्लोक मोठ्याने वाचा. एकदा वाचल्यावर म्हणाले, " पुन्हा वाचा " मी ते वाचत असताना व ते ऐकत असताना प्रसन्न मनाने डोलू लागले – बोल होते – ३८ व्या पानावरील अभगाचे–

**१ आवडीने भावे हरि-नाम गावे ।**
**निर्लज्ज नाचावे संकीर्तनी ।।**

(विस्तारभयास्तव मी तो सर्व अभंग एथे उद्‌धृत करीत नाही )

नतर " साधिकेची वाटचाल " हाती देऊन त्यातील पान उघडण्यास मला सागितले. जे पान उघडले ते पान तिसावे. त्यात लिहिले होते–

" ध्येयासाठी अविरत प्रयत्न हवा. समर्पण वृत्तीने पडेल तो त्याग करण्याची तयारी हवी. संपूर्ण समर्पणभावाने देण्यात धन्यता मानावी. त्यातच जीवनातील सर्वोत्कृष्ट आनंद सामावलेला आहे. आपण आपल्या जीवनमूल्याशी एकरूप समरस व्हावे ते प्रयत्न परमात्म्याला समजतात तेवढे पुरे ! "

या वाचनानतर प्रसन्न मनाने वरदहस्त ठेऊन स्वामी म्हणाले, " तुम्ही जे आता वाचलेत त्यात सर्व काही आहे. "

स्वामीनी प्रसाद दिला व म्हणाले, " या आता. पुण्यातील सज्जनाना माझी आठवण द्या. नमस्कार सागा. मला जास्त वेळ बसवत नाही मी आता विश्रांती घेतो. "

स्वामीची प्रकृती नाजूक, सुकुमार गुलाब पाकळ्यांनाहि लाजवणारी, भक्तांचे अंतरंग व मनोगत बरोबर ओळखून त्याना जे हवे ते त्याच्याच करवी ग्रंथातील उतारे त्याच्या निदर्शनास आणून देणारे! शात रसाचा धवल प्रसन्न प्रवाह सुवर्णपात्रातून सतत वाहात राहावा त्याप्रमाणे! त्यांचे दर्शन, त्यांचे सुहास्यवदन, त्यांचे सुमधुर उपदेशामृताचे बोल – सर्वच प्रसादपूर्ण!

सर्व शकाकुशंकांचे निरसन केवळ दृष्टिक्षेपाने करण्याचे सामर्थ्य महर्षींच्या तपस्येत आढळते. त्याचप्रमाणे स्वामीचे दर्शन अंतरंगाचा ठाव घेणारे, प्रसादयुक्त, पुण्यपावनकारक आहे असे अनेकाच्या प्रत्ययास येते असे मी ऐकत होतो ! त्याचे प्रत्यतर मला स्वत:ला आले.

१९६८ सालानंतर जे जे कार्य मी हाती घेतले ते ते स्वामीच्या आशीर्वादाने यशस्वी रीतीने पार पडले. दीपलक्ष्मीने स्वामी स्वरूपानंद विशेषांक काढला. त्यात "आत्मतृप्तीची सजीवनी." हा लेख मी सजीवनी गाथेवर लिहावा अशी मला स्वामीनी आज्ञा केली. ती त्याच्या कृपेने पुरी झाली. स्वामी रामतीर्थ चरित्र, श्रीअरविंद चरित्र, अक्कलकोटस्वामी महाराजाचे इग्रजी चरित्र लिहिण्याची प्रेरणा स्वामीची. त्या प्रत्येक वेळी मला स्वामी हाताशी धरून चालवीत आहेत असे वाटत आले – ही त्याची माझ्यावर केवढी कृपा!

**"जेथे जातो तेथे तू माझा सांगाती**
**चालविशी हाती धरोनिया।"**

या सतोक्तीची अनुभूती मला लाभली त्यामुळे मी पुढच्या जीवनात निर्भय झालो.

"दोन पुरुषोत्तमाची भेट" हा परमपूज्य सरसघचालक गोळवलकर गुरुजीच्या भेटीसबधी लेख मी एका उर्मीने लिहिला त्यातील प्रत्येक शब्द स्वामीनी तपासून पसत केला. आणि त्याच्या स्पर्शाने पुनित झालेल्या या लेखाला अहोभाग्य लाभले तो चिरंजीव ठरला! स्वामीच्या चरित्राच्या दुसऱ्या आवृत्तीत तो समाविष्ट झाला वद्य ठरला. ही त्या दोन महापुरुषाचीच कृपा नव्हे काय?

स्वामीच्या अलौकिक गुणावर आधारित त्याचे परम मगल चरित्र लेखांद्वारे वर्णन करून त्याचे चरणी वाङमय कुसुमाजली अर्पण करण्याचे भाग्य मला लाभले. टिळक विद्यापीठाच्या विशेषाकात "स्वामी स्वरूपानदाचे आगळे स्वरूप" हा माझा लेख आलेला पाहताच स्वामींचे अत करण आनदाने भारावले. कारण याच विद्यापीठाचे ते स्नातक होते याच विद्यापीठात काही महिने त्यानी कार्यवाहाचे कार्य तन्मयतेने करून वाहवा मिळविली होती

दुसरा स्वामीच्या दर्शनाचा योग आला तो १२ डिसेबर १९७० रोजी दत्तजयतीच्या सुमारास. आम्ही उभयता पावसला गेलो. शुचिर्भूत होऊन उभयता स्वामीच्या दर्शनास गेलो. आम्ही भेट वस्तू अर्पण करून पुष्पे वाहिली. मन प्रसन्न झाले.

१९६८ नतर ज्या ज्या ठिकाणी आमच्या तीर्थयात्रा झाल्या, त्या प्रत्येक ठिकाणी मला स्वामीचे पवित्र दर्शन घडे. या वेळी स्वामी रामतीर्थ चरित्र घेऊन मी गेलो व ते

त्यांच्याच चरणी अर्पण केले. स्वामीनी ११ डिसेंबर रोजी दर्शनाच्या वेळी मला जवळ बसवून घेऊन काही भाग वाचावयास सांगितला व काही प्रश्न विचारले. मी काही पृष्ठांचे वाचन केले व प्रश्नाची समर्पक उत्तरे दिली. ती त्याना पटली व प्रसन्न चित्ताने त्यानी आशीर्वाद देऊन वरदहस्त ठेवला. ह्या चरित्रास ओवीबद्ध आशीर्वाद दिला—

**" संतांचा सहवास आवडे जीवास ।**
**वुणावे उल्हास अंतर्यामी ।।१।।**
**होता संतभेटी तयांचे संगती ।**
**कराव्या एकांती गुज-गोष्टी ।।२।।**
**भक्ति-सुधा-रस सेवुनी यथेष्ट ।**
**असावे संतुष्ट आत्म-रंगी ।।३।।**
**स्वामी म्हणे मज हीचि एक आस ।**
**संतांचा सहवास नित्य घडो ।।४।।**

पुढे चरित्र प्रसिद्ध झाले व त्याला उत्तम प्रसिद्धी लाभली ती स्वामीच्या कृपेने.

स्वामींनी मला बोलावून अनुग्रह द्यावा अशी मला या वेळी तळमळ लागली होती. सद्‌गुरु हे भक्ताचे अत:करण जाणणारे. त्यानी हे बरोबर हेरून १२ डिसेंबर १९७० रोजी दत्तजयतीच्या पवित्र दिवशी बरोबर ३।। वाजता मला एकट्याला बोलावून जवळच्या बाकावर बसावयास सागितले. " सोऽहम् " महामत्राची प्रक्रिया समजाविली. प्राणायामाद्वारे तो कसा करावा हे स्वत: सोऽहम् स्मरण करून दाखविले व माझ्याकडून तो करून घेतला रोज काही वेळ साधना करीत चला. अगवळणी पडल्याने साधना सुलभ होते इद्रियाना वळण लागते, जाग येते. पुढचे यासंबधीचे मार्गदर्शन पुण्यातूनच श्रेष्ठ साधक बाळासाहेब वाकडे याच्याकडून मिळेल " असे सावकाश सागितले.

मग मी धाडस करून विचारले, " स्वामी, माझ्या लेखनाला चैतन्य लाभावे प्रासादिकपणाचे तेज चढावे, लेखन " स्वान्त: सुखाय " तसेच वाचकाना प्रसन्नता, मांगल्य व मार्गदर्शन मिळवून देण्याचे सामर्थ्य त्यात असावे ह्यासाठी आपले आशीर्वाद मिळावे. "

स्वामी क्षणभर थाबले. गभीर झाले आणि दुसऱ्याच क्षणी इग्रजीत मोठ्याने म्हणाले—

Remember, when you are writing
It is not you, but you are writing through Thy hand.
Remember, when you are thinking
It is not you, but you are thinking through Thy mind
and it is Through His heart that you are feeling and
getting inspired through His Grace and Love.-

आणि मग तुमच्या हस्ते लेखणीतून जे जे उतरले जाईल त्यात प्रसन्नता, मांगल्य, चैतन्य, प्रासादिकपणा, आवश्यक ते सर्व येत राहील. तुमचा समर्पणभाव जसा जसा जागृत होईल, वाढत जाईल, तसतसे तुमचे लेखन हे तुमचे न राहता त्या परमात्म्याच्या इच्छेचे आणि शक्तीचे स्वरूप असे प्रगटेल ! " —अमृतधारा (पान ३३) मध्ये स्वामीनी जगन्मातेजवळ अशीच प्रार्थना केली होती त्याचे स्मरण झाले.

अनुग्रह लाभला, मार्गदर्शन मिळाले, प्रसाद घेतला. मन प्रसन्न झाले मनाचे उन्नयन झाले चित्ताला स्थिरता आली विश्वास दृढावला श्रद्धा, भक्ती समर्पण भाव जडला. अत.करण भारावले कर जुळले. उदात्त विचाराने भारावून गेलो आणि स्वामीचे चरणी साष्टाग नमस्कार प्रविष्ट करून जे जे आणले होते ते समर्पण केले. त्यात माझी काही पुस्तके श्री. सोमण यानी दिलेला मेहेरबाबाचा फोटो, अरविद माताजीची छायाचित्रे इत्यादि इत्यादि. त्या सर्वाचा स्वीकार स्वामीनी प्रसन्न मनाने सुहास्य वदनाने केला.

स्वामीनी आम्हा सर्वाची आस्थापूर्वक चौकशी केली, व्यवस्था कशी झाली हे विचारले व निरोप दिला

आपणाकडे भेटीस येणाऱ्या प्रत्येकाकडे त्याचे बारकाईने लक्ष असे कोणतीही व्यावहारिक अडचण, सासारिक व्यथा दर्शनेच्छु मडळीनी व्यक्त केली की स्वामी शातपणे ती ऐकून घेत व म्हणत—

**" साधनी असावे तत्पर ।**
**संकटी न सोडावा धीर ।।**
**सोऽहं स्मरणे वारंवार ।**
**निजान्तर चोखाळावे ।।**

अशा या साक्षात्कारी महापुरुषाचे दर्शन दोनदा पुरेपूर घडले आणि मन शात झाले वारवार भेटीला जाण्याची तळमळ निमाली पुढे त्याच्या अखेरच्या दिवसात व ते परमधामास गेल्यावरही जाता आले नाही, पण त्याची खत वाटली नाही. त्याचे स्मरण होताच त्याचे दर्शन घडे. त्याच्या समाधिसोहळ्याचे चित्र मन.चक्षूपुढे सतत तरळत होते

एकदा मनाला विषण्णता आली तेव्हा स्वामीना शरण जाऊन तळमळीने लिहिले, " स्वामी, कृतज्ञता, प्रेम, श्रद्धा, विश्वास समाजातून लोप पावली की काय असे वाटते मन उद्विग्न होते स्नेही, नातलग, सगेसोयरे असे का वागतात कळत नाही. " स्वामीनी उत्तर दिले—

'स्वभाव बदलता येत नाहीत; परिस्थिती बदलता येत नाही. मग आपणच विवेकाने बदलायचे. तसे बदलण्याचे सामर्थ्य सहन करण्याचे धैर्य आणि शक्ति तो भगवंत आपल्या भक्ताना देतो. ती त्याचीच कृपा असे मानून वागायचे--

**"असो द्यावे चित्त प्रसन्न**
**भगवंती निष्ठा पूर्ण ।**
**तो संकटी सत्वर धावोन**
**देई संरक्षण निजभक्ता ।**
**निजभक्ता घेवोनी जवळी ।**
**कृपाकटाक्षे कुरवाळी ।**
**जेथिचा तेथे नेवोनि घाली ।**
**आनंदमेळी स्वरूपाया ।**

१५ ऑगस्ट १९७४ रोजी गुरुवार, गुरुपुष्यामृत अमृतसिद्धी योग, भगवान रामकृष्ण परमहस निर्वाण दिवस, द्वादशीचा प्रभातसमयीचा भारताच्या स्वातत्र्याचा पर्वकाळ हे सर्व योग साधून स्वामींनी पूर्वनियोजनानुसार प्रसन्न चित्ताने महानिर्वाणपद गाठले! ज्योतीत परमज्योत सामावली!

माझी काया गेली परी मी राहे जगदाकारे या समर्थोक्तिप्रमाणे--

आजकालचे नव्होत आम्ही ।
चैतन्य स्वरूपात इथ आमच अखड वास्तव्य आहेच

असे आश्वासन देऊन स्वामीनी आपली अमृतवाणी अभग ज्ञानेश्वरी, सजीवनी गाथा, पत्रमजुषाच्या रूपाने शाश्वत भक्ताना दिली त्याचे अनुभव साधकाना चिरकाल येत राहतील मलाही एक दिव्य अनुभव आला. तो सागितल्यावाचून राहवत नाही.

१३ ऑगस्ट १९७४ रोजी पहाटे चार वाजता म्हणजे स्वामीच्या महानिर्याणापूर्वी स्वामी धाबळी पांघरून हातात पळी पचपात्री घेऊन माझ्या निवासस्थानी आले. माझ्या खोलीत माझ्या पिताजीचे भव्य चित्र टागले होते, पिताजी पूजा करीत रुद्रावर्तन म्हणत असलेले ते छायाचित्र होते. स्वामी त्या छायाचित्रापाशी आले त्यानी नम्रभावे हात जोडले. मान लवबून पिताजीना अभिवादन केले आणि एक शब्दही न उच्चारता आल्या पाऊली ते निघून गेले

मी अर्थ समजलो जे काही पारमार्थिक चैतन्य, सामर्थ्य, कृपाप्रसाद, वरदहस्त तुम्हाला हवा तो येथे – याच वास्तूत सातत्याने तुमच्या पिताजीच्या रूपाने वावरत आहे त्याचे जीवन सत एकनाथाप्रमाणे. त्याचे स्मरण रोज करीत जा. त्यानाच शरण जा. मी वेगळा नाही, असे त्याना मला पटवायचे होते. मी थक्क झालो. हा दृष्टान्त बोलका, प्रभावी!

हीच अनुभूती माझ्या पिताजीसंबंधी सद्गुरु साईबाबांनी १९५० साली आणून दिली होती. त्याची साक्ष पटली. "तुझे आहे तुजपाशी परि जागा चुकलाशी" ही उक्ती आठवली. माझ्या पिताजीची आध्यात्मिक योग्यता, त्यांची अनासक्त वृत्ती, सात्त्विक आहार, आचारविचार, समर्पणभाव, ईश्वरभक्ती याची प्रचिती स्वामींनी या प्रसंगाने आणून दिली हे त्याचे माझ्यावर केवढे उपकार! केवढे ऋण!!

स्वामींचे गुणगान, त्याची योग्यता, त्याचे सामर्थ्य, त्याचे चैतन्य, त्याचे दिव्यत्व वर्णन करण्यास अमृताचेनेही पैजा जिंकणारे शब्दही अपुरे पडतील. आमचे शब्दसामर्थ्य तोकडे, याची जाणीव सतत ठेवून स्वामींच्या आठवणी त्यांची कृपादृष्टि, त्यांचे अमृत-बोल, त्यांचे मार्गदर्शन सतत प्रेरक होवोत, जीवन समृद्ध, कृतार्थ होवो अशी स्वामींचे पादपद्मी अनन्यभावे प्रार्थना करून हे गुणगान संपवितो.

शेवटी स्वामींचे आशीर्वाद फलदायी होवोत—

**क्लेशरहित संतोषी जीवन ।**
**प्रयाणकाळी सोऽहं स्मरण**
**घडो आवडी परमार्थ चिंतन ।**
**आशीर्वचन तुम्हासि दे ।।**

हल्ली रोज स्वामींनी "साधक-उपदेश" म्हणून दिलेले श्लोक वाचतो. जमेल तितका वेळ साधना करतो. स्वामींच्या छायाचित्राचे पूजन करतो, त्याचे अनन्यभावे स्मरण करतो. मन प्रसन्न होते, शांत होते, दिव्यानुभूतीने भारून जाते. आधार वाटतो. स्वामींच्याच प्रेरणेने, त्याच्या आठवणी संग्रहित करण्याच्या कार्यात सहभागी झालो आहे.

कितीही ग्रंथ वाचा, लेख लिहा, व्याख्याने द्या, गुणसंकीर्तन करा— पण स्वामींच्या प्रत्यक्ष दर्शनाने, कृपादृष्टीने प्रसादाने जे समाधान लाभते ते इतर कशानेही लाभणार नाही. ते दर्शनाचे भाग्य मला दोनदा लाभले. त्याची कृपादृष्टी सतत मजवर आहे— मी त्यांचा – ते माझे ही अनुभूती मिळाली म्हणून स्वामींचे पादपद्मी प्रार्थना ही की—

**मज अंतरीचा जाणोनिया भाव**
**पूर्ण करी स्वामी मनोरथ ।।१।।**
**आता मजलागी काय उणे जगीं ।**
**आवडीने मेळवीन शांति-सुख ।।२।।**
**झाले अंतर्बाह्य स्वामींचे दर्शन ।**
**स्थिरावले मन त्यांचे चरणी ।।३।।**

स्वामींच्या प्रेमाची, कृपेची, वरदहस्ताची अभिलाषा बाळगणारा स्वामींचाच एक नम्र चाहता — सेवक. – ना. स. करंदीकर



# माहेर घरी आले !

– सौ. सुशीला करंदीकर

माझ्या माहेरच्या घराण्यात अक्कलकोटचे स्वामी समर्थ यांची उपासना असे. त्यामुळे माझ्या मनावर तेच सस्कार जडत गेले. "श्रीस्वामी समर्थ जयजय, स्वामी समर्थ" असा मी जप करीत असे. माझ्या मामंजींना सद्गुरु गोदवलेकर महाराजानी स्वत: "श्रीरामनाम" जपाचा अनुग्रह दिला होता! 'मामंजी जन्मादारभ्य शिवोपासक' त्यामुळे १९६८ साली 'हे' स्वामी स्वरुपानंदांच्या दर्शनास गेले. त्या वेळी मला सहज त्यांच्या बरोबर जाता येणे शक्य असूनही मी गेले नाही. त्याचे मला काही वाटलेही नाही. स्वामी स्वरूपानंदांच्या दर्शनाची ओढ मला कधी वाटलीच नव्हती – वेळ आली नव्हती हेच खरे !

१९६९ साली एक सूचक प्रसादचिन्ह लाभले ते असे – आमच्या घरी एक स्वामी स्वरूपानंद-भक्त प्रसाद घेऊन आले. त्या वेळी मी स्वामी समर्थ अक्कलकोट महाराजांचे स्मरण करीत होते. त्याच स्मरणात स्वामी समर्थांचे शब्द स्फुरले – "ज्यांच्याकडून हा प्रसाद आला आहे तो मीच आहे." – काय? स्वामी समर्थ आणि स्वामी स्वरूपानद एकच! मग मी मनानेच प्रश्न केला, "माझे हे शारीरिक उपभोग केव्हा, कसे सपणार ?" त्या प्रश्नाला उत्तर मिळाले, "मीही तीन तपे झाली, हे भोग भोगतोच आहे ना ? भोग भोगूनच संपत असतात. तुलाही ते भोगावे लागतील. सहन कर." हे बोल मला पटले व त्याच क्षणी खात्री झाली की हे दोन अवतारी महापुरुष – अक्कलकोटचे स्वामी समर्थ आणि पांवसचे स्वामी स्वरूपानद – एकच !

ही खात्री पटल्यावर डिसेंबर १९७० च्या १० तारखेस मीच ह्यांच्या बरोबर पांवसला स्वामी स्वरूपानंदाच्या दर्शनास जाण्याचा आग्रह धरला व निघाले. आमच्या-बरोबर श्री. रा. प्र. कानिटकर व त्यांच्या पत्नी सौ. ताराबाई कानिटकर (स्वामी सत्यदेवानंदांच्या आत्याबाई) होत्या. आम्ही पांवसला गेल्याबरोबर शुचिर्भूत होऊन बोलावणे येताच स्वामीच्या दर्शनास गेलो. स्वामीच्या मुखमंडलावर केवढे विलक्षण तेज प्रसन्नता विलसत होती! फुले, भेटवस्तू अर्पण केल्यावर स्वामीनी मला "संजीवनी गाथा" स्वाक्षरी करून प्रसाद भेट म्हणून दिली व 'रोज वाचन करीत चला' असे सांगितले.

मी धाडस करून सागितले "स्वामी मला अनुभूती आली – आपण आणि अक्कलकोटचे स्वामी समर्थ एकच! हे ऐकताच स्वामीनी स्मित केले व वरदहस्त दिला अनुमतीदर्शक! बस्स. एवढी प्रचिती आल्यावर मला आणखी काय हवे होते? मी स्वामी स्वरूपानदाची अनन्य भक्त झाले. संजीवनी गाथा रोज म्हणते. छोटी आवृत्ती पाठ झाली आहे. पूज्य स्वामी स्वरूपानदाचे नित्य स्मरण हाच जीवनाधार झाला आहे.

त्यानतर पूज्य स्वामी सत्यदेवानद एकदा घरी आले त्यानी स्वतः भक्तिगीते म्हटली व माझ्याकडून म्हणवून घेतली. प्रसाद दिला. पुढे समजले की, स्वामी सत्यदेवा-नंदानाही अगदी असाच अनुभव आला होता ! माझी श्रद्धा, भक्ती दृढावली.

आम्ही जानेवारी १९७५ मध्ये पॉडिचेरी येथील श्री अरविंद समाधी दर्शन, त्रिचनापल्ली, मदुराई, कन्याकुमारी, रमणाश्रम, अरुणाचलम्, स्वामी विवेकानंद रॉक मेमोरियल पाहायला गेलो; पण त्या प्रत्येक ठिकाणी स्वामी स्वरूपानदांचे सान्निध्य मला जाणवे. आधार वाटे मन शात होई सजीवनी गाथेतील अमृततुल्य उपदेश आठवे.

मी कोणी साधिका नाही. लेखिका नाही, की भक्त नाही. मी कोठेही, कोणत्याही मठ, मंदीर, भजन-केंद्रस्थानी जात नाही. पण मला त्याची गरज वाटत नाही. स्मरणमात्रे मनःकामना पूर्ण करणारे स्वामी स्वरूपानद मला नित्य दर्शन देतात. त्याच्या महा-निर्याणानतर फक्त तीन दिवसानी १७ ऑगस्ट १९७४ रोजी स्वामीचे साक्षात दर्शन मला माझ्या खोलीत जाणवले! माझे कर जुळले, मस्तक नम्र झाले, मी वदन केले आणि स्वामीकृपेची याचना केली स्वामी समर्थाप्रमाणे स्वामी स्वरूपानदाचा वरदहस्त मला लाभला आहे मला आता काय उणे? आता काहीही मिळवायचे राहिले नाही कशातही जीव गुतून राहिला नाही. आता स्वामीचे चरणकमळी प्रार्थना ऐवढीच की —

**मी माझे मावळो सर्व – तू तुझे उगवो आता ।**
**मी तू पण जगन्नाथा – होवो एकचि तत्त्वतः ।**

२६।८।१९७४ रोजी साक्षात्कार झाला त्या प्रसगी स्वामी दर्शन देऊन म्हणाले, "सुशीला, तू माझी कन्या बर." – गुरुमाऊली सर्वार्थाने माउली झाली ! —



# होणार ते होते प्रारब्धेंच

– सौ. सुमति पाटकर

**"होणाऱ्या गोष्टी होणारच. त्या केव्हाच चुकत नसतात. तुम्ही फक्त हा अभंग स्मरण करा म्हणजे चांगले होईल. काही काळजी करू नका" असे स्वामींनी म्हणताच माझे मन शांत आणि प्रसन्न झाले**

एकदा मी बुधवारी कुडाळला बाजारासाठी गेले. माझ्या घरी माझी सहा वर्षाची सुनीता नावाची मुलगी ताप येऊन सध्याकाळी पाच वाजता कालवश झाली, तेव्हा ताबडतोब स्पेशल गाडी करून माझ्या पूज्य वडिलानी कुडाळहून पाट येथे आणले. माझ्या मुलीला देवाज्ञा झाल्याने माझे लक्ष कशावरच लागेना तेव्हा माझे वडिलानी मला पूज्य स्वामीजवळ दहा दिवसानी मनाचे सात्वन होण्यासाठी नेले. परंतु मला वाटले की जुनी माणसे ज्योतिषबुवाना ज्योतीष विचारतात. ही घटना का घडावी ? यापुढे काय होणार ? वगैरे...

ती. आबाच्या सागण्यावरून आम्ही एक दिवस पूज्य स्वामीच्या दर्शनासाठी गेलो पाट-पांवस प्रवास फार लांबचा असल्याने रात्रौ आठ वाजता पोहोचलो. दुसऱ्या दिवशी सकाळी स्वामीचे दर्शन घेतले. त्याच वेळी पूज्य स्वामीनी मला व ती आबांना बसायला सागितले. थोडया वेळाने माझे हातात "सजीवनी गाथा" मधील १८९ या अभंगावर खूण करून दिले व मनन करायला सागितले.

**राम-नाम येतां कानी ।**
**होय पातकांची धुनी ।।१।।**
**राम-नाम घेतां वाचे ।**
**होय सार्थक देहाचे ।।२।।**
**राम-नामाचे स्मरण ।**
**होता चुके जन्म-मरण ।।३।।**
**उच्चारांत राम-नाम**
**स्वामी झाला पूर्ण-काम ।।४।।**

हा अभंग दोन वेळा माझ्याकडून म्हणून घेतला व घरी जाऊन म्हणायला सांगितले. त्यांनी प्रसाद देऊन घरी जाण्यास मुक्तता केली. ती. आबांना एवढ्या लवकर कधीच परवानगी देत नसत. परंतु मी बरोबर होते त्या कारणाने त्यांनी आपल्या भक्तसेवकांना मुक्त केले. नमस्कार करून प्रसाद घेऊन दरवाजाकडे येईपर्यंत व पूर्वीही मला अभंगाचा अर्थ किंवा कांहीच समजले नाही. फक्त माझी पूर्वकल्पना – ज्योतिषाची, विचारपूस वगैरेची – मातीमोल ठरली. माझी आर्थिक परिस्थिती मुळीच चांगली नव्हती. ती. आबांच्या पुढ्यात व इतक्या शांत, प्रसन्न वातावरणात मी तरी काय बोलणार? पण दरवाजातून बाहेर पडणार तोच पूज्य स्वामींनी मला आत बोलावून घेतले आणि कोमल आवाजात सांगितले की, "होणाऱ्या गोष्टी होणारच, त्या केव्हाच चुकत नसतात. तुम्ही फक्त हा अभंग स्मरण करा म्हणजे चांगले होईल. काळजी करू नका." तेव्हा माझे मन शांत, प्रसन्न झाले आणि दरवाजाकडे ती. आबा उभे होते. त्याच्या जवळ जाताच त्यांनीही म्हटले, तुला आशीर्वाद चांगला मिळाला आणि काही दिवसातच माझी मन:स्थिती सुधारावयास सुरुवात झाली. आता सध्या माझी आर्थिक परिस्थिती चांगली असून कुटुंब आनंदाने व सुखाने नांदत आहे.

• • •

# कुलधर्म 'रामसेवा' तो पांवसीं पहावा

– श्री. रा. वा. कुलकर्णी, पुणे

**माझ्या छोटया मुलाला दर्शनाकरिता आत आणा, असा स्वामींचा निरोप आला. त्याच्या पायातील बूट काढण्यास सुरूवात करताच, 'त्याला तसेच आणावे. चालेल.' असे गुरु माऊलींनी सांगितले. काय हे मनाचे मोठेपण !**

श्रीस्वामीची माहिती प्रथम आम्हाला केवळ योगायोगानेच कळली. १९६८ साली गोदवले येथे उत्सवासाठी गेलो होतो. उत्सव सपल्यावर एस. टी. मधून परत येताना आमचे शेजारी रामदासी श्री. राघवेंद्र बसले होते. उत्सवाबद्दल बोलतांना सौ. त्याना म्हणाली, की आजच्या काळात महाराजासारखे सत्पुरुष का नसावेत? त्यावेळी श्री. राघवेंद्र म्हणाले की, 'तसे सत्पुरुष असतात. आपला दर्शनाचा योग यावा लागतो.' त्याना आम्ही " तुम्ही अशा एखाद्या विद्यमान सत्पुरुषाचे दर्शन घेतले आहे का?" असे विचारले. त्यावेळी त्यानी श्रीस्वामीची माहिती आम्हाला सागितली. तथापी आमच्या उद्धाराची वेळ तोपर्यंत आलेली नसल्यामुळे आम्हाला श्रीस्वामीच्या दर्शनाचा लाभ घेण्याची बुद्धी लगेच झाली नाही.

१९६९ साली श्रीस्वामीबद्दलचा 'दीपलक्ष्मी'चा अंक प्रसिद्ध झाला आणि तो वाजताच आम्ही श्री. स्वामीच्या दर्शनासाठी जाण्याचे निश्चित केले. मी व सौ. आमच्या धाकटया मुलासह पावसला गेलो. जाण्यापूर्वी श्री. भाऊदेसाईंची गाठ घेतली होती. त्यावेळी ते पुण्यास काही कामासाठी आले होते. आम्ही कोल्हापूरला गेलो व सकाळच्या ६ च्या रत्नागिरी गाडीचे रिझर्वेशन केले. आम्ही गाडीत बसलो आणि श्री. देसाईही त्याच गाडीत चढले. म्हणजे श्रीस्वामीनी आम्हाला कोल्हापूर-पासूनच घरची सोबत पाठविली होती कारण आम्ही तिकडे प्रथमच जात होतो. तिक-डची काहीच माहिती नव्हती. त्यामुळे इकडे तिकडे चौकशी करावी लागली असती. पण श्री. भाऊ देसाईच बरोबर असल्यामुळे काहीच प्रश्न पडला नाही.

त्यावेळी श्रीस्वामीची प्रकृती बरीच चागली असून ते पलंगावर बसून दर्शन देत असत. आम्ही खोलीत प्रवेश केला. श्रीस्वामींनी त्यांच्या अमृतमय दृष्टीने आमच्याकडे

पाहिले. आणि शेजारच्या बाकावर बसण्यास सांगितले. त्याची अमृतमय वाणी आणि दृष्टी तसेच आंतरिक जिव्हाळ्याची भाषा ऐकून आम्ही तृप्त झालो. मनाला झालेला आनद शब्दात व्यक्त करणे केवळ अशक्य. श्रीस्वामीनी अत्यंत प्रेमाने सर्व चौकशी केली. त्याचा आवाज अत्यंत मृदु, कोमल आणि प्रेमाने ओथंबलेला होता. " कोठून आलात ? घरी कोण कोण असते ? काय करता ? इकडची माहिती कशी कळली ? " असे श्रीस्वामीनी विचारले. त्याची समर्पक उत्तरे दिली. " श्री. पांडे याचा परिचय आहे का " असे विचारल्यावर अजून आमचा कोणाचाच परिचय नाही. केवळ श्री. राघवेंद्रानी सागितलेली माहिती लक्षात ठेवून जेव्हा 'दीपलक्ष्मी'चा अंक वाचला त्यावरून इकडे आलो, असे सागितले. श्रीस्वामीनी गोदवलेकर महाराजाच्या प्रवचनाचे पुस्तक वाचावयास दिले एक प्रवचन मी स्वत. वाचले. थोडे वाचन झाल्यावर श्रीस्वामीनी पुरे असे सागितले. नतर सौ. नेही एक प्रवचन वाचले. श्रीस्वामीना जास्त बोलवत नसे. त्यामुळे दर्शनार्थीशी श्रीस्वामी असेच निरनिराळ्या ग्रथवाचनातूनच सवाद करीत असत. विशेष म्हणजे दर्शनार्थीची शका किवा निवेदन हे अचूकपणे त्याच वाचनातूनच व्यक्त होत असत. त्यावेळी श्रीस्वामी भक्ताने शरणागती दर्शवून प्रार्थना केल्यास अनुग्रह देण्याची कृपा करीत असत याची आम्हाला काहीच कल्पना नव्हती. त्यामुळे तशी विनती आम्ही गुरुमाऊलीला केली नाही. अर्थात त्याच्या केवळ एका दृष्टिक्षेपानेच आम्ही त्याचे अकीत झालो होतो आणि आता पुढच्या आयुष्यात केवळ त्याचाच खरा आधार आपणास आहे, अशी भावना त्यावेळी दृढमूल झाली. दर्शनानतर सौभाग्यवतीने देवाचे काय व कसे करावे ? असे विचारले. तेव्हा आपल्या कुलधर्माप्रमाणे वागावे आणि जमेल तसे देवाचे करावे. आपले सर्व निवेदन भक्तीने देवाला करावे असे सांगितले. आता पुन्हा दर्शनाला केव्हा येऊ ? असे विचारल्यानंतर ' प्रवास लांबचा आहे. घरी लहान मुले आहेत. तेव्हा इतक्या लाबवर येण्यापेक्षा तेथेच स्मरण केले तरी चालेल. ' असे गुरुमाऊलीनी सागितले. त्याच्या ह्या प्रेमळ शब्दांनी आम्ही जास्तच भारावलो.

आम्ही श्रीस्वामीच्या दर्शनास गेल्यावेळी आमचा धाकटा मुलगा बाहेर ओटीवर झोपला होता व आम्ही दोघेच आत गेलो होतो. श्रीस्वामीनी प्रसाद देण्यासाठी त्याची चौकशी केली. तो झोपला आहे असे सांगितल्यावर ' असू दे ' म्हणाले. आम्ही प्रसाद घेऊन बाहेर आलो. ५। वाजता एस.टी. होती म्हणून श्री. भाऊंचा निरोप घेऊन निघालो. मुलाला उठवून श्रीस्वामीच्या खोलीवरून जात होतो तेव्हा ' तो उठला आहे तर त्याला प्रसादासाठी आत आणा ' असा श्रीस्वामींचा निरोप आला. त्याच्या पायातील बूट काढण्यास सुरूवात करताच, ' त्याला तसेच आणावे. चालेल.' असे गुरुमाऊलीनी सागितले. आत सौ. ने नेले व त्याच्या हातावर श्रीस्वामीनी प्रसाद ठेवून आशीर्वाद दिला.

बाहेरील एका टेबलावर ठेवलेल्या रजिस्टरमध्ये नाव व पत्ता लिहिण्यास श्रीस्वामीनी सांगितले. तो लिहिला व परत फिरलो.

भक्ताच्या मनातील भावना जाणून घेऊन त्या प्रमाणे त्याच्यावर कृपा होऊन त्याना आनद मिळणे अशा अनेक गोष्टी अनेक भक्ताच्या बाबतीत घडलेल्या आहेत. मला स्वतःला दोन तीन वेळा अशा तऱ्हेचा आनंद मिळाला.

एका वर्षी मी व श्री. पागारे असे दोघेच दर्शनासाठी गेलो होतो. परत येण्याचे दिवशी सकाळी दर्शनासाठी व प्रसादासाठी आत गेलो होतो. त्या वेळी श्रीस्वामीनी आशीर्वाद दिल्यावर मनात विचार आला की सौ. विजू व मुलाना आशीर्वाद असावा, अशी विनती करावी. हा विचार मनात येऊनही उच्चार करण्याचे धाडस होईना. इतक्यात श्रीस्वामी स्वतःच " विजू व मुलाना आशीर्वाद आहे. " असे म्हणाले. त्यामुळे मनाला फार आनद वाटला.



# श्री स्वामींच्या शब्दांची शक्ति

– सौ. मालतीबाई पंचवाघ
–श्री. वि. दा. पंचवाघ, कोल्हापूर

एकोणिसशे अडुसष्ट सालच्या भाद्रपदातील गोष्ट. आम्ही उभयता श्रीस्वामीचा अनुग्रह घेण्याकरता भाद्रपद शुद्ध प्रतिपदेला पावसला पोहोचलो. श्रीस्वामीनी सकाळी दहा वाजता दोघांनाही अनुग्रह दिला. त्यानतर दुपारी चार वाजता व दुसरे दिवशी सकाळी आठ वाजता सोऽहम् ची प्रक्रिया दोघांकडून करवून घेतली. दुपारी चार वाजता श्रीस्वामीच्या दर्शनास गेल्या वेळी दुसऱ्या दिवशीच हरतालिका असल्यामुळे त्यांची परवानगी घ्यावी व लगेच निघावे अशा हेतूने श्रीस्वामीना मी जाण्याची परवानगी मागितली. तेव्हा ते म्हणाले, " आज मुक्काम करा व उद्या सकाळी पहिल्या गाडीने जा. ' हरितालिकेच्या पूजेकरिता कोल्हापुरी सकाळीच असले पाहिजे अशी अडचण मी स्वामीना सागितली ते म्हणाले, " तुम्ही आज मुक्काम करा; सकाळी साडेसहाच्या गाडीने येथून निघा. व रत्नागिरीहून आठ वाजता सुटणाऱ्या कोल्हापूर गाडीने जा, म्हणजे तुम्ही वेळेवर घरी जाल व हरतालिकेची पूजा तुम्हाला मिळेल " आम्ही श्री-स्वामीच्या आज्ञेप्रमाणे त्या दिवशी मुक्काम करून दुसऱ्या दिवशी सकाळी साडेसहाच्या गाडीने पावसहून निघालो श्रीस्वामीनी आदल्या दिवशीच रत्नागिरीला श्री. दादा-साहेब मालवणकराना निरोप पाठवून सकाळी साडेसातला राजिवड्याच्या खाडीवर गाडी घेऊन येण्यास व आम्हाला कोल्हापूरला आठ वाजता सुटणाऱ्या गाडीत बस-विण्यास कळविले होते. आम्ही दोघे राजिवड्यात उतरताच ते म्हणाले, " पचवाघ तुम्हीच ना ? तुम्हास नेण्यास मला श्रीस्वामीचा निरोप आला आहे. त्याप्रमाणे गाडी घेऊन मी आलो आहे. यापूर्वी आम्ही त्याना पाहिलेही नव्हते. त्यानी एस. टी. स्टॅंडवर येऊन आमची गाडीत बसविण्याची व्यवस्था करून निरोप घेतला. आम्ही बारा वाजता घरी पोहोचलो. व पाहतो तो तर सकाळी नऊ वाजता गुरुजीना बोलाविले होते; परंतु ते आलेले नव्हते; व आम्ही पोचल्यानतर दहा मिनिटातच आले. ते म्हणाले, " तुमच्याकडे ठरल्याप्रमाणे नऊ वाजता येणार होतो, परंतु राजारामपुरीतील एक गृहस्थ गाडी घेऊनच आले व फार आग्रह करून घेऊन गेले. त्यामुळे मला येण्यास उशीर झाला. " नंतर यथासाग पूजा झाली व पूजा स्वामीनी सांगितल्याप्रमाणे मिळाली म्हणून समाधान झाले. त्याचप्रमाणे श्रीस्वामीनी आम्हाला आठची गाडी मिळावी म्हणून

आगाऊच केलेली व्यवस्था पाहून आनंद वाटला व गुरुजींना अकल्पित दुसरीकडे जावे लागले व ते येण्याच्या आत आम्ही घरी पोहोचलो व श्रीस्वामींचे शब्द खरे झालेले पाहून धन्य वाटले.

श्रीस्वामीच्या शब्दातील शक्तीचा अनुभव असा प्रथम भेटीतच आला.

(१) प्रथम दर्शन केव्हा घडले? ( २४–८–१९६८)

पुढे किती वेळा ? :— दरवर्षी जन्मोत्सव व गुरुपौर्णिमेनंतर पण श्रावण सुरू होणेचे अगोदर याप्रमाणे दर्शने व सहवास मिळाला.

कोणते आदेश मिळाले ? :– कुलधर्म कुलाचार पाळावे. इष्टदेवतेची जी उपासना करता ती त्याच प्रमाणे करीत जावी. सोऽहम्‌चा अभ्यास सकाळ संध्याकाळ दहा पंधरा मिनिटे करावा. अनुसधान टिकविण्याचा प्रयत्न करावा.

प्रत्येक खेपेला सोऽहच्या अभ्यासाची प्रगती कशी होत आहे असे दोघेही श्रीस्वामीना विचारीत होतो. "अभ्यास ठीक आहे, असाच चालू ठेवा, हळूहळू प्रगति होईल" असे आदेश मिळत होते. दोन्ही खेपेस सोऽहंची प्रक्रिया आम्हा दोघाकडून श्रीस्वामीनी करवून घेऊन 'बरोबर आहे' असे सागितले.

१९७३ मध्ये 'पथराज' पुस्तकातील ओवी पान काढून वाचणेस दिली पुस्तक मिटल्यामुळे येईल ते पान काढून वाचा म्हणाले, पण नेमके तेच पान निघाले. ती ओवी अशी —

"म्हणोनि थोरपण पऱ्हा साडिजे।
येथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जे जगा धाकुटे होईजे।
तै जवळिक माझी।।

हाच शेवटचा आदेश त्यानंतर श्रीस्वामींशी सभाषण होऊ शकले नाही

(२) अनुभव वेळोवेळी कोणते आले ? :— प्रमुखतः जे दोन अनुभव आले ते कळविले आहेत. त्याशिवाय नित्य व्यवहारात बरेच आले; परतु ते उच्चस्तरीय नसल्यामुळे देत नाही

जर अध्यात्म क्षेत्रातील अनुभव असा अर्थ घेतला तर रोज खालीलप्रमाणे आम्हा उभयतांना अनुभव येतात.

मी :— दोन्ही कानातून अनाहत नाद सारखे ऐकू येतात. ध्यानास बसते वेळी शुभ्र पाढरा प्रकाश दिसतो. हे एक वर्षाने अनुभवास आले. १९७४ पासून मस्तकात तालु प्रदेशांत ध्यानाचे व जपाचे वेळी व्हायब्रेशन्स येतात. (लहरी येतात मुग्या आल्या-प्रमाणे). नाकाला सुगंध येतो. जिभेला वेगळी चव येते. मन शांत व समाधानी वाटते.

● ● ●

# पांवस – माझं माहेर !

– सौ. विजया राजाराम कुलकर्णी, पुणे

**. . . . " बघितलेल्या किंवा माहीत असलेल्या गावाविषयी ओढ लागते. परंतु पांवस या न पाहिलेल्या गावाला हवा पालटायला जायची इच्छा आम्हाला का व्हावी? कारण स्वामीविषयींची अपार ओढ. "**

१९६९ सालची गोष्ट. मी अत्यत आजारी पडले. जगते का मरते अशी अवस्था! त्यावेळी स्वामी स्वरूपानदाच्यावरील 'दीपलक्ष्मी'चा अक वाचनात आला. त्या थोर विभूतीला बघण्याची तळमळ लागून राहिली. डॉक्टरानी सागितले कुठे तरी हवापालट करून या. मानसिक शातता मिळेल असे गाव हवे होते. असे एकमेव ठिकाण म्हणजे पावस असे वाटत होते जे गाव कधीच पाहिले नाही तिथे जायची मनोमन ओढ लागावी हा चमत्कार नव्हे काय? जायचा बेत ठरला. गुरुमाऊलीची तर आमच्यावर इतकी अलोट कृपा की कोल्हापूरपासून थेट पावसपर्यंत आम्हाला श्री. भाऊ देसाई याची सोबत मिळाली. पावसला पोहोचल्या बरोबर मी ह्याना म्हटले, 'जेवणापूर्वी जर स्वामीचे दर्शन झाले तर किती बरे होईल?' हे वाक्य पुरे होते न होते तोच खोलीतून निरोप आला, 'तुम्हाला दर्शनाला बोलाविले आहे.' ह्या दुसऱ्या चमत्काराने मी क्षणभर स्तब्धच झाले.

आम्ही खोलीत गेलो. खोलीतील ती थोर विभूती पहाताक्षणीच मी अक्षरश: देहभान हरपून गेले. मी माझी उरले नाही. जणू काय एका तेजातच आपण न्हात आहोत असे वाटत होते. शात मनोहारी नयन, तेजस्वी मुद्रा आणि ओष्ठद्वयावरील मृदुमुलायम गोड हसणे, अत्यत हळुवार आवाजात उमटलेली वाणी ऐकून तनमन पुलकित झाले. वाटले आज आपण धन्य झालो पावन झालो. माऊलीने सर्वांची चौकशी केली. मला 'सजीवनी गाथा' आणि ह्याना 'नित्यपाठ' अशी पुस्तके प्रसादभेट म्हणून दिली. सजीवनी गाथेतील कुठलेही पान उघडायला सागितले. माझ्या हातून उघडल्या गेलेल्या पानावर नयन मनोहर असे श्रीकृष्णाचे चित्र होते. माझे अत्यत आवडते दैवत. माझ्या आश्चर्याला पारावार उरला नाही. सध्याकाळी चार वाजता श्रीस्वामीनी आम्हाला बोलावून घेतले. आम्हाला दोघांना 'गोदवलेकर महाराजाची प्रवचने'

वाचावयास सांगितली. सोऽहम् ध्यान कसे करायचे ते सांगून आमच्याकडून करवून घेतले. ' मी दररोज काय करू ? ' विचारता ' सजीवनी गाथेतील चार अभंग वाचत चला ', असे सागितले.

स्वामीचे थोर भक्त श्री. पाडे याची ओळख झाली एकदा ते दोघे पतिपत्नी आमच्याकडे आले होते. तो दिवसही मला आठवतो, २१ । ६ । ७० ह्या तारखेचा होता. श्री. पाडे याचा वाणीचा रसाळपणा तशात स्वामीकथा मग काय विचारता ? गप्पा खूपच रगल्या. मन त्या धुदीत रगलेले. मी तशीच झोपी गेले. पहाटे पाच वाजता अगदी सुस्पष्ट रीतीने 'मी आलो! आलो! ' असा स्वर कानी पडला. तेवढ्यात माझ्या तोडून काही ओवीबद्ध शब्द बाहेर येण्याची घाई करीत आहेत असे मला वाटले. मी भराभर कागदावर लिहू लागले. त्या ओव्या माझ्या सग्रही आहेत अशा तऱ्हेने श्रीस्वामीनी कवित्वाचा प्रसाद मला दिला. एकदा तर अशी गमत झाली की मी पावसला गेल्यावर सत्यदेवानदस्वामीच्या दर्शनास गेले होते. येथे वैद्यबाई आल्या होत्या तेवढेच त्याना मी पाहिलेले. तर मी पावसच्या आश्रमाच्या दारात जाते न जाते तोच त्याच्या तोडून उद्गार बाहेर पडले,, " अगबाई ! ह्याच त्या बाई, ज्याच्याबद्दल मी तुम्हाला सागत होते. " नतर त्यानी उलगडा केला की, ' तुम्हाला श्रीस्वामीचे दर्शन झाल्यानतर जे काव्यस्फुरण झाले तीच माहिती मी ह्या लोकाना सागत होते. तेवढ्यात तुम्ही हजर झालात. "

ह्या मुक्कामात स्वामीनी आम्हाला दोघाना जवळ बसवून घेऊन अनुग्रह दिला. उत्तमोत्तम आशीर्वाद दिले. ह्याच मुक्कामात आणखी एक चमत्कार घडला. स्वामीनी सांगितले, ' विश्वेश्वराचे दर्शन घेऊन या ! ' त्याप्रमाणे आम्ही सर्वजण विश्वेश्वर दर्शनास गेलो. तेव्हा एक उत्कट अनुभव आला. आश्रमाकडे परत येताना सहजपणे माझे दोन्ही हात मी तोडावरून फिरवले तर त्या दोन्ही हाताना अतिशय गोड सुगंध येत होता. माझ्या हातांना हा सुगध येणारा सगळ्यांना जाणवला. सुवास सगळ्यांना आश्रमात येईपर्यत आला. नतर बंद झाला.

एका भेटीत स्वामीनी माझी काव्याची वही मागून घेतली. त्यावर आपली परम-दिव्य अशी सही केली आणि सहीच्या रूपाने अजरामर असा आशीर्वाद देऊन ठेवला. मी पावसला गेल्या वेळी दिवाळीच्या सुमारास रांगोळी काढत असे. त्या रांगोळीवर श्रीस्वामीची दिव्य दृष्टी पडत असे. स्वामीकृपेने ही रागोळीची कला देखील माझ्या हातात आता आली. प्रतिभेबरोबरच रंगावलीची देणगी त्यानी मला दिली. ह्याच वेळी ' अभंग ज्ञानेश्वरी ' हा ग्रंथ घेण्याचा माझा मनोदय होता. परंतु प्रती शिल्लक नव्हत्या. पण स्वामींनी ही गोष्ट मनोमन ओळखली. पांवस सोडताना माझ्या हातात ' ज्ञानेश्वरी सार ' हे छोटेसे पुस्तक पडले. त्यातील

**न म्हणे सान । न म्हणे हा थोर**
**जाणे मी साचार । भक्ति एक**
**असे भक्तिभाव । जयांचे अंतरी**
**तेथे वास करी । निरंतर**

ह्या अभंगातील ओळीवर खुणा केलेल्या होत्या. ह्या पुढचा चमत्कार म्हणजे बरोबर तीन महिन्यानी गुरुपौर्णिमेच्या दिवशी म. दा. भटाच्या बरोबर श्रीस्वामीच्या सहीची अभंग ज्ञानेश्वरी ही पोथी प्रसाद भेट म्हणून आली. पोथी मिळाल्याचे मी श्रीस्वामीना पत्र लिहिले. त्या पत्राचे उत्तर आले त्यामध्ये ससार करीत असताना ध्यानधारणा कशी करावी त्याबद्दल सुदर थोडक्यात बोधप्रद असे विवेचन होते. त्यात एक ओळ अशी होती की, ' ज्ञानेश्वरी वाचावयास घेतल्यावर एक आवृत्ती दीड ते दोन महिन्यानी पुरी करावी. ' सागायचे कारण म्हणजे खरोखर त्या वेळेपर्यत मी ' श्रीअभंग ज्ञानेश्वरी ' वाचावयास घेतली नव्हती.

एकदा मनामध्ये स्वामीनी बसून दर्शन द्यावे अशी इच्छा निर्माण होऊ लागली. तशी एक दिवस स्वामी मला खोलीत गेल्या बरोबर म्हणाले, " बसून राहिले तर बोलता येत नाही. पडून राहिले तर चार शब्द तरी बोलता येतात. प्रकृती फार नाजूक झाली आहे. " स्वामीचे शब्द ऐकून मला खूप वाईट वाटले. हे बोलणे झाले. त्यानतर दुसऱ्या दिवसाची गोष्ट. आश्रमातील गर्दी कमी झाली होती. दोन वाजता दर्शनाकरिता आम्ही कुलकर्णी मडळी बाहेर थाबलो होतो इतक्यात श्री. बा. म. पराजपे खोलीच्या बाहेर आले आणि त्यांनी मला जवळ बोलावून सागितले की, " स्वामी खीर घेण्या-करिता उठून बसले आहेत तर तुम्ही दोघे आणि नतर मुले असे दर्शनाकरिता बोलाविले आहे तुम्हाला काही बोलावयाचे असल्यास बोलू शकता पण स्वामी मात्र काही बोल-णार नाहीत " पटकन् आम्ही दोघे आत गेलो. आत जाताच सुहास्यवदन श्रीहरीची मूर्ती पहावयास मिळाली माझी साधना वाढावी अशा शब्दलहरी ओठातून बाहेर पडतात तोच त्या मगलमय तेजोमय सद्गुरूच्या मुखातून 'आशीर्वाद' असे कृपामृताने रसरसलेले प्रासादिक शब्द बाहेर पडले. ते ऐकताच सर्वांगावर रोमाच उठले. दोघाचे देहभान हरपले आम्ही बाहेर आल्यावर मुले दर्शनास गेली तर त्याच्याशी ते खूप बोलले. मला गहिवरून रडू कोसळले बाहेर पडते तो विजयदादाची हाक ऐकू आली, " अहो, कुलकर्णी वैनी इकडे या स्वामीनी प्रसाद दिला आहे. " त्यानी माझ्या हातात पिशवी ठेवली. आत डोकावून पाहाते तर आत आबे होते. आपल्या कन्येची पाठवणी अशी तशी केली नाही तर आशीर्वादरूपी खण देऊन आम्रफलाने ओटी भरून प्रासादिक ग्रंथ हातात देऊन केली. खरेच असे अमाप प्रेम कुठेच मिळाले नाही. ते स्वामींनी मला पोटभर दिले. असे किती तरी प्रसग आहेत की जेव्हा स्वामीनी आशीर्वादाबरोबरच

अनेक ग्रंथांच्या प्रसादभेटी दिल्या आहेत. चांदीच्या पादुका घेऊन गेले होते तेव्हा एकदा दर्शनाला पन्नास एक लोक होते. वाटले स्वामींनी आपल्या नावाचा पुकारा करून सर्वाआधी दर्शनाला बोलाविले तर. हा विचार संपतो न संपतो तोच खरेच विजयदादांनी माझ्या नावाचा पुकारा केला, " अहो, कुलकर्णी वैनी, इकडे या. स्वामींनी दर्शनाकरिता बोलाविले आहे." मीगेल्यानंतर त्यानी सागितले, " स्वामी आताच हस्तस्पर्श करून पादुका घेत आहेत त्या घ्या. " पादुका घेऊन मी नमस्कार केला. स्वामीनी पूर्णतया हात उचलून आशीर्वाद दिला. त्या दिवशी रात्री आश्रमात ज्या खोलीत मी राहात होते त्या खोलीतील स्वामीचा फोटो पाहून असा फोटो मुले अभ्यास करतात त्यांच्या समोर पाहिजे. दुसरे दिवशी दर्शनाच्या वेळी माझी जेव्हा पाळी आली तेव्हा संजय लाडने एक पाकीट आणून माझ्या हातात दिले. उघडून पहाते तो ज्या फोटोची मी इच्छा केली होती तोच फोटो त्यात होता. आणि दुसरा एक ध्यानस्थ बसलेला फोटो होता.

स्वामीच्या समाधीसोहळ्यांचे दृश्य मला १३ ऑगस्टला जसेच्या तसे दिसले होते. एकदा माझी प्रकृती फार बिघडली असताना आमच्या खिडकीच्या काचेवर श्री-स्वामीची मूर्ती दिसू लागली. मी त्यांना नमस्कार केला, तेव्हा त्यानी माझ्या तोडावरून हात फिरविला. ते नाहीसे झाले. मी स्वामी कुठे दिसताहेत का म्हणून तीनतीनदा पहात होते. तेवढ्यात हे खोलीत आले, म्हणाले, 'विजू, प्रसाद घेतेस ना ?' मी घडलेली सारी हकीगत त्याना सांगितली. मी ओक्साबोक्सी रडू लागले. मला दरदरून घाम आला होता. नंतर दोन दिवसांनी डॉक्टरांनी माझी प्रकृती तपासली. ते म्हणाले, ' तुम्हाला जोरदार अॅटॅक आला होता. पण त्या मानाने लौकर बऱ्या झाल्यात. नंतर ससूनमध्ये जाऊन प्रकृती तपासून घेतली तर ' सर्व काही ठीक ' असा रिपोर्ट आला.

स्वामीच्या आठवणी ह्या सारख्या वाढणाऱ्याच आहेत. फार वर्षांपासून असे वाटे की एकदा स्वामी सत्यदेवानंदानी आपल्याकडे जेवावयास यावे. कारण स्वामींच्या जागी तेच आहेत आपल्याला आणि सांगायची गंमत म्हणजे एकदा स्वामी सत्यदेवानंद आपणहून मला म्हणाले, " उद्या मी तुझ्याकडे भोजनाला येणार आहे. " इतका आनंद झाला, इतका आनंद झाला की सांगता येणार नाही. ही इच्छा सुद्धा माझी आप्पांनी पुरी केली. स्वामी सत्यदेवानदांनी मी केलेला स्वयंपाक अगदी गोड मानून घेतला. त्या दिवशी घरात अगदी पवित्र मगलमय वातावरण निर्माण झाले होते. त्या शुद्धते-मुळे स्वामीचे वास्तव्य आपल्याजवळ आहे असे पदोपदी जाणवत होते.

**असा हा माझा स्वामीराजा**
**देई मज दर्शन वारंवार**
**करूनी मजवरी कृपा**
**करी शक्ति प्रदान ।।**

● ● ●

# मी आणि रमण महर्षी एकच

– डॉ गं. वि. कुलकर्णी, कोल्हापूर

**स्वामींनी मला जे मार्गदर्शन केले ते रमणमहर्षींच्या 'मी कोण ?' या शोधाच्या उपदेशाला धरूनच.**

ईश्वरीकृपेने पांवसला परमपूज्य स्वामीच्या भेटीला व दर्शनाला जाण्याचा योग अनेकदा आला अनेकदा त्याचे शुभ आशीर्वाद व प्रेम लाभले. कधी आम्ही घरची काही मडळी मिळून जात असू, तर कधी मी एकटा जाई. कधी सौभाग्यवती आपल्या मैत्रिणीबरोबर जाई. स्वामीच्या सहवासात आणि तिथल्या परिसरात आम्हाला श्रीरमणाश्रमातल्या शातीचा व पावित्र्याचा अनुभव येई; मन खूप रमे; अतर्मुख होई. उत्साहान ओसडून वाहू लागे. स्वामीनी मला जे मार्गदर्शन केले ते रमण महर्षीच्या "मी कोण ?" या शोधाच्या उपदेशाला धरून. आपल्या 'तीन प्रवचना' तला जो उतारा मला वाचायला दिला, त्यात तोच विचार होता. त्यामुळे माझ्या स्वभावाला पोषक व पूरक असच ते मार्गदर्शन होत. सौभाग्यवतीला नामस्मरणाची ओढ व सवय होती. ती रामनाम घेत असे. एकदा आम्ही मिळून स्वामीच्याकडे गेलो. तिने विचारले, "देवाच कोणत नाव घ्यावे ?" त्यावर स्वामीनी "सोऽहम्" वगैरे न सागता "आपल्याला आवडेल ते कुठलेही नाव घ्यावे". असे सागितले. त्यामुळे तिचेही समाधान झाले व साधन जोरात सुरू झाले. त्यानतर एकदा ती सौ. यमुताई कुलकर्णी याच्या बरोबर दर्शनास गेली असता तिला स्वामीचा अनुग्रह घ्यावा असे फार वाटू लागले पण सौ. यमूताईनी सल्ला दिला की, "घरची (म्हणजे माझी) परवानगी असेल तरच अनुग्रह घ्या." परत आल्यावर मला हे समजले. मी स्वामीना पत्र लिहून आमची भूमिका व सौ. ची इच्छा कळविली. मला महर्षींचा अनुग्रह स्वप्नात झाला आहे. असेही कळवले लगेच शुक्रवारी (हा आमच्या सामुदायिक साधनेचा दिवस आहे). सकाळी स्वामीकडून पत्रद्वारा अनुग्रह मिळाला व तिची सोऽह साधना सुरू झाली. गुरुवारी रात्रभर मला स्वामीच जागेपणाइतके स्पष्ट दर्शन होत राहिलं. त्यानी मला जणू दाखवून दिल की, "मी आणि रमणमहर्षी एकच आहो." हे अद्वैत

"भगवान् रमणो योऽभूत् स्वरूपानन्द एव सः"....

या छोटचा स्तोत्रात मी व्यक्त केलं किवा स्वामीनी व्यक्त करायला लावल "दी सद्‌गुरु इज वन" या महर्षीच्या वचनाची प्रचीती येत राहिली. ती अजूनही अखंड आहे व पुढेही त्याच्या कृपेने राहील. पूज्य स्वामीना सहस्रशः प्रणाम.

• • •

# स्वामी स्वरूपानंद म्हणजे ओॲसिस

—श्री. प्रमोद रामचंद्र कुलकर्णी, पुणे

**"ओॲसिस म्हणजे वाळवंटातील हिरवळ. जिथे तृषार्त प्रवाशांना पाणी प्यायला मिळते आणि विश्रांती मिळते. संसारात थकल्या भागल्या जीवांना विश्रांती मिळण्याचे स्थान आणि आध्यात्मिक तहान भागण्याचे स्थान म्हणजे पांवसचे श्रीस्वामी स्वरूपानंद.**

माझ्या अनुग्रहाच्या वेळची गोष्ट स्वामीजी माझ्याकडे वळले होते. मी त्याना निर्विकारपणे आणि कौतुकाने पहात होतो सहस्र सूर्याचे तेज आणि कोटी चंद्रांची शीतलता त्याच्या मुखावर होती. ते किंचित् हंसले आणि म्हणाले, "तुम्हाला ताठ बसता येईल अशा कोणत्याही आसनावर बसा" मी पटकन् पाय दुमडून घेतले. पद्मासनावर ताठ बसलो. त्यानी हातात हिरवट झाक असलेला कागद घेतला व म्हणाले, "हा मंत्रोपदेशाचा कागद आहे. तुम्हाला संस्कृत वाचता येते ?" मी 'हो' म्हणताच त्यानी तो कागद माझ्या हातात दिला. म्हणाले, 'वाचा' मी ब्रह्मानंद.....पासून ....हसो नाम सदाशिव' पर्यंत वाचले त्यानी तो कागद परत हातात घेतला व म्हणाले, 'तुम्ही वाचलेत ती गुरुपरंपरा आणि खाली लिहिलाय तो गुरुमंत्र. हा मंत्र परंपरेने गुरुने शिष्याला सांगावयाचा असतो. नंतर सावकाश समजावत राहिले. "मी आता उच्चारीन त्याप्रमाणे माझ्या मागोमाग तुम्हीही म्हणायचे." मी मान हलविली. नंतर एखादे शिक्षक मुलाना शिकवताना हात खालीवर करून शिकवतात तसे त्यानी मला सांगितले माझ्याकडून तीनदा म्हणवून घेतले. म्हणाले, "रोज तीन वेळा याचा जप करावा." नंतर ज्ञानेश्वरी नित्यपाठाची एक प्रत स्वाक्षरी, तारीख व वरती प्रसादभेट असे लिहून माझ्याकडे दिली. नंतर त्यानी सोऽहम् ध्यानही मला समजावून दिले. पहिल्यादा मला जमले नाही पण म्हणाले, "हळूहळू जमेल."

बरेच दिवस पांवसेत राहिल्यानंतर खोलीत प्रवेश मिळवून आप्पाची सेवा करण्याची तीव्र इच्छा मनात निर्माण झाली. एकदा धैर्याने तसे सांगितले, तेव्हा म्हणाले– 'दुपारी बोलवीन.' दुपारी आपल्या खोलीत बोलावणार आहेत म्हणून मी ओटीवरच बसून राहिलो. दीड वाजता मला बोलावणे आले. मला म्हणाले, 'बसा.

तुम्हाला काय काम द्यावे? सध्या उन्हाळा आहे. तेव्हा तुम्हाला वारा घालायचे काम द्यावे. " तो पंखा मी कधीच विसरणार नाही. त्याला ताबूस गुलाबी रंगाच्या सिल्कच्या कपड्याचे आवरण होते. आणि त्यावर जाळी होती जरीची. पंखा हातात घेतला. हात लांब करून त्याना वारा घालू लागलो. क्षणभर ते गप्प राहिले. नंतर म्हणाले, ' असा नाही. ' मी पखा थांबवला. म्हणाले, ' तुम्हाला वारा घ्या म्हणजे मला पोचेल! ' मला विचित्र वाटले. वाटले हे काय! ह्यांची सेवा करायची म्हणून आलो आणि हे म्हणताहेत तुम्हीच वारा घ्या. माझ्या चेहऱ्यावरची हालचाल त्यानी पाहिली असावी. माझ्याकडे वळून म्हणाले, ' वारा तुम्हालाच घेतला की खोलीतील गरम हवा हलेल म्हणून म्हटले. तुम्हालाच वारा घ्या. ' त्याचा विचार मला पटला. स्वत:लाच मजेत वारा घेत राहिलो.

माझे आपले खोलीत गेले की वारा घालण्याचे काम सुरू व्हायचे. एकदा असा गेलो असताना म्हणाले, ' तुमच्यासाठी मी एक काम शोधून ठेवलंय्. पायाशी असलेल्या कपाटात पुस्तके आहेत. ती सर्व काढून घ्यायची. त्यांतील वाळवी लागलेली पुस्तके बाजूला काढायची आणि चांगली पुस्तके बाजूला काढायची. चागल्या पुस्तकांचे सारख्या उंचीचे गठ्ठे करायचे. प्रत्येक गठ्ठ्यात साधारण ५–६ पुस्तके बाधा. ' थोडा वेळ थांबले. " समोरच्या न्हाणीजवळच्या कपाटात खालच्या कप्प्यात सुतळी आहे. ब्राऊन पेपर आहे. तो घ्या. कात्री, पेन आणि कागद येथे माझ्या हाताजवळच्या कप्प्यात आहेत. ते घ्या. " ते ऐकून मी उठताच म्हणाले, " थांबा. आत्ताच नाही. थोड्या वेळाने. थोडा वेळ तसाच गेला. मला म्हणाले, ' मोहनला हाक मारा. ' मी दारात जाऊन पाहिले. मोहन दिसला नाही. पुढे जाऊन हाक मारली. ' मोहन. ' तोपर्यंत आतून टकटक ऐकू आली. आत आलो. आप्पा म्हणाले, " खोलीत कोणी तरी असल्याशिवाय बाहेर जायचे नाही. प्रकाशला हाक मारा दारातून." तोवर मोहनच आला. या प्रसंगातून एक नवीन सकेत समजला की खोलीत कोणी असल्याशिवाय बाहेर पडावयाचे नाही. मोहनने पाणी आणले. दार बंद व्हायची वेळ आली. आप्पानी खडीसाखरेचा डबा मागून घेतला. मी त्याच्या हाताशी डबा धरला. एक खडा निवडून माझ्या हाताशी ठेवला. झाकण लावून मी डबा ठेवून दिला. परत टक्टक्. म्हणाले, ' फुलपात्रातील पाणी घ्या. मी फुलपात्र हाताशी नेले. त्यात साखरेची बोटे बुडविली आणि पंचाने हात पुसला. म्हणाले, ' आता जायला हरकत नाही. '

खोलीतील प्रत्येक वस्तू जागच्या जागी ठेवायचा आप्पांचा कटाक्ष होता. पुस्तकाचे गठ्ठे बाधून मी जागच्या जागी ठेवून दिले. त्याच्या ह्या नीटनेटकेपणा-बद्दलची एक गोष्ट माझ्या चांगली लक्षात आहे. एकदा त्यांना ' संजीवनी गाथे 'ची एक प्रत कोणाला तरी भेट देण्यासाठी हवी होती. आणि ती व्यक्ती दर्शनाला आत डोकावण्याच्या अगोदर ती कॉटवर त्यांच्या हाताशी असायला हवी होती. कोणाला काय द्यायचे हे त्यांचे अगोदरच ठरलेले असायचे. एकाच कुटुंबातल्या तीन वेगवेगळ्या

व्यक्तींना काय द्यायचे हे त्यांचे ठरलेलेच असायचे. त्या वस्तू लगेच त्यांच्या हाताशी असायच्या. खोलीत मी एकटाच होतो. त्यांनी सांगितले, न्हाणीजवळच्या कपाटांत ' संजीवनी गाथे 'च्या प्रती आहेत, त्यातील एक आणा. मी तिकडे निघालो. कॉटजवळ टकटक झाली. आप्पांनी परत बोलावले होते. ते म्हणाले, ' संजीवनी गाथा ' समोरच्या कपाटात दोन नबरच्या खणातील उजव्या बाजूच्या अंकणात मागल्या बाजूला, डाव्या कोपऱ्यातील पुस्तकाच्या तळाच्या गठ्ठ्यात आहे. किती अचूक माहिती ही! मी डोळे झाकून गेलो असतो तरी पुस्तक मिळाले असते. असे बरेचदा घडायचे.

खोलीत असलो की आनदच आनंद असायचा. खोलीत सद्गुरुसान्निध्यात ब्रह्मानंद लुटण्याची काही माझी पात्रता नव्हे. पण खोलीतल्या इतर गोष्टी हव्याहव्याशा वाटायच्या. खोलीत दरवळणारा मंद मंद सुगंध, डोळ्यांना सुखद असा प्रकाश, समोर निवडक पण आदर्शवत् असणाऱ्या संताच्या प्रतिमा, शिवाय डोळ्याला सुख देणारी सुखदायी, कर्पूरगौर, शात रसाचा सगुण आविष्कार अशी सद्गुरु मूर्ती! त्यामुळे खोलीत राहायला जीव आसुसलेला असे. अशा सुदर पार्श्वभूमीवर बऱ्याच वेळा 'गोड' कामगिरीही येऊन पडे. आप्पा सागायचे, " आज तुमच्याकडे एक काम आहे. तुम्ही, पंडित, प्रकाश केळकर वगैरे सर्वांनी मिळून हे बाकावरचे डबे मोकळे करायचे आहेत. " आणि सांगायची ग मत म्हणजे त्या डब्यात पेढे, बर्फी, रव्याच्या वड्या, बत्तासे अशा प्रकारचे जिन्नस असायचे. हे काम हातावेगळे करायला आम्हाला दहावीस मिनिटांचा अवधी पुरा व्हायचा.

एकदा मी आप्पांना म्हणालो, ' मला उच्छिष्ट द्या. ' तेव्हा ते म्हणाले, " गुरूचे उच्छिष्ट घेण्याची पूर्वापार प्रथा आहे. पण उच्छिष्ट म्हणजे उष्टवलेले अन्न नव्हे. तर त्याच्या मुखातून बाहेर पडणारे उपदेशाचे शब्द होत. म्हणून त्याच्या उपदेशाचे पालन करणे म्हणजेच उच्छिष्ट घेणे. " त्यांच्या ह्या उच्छिष्टेने माझे काही समाधान झाले नाही. माझ्या चेहऱ्यावरचे असमाधानही त्याना दिसले असावे. तशातच त्यांचे जेवलेले ताट उचलून ठेवताना कुणाचे आपल्याकडे लक्ष नाही हे पाहून ताटात राहिलेला प्रसाद मी खाल्ला होता. त्या नतर दुसऱ्याच दिवशीची गोष्ट! सकाळी साडेसात वाजता मी ओटीवर असताना मला विजयरावांनी बोलावले आणि चादीच्या पेल्यातल्या मनुका खायला दिल्या. नतर खोलीत गेल्यावर आप्पा म्हणाले, ' उच्छिष्ट मिळाले ना? ' मी चमकून विचारले, 'कसले?' ते म्हणाले, " मनुका आणि खडीसाखरेच्या पेल्यातले पाणी मी प्यालो आणि तुम्हाला मनुका ठेवल्या होत्या. त्या तुम्ही घेतल्या ना?" मी त्यांच्याकडे थक्क होऊन पहातच राहिलो. त्या गोड उच्छिष्टाची चव अजून माझ्या जिभेवर रेगाळत आहे. त्यानंतर बऱ्याच वेळा असे हे उच्छिष्ट मिळाले.

खोलीत असताना दुपारच्या वेळी काही ना काही वाचून घ्यायचा त्यांचा परिपाठ होता. कधी नवीन आलेले एखादे मासिक किंवा परमार्थावरचे पुस्तक तर कधी संग्रही

असलेले छानसे पुस्तक. प्रत्येक स्वामी शिष्याला असा अनुभव आहे की आप्पांनी एखादे पान उघडून वाचायला सागितले की त्याच्या मनातील प्रश्नाचे उत्तर मिळे. एकदा वाचण्यासाठी आत्मप्रभेतील ६२ पान निघाले. वाचू लागलो. ' माझ्यावर विश्वास नसेल तर नको ठेवू पण ' सोऽहम् ' वर पूर्ण श्रद्धा ठेवशील तर तू खचित मुक्त होशील." नतर एकदा त्यासबधी विचार करता मनात आले की कदाचित् मी सगुणाबद्दल नास्तिक आहे त्यामुळेच आप्पानी या ओळी वाचून घेतल्या असतील

एकदा ' कोणतेही पान उघडा ' म्हणून म्हणताच मी उघडले. वर शीर्षक होते, ' एकनाथाची गुरुभक्ति '. परिच्छेद बरेच मोठे होते. त्यात जनार्दनस्वामी आणि एकनाथ महाराज याच्याबद्दल माहिती होती. अजून एकनाथानी स्वत.च्या गुरूबद्दल कोणत्या भावना व्यक्त केलेल्या आहेत हा भाग यावयाचा होता. तो भाग आला आणि आप्पा म्हणाले, ' बस्स. आता मला भाड घ्यायच आहे. तुम्ही पुढला भाग ओटीवर बसून वाचा. " मी ओटीवर बसून पुढचा भाग वाचायला सुरूवात केली. एकनाथ महाराजानी गुरुदेवाचे केलेले वर्णन मला अतिशय परिचित वाटू लागले. ' प्रसन्न व्यक्तिमत्व, आनदी स्वभाव, कृपाघन-करुणाघन नेत्र, सतत हसत असणारी मुद्रा, अर्धोन्मीलित नेत्र आणि नतर बरेचसे.... ' ब्रह्मानद परमसुखदम्..... ' या सदरातले वाचता वाचताच विचार मनात आला अप्पाचा केवढा हा विनय! स्वत:चे गुणवर्णन शिष्याच्या तोंडून स्वत: ऐकू नये म्हणून कशी युक्ती योजून त्यानी मला बाहेर पाठविले होते.

रत्नागिरीच्या गोगटे कॉलेजच्या पत्रिकेत एक लेख आला होता " स्वामी स्वरूपानद ॲन ओॲसिस...... " मी वाचायला सुरूवात केली त्यानी मला शेवटचा परिच्छेद वाचायला सागितला. त्या लेखात आप्पाच्या पारमार्थिक अधिकाराबद्दल माहिती दिली होती. तो परिच्छेद वाचून सपल्यावर त्यानी मला जवळ बोलावले, म्हणाले, ' ओॲसिस म्हणजे वाळवटातील हिरवळ. जेथे तृषार्त प्रवाशाना पाणी प्यायला मिळते आणि विश्राती मिळते ..... या लेखकाने अशी कल्पना केली आहे की, " ससारात थकल्या भागल्या जीवाना विश्राती मिळण्याचे स्थान आणि आध्यात्मिक तहान भागण्याचे स्थान म्हणजे पावसचे स्वामी स्वरूपानद ! " एवढे सागून ते नेहमीच्या सोऽहम् ध्यानात विलीन होऊन गेले मीही त्याच्याकडे सस्मित नजरेने पाहात राहिलो.

नम्रता आणि विनय तर त्याच्या रोमारोमात भिनलेला. एकदा ' या निशा सर्व भूतानाम्..... ' समजावून देताना म्हणाले, " लोक जागे असतात म्हणतात म्हणजे त्याचे प्रापचिक व्यवहार चालू असतात. अशा वेळी सत लोक जे ऐहिक गोष्टीबद्दल उदासीन असतात ते जागृत नसतात.....उलट जेव्हा सत मडळी जागृत असतात म्हणजे ईशचितनात रगून गेलेली असतात तेव्हा इतरेजन उदासीन असतात म्हणजे झोपलेले असतात." थोडा वेळ शात राहिले. नंतर परत म्हणाले, " कबीर, तुळशीदास ही मंडळी रात्रदिन जागी असायची." मग खट्याळपणे हसत म्हणाले, " पण हे रात्रभर

जागणं फक्त रामकृष्ण परमहंसानाच शक्य! आम्हाला तुम्हाला ते शक्य नाही." या आम्हाला तुम्हाला मध्ये त्यानी स्वत:ला गोवले होते. आणि शेवटी "ॐराम – राम तो मी" "ॐकृष्ण – कृष्ण तो मी", "ॐरामकृष्ण – रामकृष्ण परमहस तो मी." अशी ग्वाही स्वत:च दिली होती. परतु तेव्हा मात्र स्वत:विषयी असे विनयाचे उद्‌गार काढून त्यानी आम्हाला लाजविले होते.

आप्पांच्या आठवणी ह्या अशा न सपणाऱ्या सतत वाहात राहणाऱ्या आहेत. दर्शनार्थी कोणी गरीब बाई असेल तर तिची बोळवण करताना साडीचोळीसाठी पैसे द्यायचे. लहान मुलाच्या हातात खाऊसाठी पैसे ठेवायचे विद्यार्थ्यांना शिक्षणखर्चासाठी मनीऑर्डर्स करणे हा तर त्याचा नित्यक्रम होता विद्यार्थ्यांची 'श्री'ची गरज आप्पा काही अशाने भरून काढीत वय झालेले व ज्याना साभाळणारे कुणी नाही अशा वृद्धांना ते नियमित मदत करीत. पावसमधल्या काही भिक्षेकऱ्याना आठवड्यातील काही ठराविक वारी पैसे मिळत

नियमाचे पालन काटेकोरपणे व्हावे त्याचा कटाक्ष. घड्याळाकडे त्याचे नेहमी लक्ष असे. बऱ्याच वेळा बॅटरीच्या उजेडात ते भितीवरच्या घड्याळाकडे पहात. एकदा एका सेवकाला यायला पाच दहा मिनिटे उशीर झाला. मी त्याच्या ऐवजी थांबतो असे म्हणताच "तुम्ही म्हणालात, तसे नको, आज तुम्ही आहात थांबाल. पण उद्या तुम्ही गेल्यावर त्याची ड्यूटी कोण करील? अशी चुकवाचुकवीची संवय लागायला नको. तुम्ही त्याला हाक मारा" तो सेवेकरी हजर झाल्यावर त्याना 'ठीक' वाटले.

अशा एक ना दोन अनेक आठवणी अंत:करणात जपून ठेवल्या आहेत

० ० ० ०

स्वामीच्या आठवणीत माझा अनुग्रहाचा दिवस मला अजून आठवतो गुरुवार उगवला. नेहमीप्रमाणे आघोळ केली. ९ वाजता स्वामीचे दर्शन झाले. त्यावेळी त्यानी परत आठवण दिली. "साडेअकरा वाजता इथेच माडवात किवा ओटीवरच बसा." मी 'हो' म्हटले. येणाऱ्या जाणाऱ्याची ऊठबस करीत एक कोठले तरी पुस्तक वाचत बसलो. दहा वाजत आले. इतक्यात आतून सुहास, राजू टिळक (जयतराव देसायाचे मेहुणे) आणि शैला माडवात येऊन पत्ते खेळत बसले. त्यानी मलाही बोलावले भिडू कमी पडतो म्हणून सुट्टीतला नेहमीचा उद्योग अशा भावनेने खेळत बसलो साडेअकरा वाजले. स्वामीचे नित्यक्रम आटोपले होते आघोळ झाली होती. ते शुचिर्भूत होऊन बसले होते आणि त्याचा हा शिष्योत्तम सर्व काही विसरून तन्मयतेने पत्ते खेळत होता. आतून मोहनने हाक मारली, "अहो कुलकर्णी"! मी पत्ते टाकले व पळतच खोलीचे दार गाठले.

यानंतरची आठवण आहे मी खोलीत रुळलो होतो तेव्हाची. अजून पूर्ण वेळ खोलीत वावरायला मिळत नव्हते. तेव्हाची घटना आहे. स्वामीचे ताट घेऊन सौ.

शुभांगी वहिनी आल्या. पाठोपाठ तुपाची तवली घेऊन आतेही आल्या. तरीही मी आज खोलीतच होतो. माझ्या व्यतिरिक्त प्रकाशही होता. जेवणाचे ताट आलेले असताना म्हणजेच आप्पांचे जेवण चालू असताना खोलीत हजर राहाण्याचा पहिलाच प्रसंग. चुपचाप वारा घालीत होतो. उगीचच कोणी 'इथे काय काम आहे ?' म्हणायला नको म्हणून! थोडा वेळ जातो न जातो तोच घोळ झालाच. श्री. तात्या पाथरे हाका मारीत आले, "अरे प्रमोद, जेवायचे नाही काय? जेवायला वाढलय्. चल पाहू आधी." आप्पांची बारीक नजर माझ्यावर होतीच. यामुळे पटकन् थाप ठोकून दिली. 'मला जेवायचे नाही. भूक वाटत नाही आज' या 'वाटण्या'वर कोणाचे अपील चालत नाही. त्यामुळे थाप पचली. खरे म्हणजे आप्पाचे जेवण झाले की आरामात जाऊन जेवणार होतो. पण तात्पुरती थाप मारली. तात्या जेवायला निघून गेले. मी माझे काम चालू ठेवले.

थोड्याच वेळात आप्पाचे जेवण संपले. त्यानी हात वगैरे धुतले. मी त्यांचे ताट आत ठेवून परत खोलीत आलो. आप्पा वामकुक्षीवर लवंडले होते. मी येताच एक दोन मिनिटांनी टकटक झाली. जवळ गेलो. ते म्हणाले, "कोपऱ्यात पंख्याजवळ टोपली आहे. त्यातील दोन केळी व एक मोसंबे आणि बाकावरील डब्यातील दोन वड्या घ्या."

मुकाट्याने वळलो आणि आनंदाने सकाळपासून झालेला उपवास सोडला. आप्पाचे हे बारीक लक्ष पाहून इतका सुखावलो होतो की काही केल्या तोडावरचे हास्य जाईना. नंतर दुसऱ्या दिवसाची गोष्ट. खोलीत जेवणाचे ताट आले. आते तूप वाढून गेल्या. क्षणाचाही विलंब न लावता आप्पा म्हणाले, 'आज फारसा उकाडा नाही. आता वारा घालणं बस्स....तुम्ही आता जेवून या.' काहीही बोलायला संधी नव्हती. डब्यातली खडीसाखर घेतली. नमस्कार केला. आश्रमाकडे पळालो. एक ताट वाढलेले रिकामेच होते. पानावर बसलो. पानात वाढलेला प्रसाद पटकन घशाखाली सोडला. पळत जाऊन हात धुतले. हात पुसत पुसत परत वेगाने खोली गाठली. आप्पाचे जेवण संपत आले होते. अजून संपले नव्हते. खोलीचे दार उघडेच होते. आत शिरलो.

आप्पा नुसते पाहातच राहिले. पंखा घेऊन वारा घालू लागलो. त्यांनी एक घास घेतला. बोटे चाटली. मग म्हणाले, 'झाले जेवण ?' किंचित् कालच पण मनसोक्त हसले. मी फक्त लाजून मान डोलावली.

त्यांनी जेवण संपविले. म्हणाले, 'ताट उचलून त्या टेबलावर ठेवा.' मी स्टुलावरून ताट उचलून टेबलावर ठेवले. 'आता पायालगतचे तस्त घ्या.' मी तस्त स्टुलावर ठेवले. 'ती टूथपेस्ट इकडे आणा.' मी पेस्ट ट्यूब दिली. त्यांनी पेस्टने दात घासले. हातानेच तस्त वर उचलण्याची खूण केली. मी तस्त किंचित् वर उचलले. आप्पांनी चूळ टाकली. स्वच्छ तोड केले आणि तस्त परत ठेवून द्यायला सांगितले. नंतर ते परत

पोटावरून हात फिरवीत श्लोक म्हणायला लागले. तो श्लोक म्हणताना मी त्यांना बऱ्याच वेळा पाहिले आहे. तो श्लोक असा–

आतापी भक्षितो येन वातापी च महाबलः ।
अगस्त्यस्य प्रसादेन भोजन मम जीर्यताम्

जेवण संपले. आता ते वामकुक्षी करू लागले. मी ताट आत नेले.

ताटामध्ये वाढलेल्या भातापैकी जवळ जवळ निम्मा भात तसाच शिल्लक होता. आमसोलाचे सार संपले होते. लोणच्याची फक्त फोड चाटलेली होती. पडवळाची भाजी चावून फक्त रस शोषून घेतला होता. चोथा तसाच शिल्लक होता. भात लहान वाटीभर. म्हणजे लहान मूद. तो देखील अर्धाच खायचा. त्यावर तूप–म्हणजे तुपाएवढा भात काय तो आप्पा खायचे. त्या बरोबर दुधात बुडवलेले पोळीचे चॉकलेटएवढे चारपाच तुकडे, वाटीभर सार, वाटीभर पडवळाच्या उकडलेल्या तुकड्यांचा रस आणि तोंडी लावणे म्हणून लिबाच्या लोणच्याच्या फोडीचे फक्त चाटण. बस्स! एवढेच जेवण. हे कौतुक फक्त लौकिकार्थातच असावे. एरवी प्रत्यक्ष परब्रह्माने जेवायचे आणि आपण पहायचे. सारेच आगळे काम.

आप्पाचे जेवण थोडेसेच होते. पण घास अगदी चपलतेने तोडात घालायचे. अगदी चवीने खायचे. नेहमीचेच अन्न पण पचपक्वान्नाच्या चवीने खायचे. आपण जसा आपल्या आवडीचा पदार्थ जसा चाटून पुसून खातो ना तसे प्रत्येक घास बोट चाटून पुसून खायचे दोन घासाच्यामध्ये हळूवार आवाजात प्रकाश अथवा इतर कोणी असतील त्याच्याशी बोलायचे हास्यविनोद करायचे अशा प्रकारे खूप चवीने, आनदाने आणि प्रसन्न चित्ताने हे भोजन सपायचे हे आगळे कौतुक ज्यानी अनुभवले ते किती भाग्यवान. हे ज्यानी अनुभवले त्यानाच कळेल. एरवी, त्यावेळी लुटलेला आनद शब्दाकित करणे केवळ अशक्य.

या जेवणाच्या सदर्भात फोडणीच्या भाताची एक मजेशीर आठवण मला आठवते. सकाळी ७ वाजता चहा झाला की १२।। पर्यत काहीच मिळत नसे हे सर्व इतर लोकांचे झाले पण आम्ही जी 'आतल्या गोटातली' मंडळी होतो त्याना ९।।–१० ला चहा आणि काही तरी खायला मिळत असे. काही तरी म्हणजे बहुतेक वेळी रात्री उरलेल्या भाताचा केलेला फोडणीचा भात मलाही ही सोय उपलब्ध होती. शरद पंडित, बंडू, सुधीर पाडे, देवेन पाडे, सजय लाड, अविनाश खातू आणि मी. हे सर्वजण यावेळी आश्रमात हजर राहात असू

नेहमीप्रमाणे ८।।-९ च्या सुमारास मी खोलीत गेलो. पंडितची ड्यूटी संपत आली होती. तो गेला. खोलीत मी आणि मोहन होतो. थोड्या वेळात मोहन देखील बाहेर जाऊन बसला. राहिलो मी एकटाच. सुधीर आत आला. थोडा वेळ गेला. शरद

पंडित आला आणि त्याने सुधीरला फोडणीचा भात खायला बोलावले. सुधीर प्रसाद घेऊन आश्रमाकडे गेला. परत मी एकटाच राहिलो. शांत निजले होते. त्यांनी मला जवळ बोलावले आणि हळूच विचारले, " मोठ्या लोकांना फोडणीचा भात नसतो वाटतं ? " मला हसू फुटले. रेशमी चिमटा काढता काढता त्यांनी मला दिलेल्या मोठे-पणाने मी सुखावलो होतो.

कधी कधी अध्यात्मातील एखादी गोष्ट रूपकातून आप्पा सांगत. " ज्ञानी माणसाची अवस्था कशी असते हे सागण्यासाठी आमची आई आम्हाला एक गोष्ट सांगायची. आमच्या कोकणात विहिरीवर पाणी लाटण्यासाठी मडक्याची माळ असते. त्याचे रूपक आई सांगायची म्हणायची – ' ज्ञानी माणसाची ससारातील अवस्था माळेमध्ये उलट्या बाधलेल्या मडक्यासारखी असते म्हणजे कशी ? तर–हे उलटे बाधलेले मडके पाण्यात असेपर्यंत पाण्यात बुड्न राहाते पण त्यात पाणी जात नाही. इतर मडकी मात्र पाण्याचे भरून राहातात. आणि पाण्याबाहेर आली तरी भरूनच राहातात. पण उलट बाधलेले मडके मात्र पाण्याबाहेर येताच कोरडे राहाते. कारण त्याला पाणी चिकटत नाही. त्याच प्रमाणे ससारात राहणारा ज्ञानी मनुष्य देखील सर्व व्यवहार ससारात असेपर्यंत करीतच असतो. पण त्याला ते अजिबात चिकटत नाहीत. तो व्यवहारातून बाहेर आला की परत कोरडा होतो. उलट अज्ञानी मनुष्य मात्र ससारात गुरफटून जातो आणि आणि दु खाने भरलेला राहतो " अशी छोटी रूपके देऊन तर कधी पारंपारिक पदामधील एखादा चरण घेऊन ते विवरण करीत.एकदा अशाच एका चरणाचे विवरण करीत त्यानी त्याचा भावार्थ सागितला. त्यात त्यानी म्हटले होते, " गुरूने माझा हात धरून मला उलट्या मार्गाला लावले ! " त्यातला गूढार्थ स्पष्ट करताना ते 'म्हणाले होते! 'उलट मार्ग म्हणजे जग ज्या मार्गाने चालले आहे त्याच्या विरुद्ध दिशेने चालणे. जगाचा प्रवाह हा उगमाकडून अंताकडे आहे. म्हणजेच 'मूळ' स्वरूपाकडून 'जड' स्वरूपाकडे आहे. त्यामुळे संसारातील प्रत्येक जीव हा स्वतःचे मूळ स्वरूप विसरून 'देह मी ' या भ्रमातच वावरत असतो. पण सद्गुरु भेटल्यावर ते आपल्या शिष्याला उलट मार्गाला लावतात. म्हणजे काय ? तर ' देह मी ' असे समजणाऱ्या आपल्या शिष्याला 'सोऽहम्' म्हणजे मी असा बोध करतात." एवढा बोध करून झाल्यावर ते गोड हसले. त्यांच्या डोळ्यातले मिष्किल भाव पाहिल्यानंतर मला वाटले जणू ते मला विचारत होते, " काय कुलकर्णी अप्पा, काही समजले का ? "



# तव स्मरण संतत स्फुरणदायि आम्हां घडो !

– द. आ. जायदे, पुणे

सकाळचे दर्शनाचे वेळी काही मडळी श्री. देसाई याच्या बागेतील फुले-तुळशी घेत. ती पानावर ठेवून खोलीत दर्शनाला गेल्या वेळी श्रीस्वामीचे पुढे ठेवीत. मी यापूर्वी तसे केले नव्हते. मनात विचार येई. बाग श्री. देसाई याची, आपली थोडीच आहे ! किवा फुले विकत कुठे आणली ! ती आपली नव्हेत असा विचार मनात येत होता. दुसरे दिवशी मला फुले आणण्याची इच्छा सर्वांप्रमाणेच झाली आणि ती बागेतून घ्यावी म्हणून ओटीवरून उठलो तोच आतून श्रीस्वामीचा निरोप आला, " जायदे, जाऊ नका, तुम्हाला खोलीत लगेच बोलावणार आहेत. "

वरील वाक्याकडे मी दुर्लक्ष करून पुटपुटलो, " मी जात नाही, फुले आणतो. " असे म्हणून माझे एक पाऊल दारात पडले तोच " जायदे चला. " खोलीतून आवाज. मी काय ते समजलो. माझ्या मनी श्री. देसाई याची बाग होती. त्यातील फुले श्रीस्वामीना अर्पावयाची इच्छा नव्हती. हे श्रीस्वामीनी मनोमान जाणले व ती गोष्ट मला मना-विरुद्ध करू दिली नाही.

सकाळी आठ वाजता आपले सर्व कार्यक्रम आटोपून पूजास्थानाला येऊन बसावे. मनसोक्त फुले काढावी. हार करावे, पूजा करावी. आरती करावी. व पहिले श्रीस्वामी दर्शन झाले की येतील त्या मडळीना प्रसाद वाटावा हे काम मी करीत असे. माझेकडील पूजास्थानाची ड्यूटी १२-१५ वाजता आवरायची. तेथील पेढे, केळी वगैरे फळे श्रीस्वामीच्या खोलीत ठेवायची व १२-३० वाजता सर्वांसमवेत आश्रमात प्रसादाला जायचं असा नित्य कार्यक्रम– पण एक दिवस त्या कार्यक्रमात बराच व्यत्यय आला. मी नेहमीप्रमाणे फळफळावळ गोळा करून टोपली भरली व श्रीस्वामीच्या खोलीचे दार उघडले. आत पाऊल टाकणार इतक्यात आतील सेवेकऱ्याने " जायदे आत येऊ नका, ते काही चालायच नाही, " असे म्हणून माझ्या हातून कांडी हिसकावून घेतली. मी भयंकर तापलो. त्याच्या वागण्याने मला धक्काच बसला. मन नाराज झाले. तणतण करीत आश्रमाकडे निघालो. जाताजाता तेथे जे कोणी होते त्यांना सागितले,

उद्यापासून पूजास्थान बंद. मी येथे येणारच नाही. काय वाटेल ते करा. ही वेळ १२।१५ ची श्रीस्वामीची विश्रांतीची होती. १२-३० वाजता ते जेवायला उठत असत. मी आश्रमात आलो. भोजन पगत झाली. १-३० वाजला. मी अद्याप तापलोच होतो. तेथील नेहमीच्या मडळीना निवेदन सागत होतो. व उद्यापासून " पूजास्थान बंद " हा मनाचा पक्का विचार व्यक्त करीत होतो. इतक्यात रा. मोहन गोडबोले याचेकडून श्रीस्वामीचा निरोप आला. " तुम्हाला खोलीत यायला हरकत नाही पण प्रत्येक वेळी नमस्कार करायचा नाही एवढे लक्षात ठेवा. " हा निरोप ऐकून माझं सळसळणार रक्त एकदम थंड झाल. श्रीस्वामीच्या कानावर हे कसे गेले? या गोष्टीपासून त्याना त्रास झाला का, मला हुरहूर लागली व झाली गोष्ट विसरून परत पूजास्थानाचे काम सुरू ठेवायच असच ठरवून स्वस्थ बसून राहिलो. २ वाजून गेले होते. मला दुपारची डुलकी येत नव्हती. मन विचार करीत होते. काय घडल ! कस घडल ! इतक्यात शरद पडित हा सेवेकरी श्रीस्वामीचा निरोप घेऊन पुन्हा आला. तो १ वाजेनतर खोलीत सेवेकरिता होता. श्रीस्वामीचे भोजन होऊन स्वस्थ झोपायची वेळ,पण श्रीस्वामीना तळमळ लागली होती. केवळ काही कारण नसता मला खोलीतील पहिल्या सेवेकऱ्यानं "प्रवेशबंदी" केली होती. तो अपमानित बोलला होता. याच श्रीस्वामीच्या प्रकृतीवर प्रतीक उमटल होत. ते बोलणे श्रीस्वामीना आवडल नसाव. त्यानी पोटावर शरद पंडित कडून औषधी पट्टी ठेवून घेतली. कोठे तरी दुखत होत, खुपत होत म्हणून. माझ समाधान करण्याकरिता त्यानी दुसरा निरोप पडित बरोबर पाठविला होता. मी पुरा हबकलो होतो. माझ्या बाबतीत श्रीस्वामीनी स्वत. त्रास करून घेतला होता दुपारी श्रीस्वामीनी ४ वाजता खोलीत बोलाविले मी समजलो होतो ते मला सूचना देणार होते. सात्वन करणार होते. खोलीत गेलो, नमस्कार केला ते म्हणाले, " तुम्हा सेवकाना खोलीत यायला हरकत नाही. पण प्रत्येक वेळी नमस्कार करायचा नाही. नमस्कार फक्त दिवसातून एकदाच !

० ० ०

पुण्यातील काही मडळी पारायणाकरिता आली होती. १९७२ मध्ये आश्रम श्री. तात्या देसाई याचे घरीच होता. एक दिवस सकाळी आम्ही सर्व अगणात आघोळीकरीता पाणी तापवीत बसलो होतो. गप्पा चालू होत्या विषय होता प्रसादाचा. सर्वजण म्हणत होते, " जायदे, तुमच्याकडे प्रसादाचे काम ! देवस्थानाकडे इतके पेढे येतात, ते आश्रमात सायप्रार्थनेला प्रसाद म्हणून का आणीत नाही ? " देवस्थानाकडील सर्व पेढे श्रीस्वामीच्या खोलीत ठेवण्याची पद्धत होती. दर गुरुवारी गावातील मडळी व सर्व शाळा-विद्यार्थी प्रसादाला येत. त्याना त्या पेढ्याचा प्रसाद वाटण्यात येत असे. मी त्या मंडळीना तसे सागितले, व म्हटले, " ती गोष्ट माझ्या हाती नाही. नियम असा आहे." हे आमचे सकाळचे बोलणे मी विसरलो होतो. रात्री आश्रमातील प्रार्थनेनंतर प्रसाद वाटायला श्रीस्वामीचेकडून पेढ्यांचा डबा आला. हा प्रसाद वाटायला सांगितला

आहे असा निरोप ! आम्ही सर्वजण एकमेकांकडे थक्क होऊन पाहातच राहिलो. प्रत्येकजण मनोमन समजला. हाच प्रसाद येण्याचा प्रकार दुसऱ्या व तिसऱ्याही दिवशी घडला. मग मात्र आम्ही सर्दच झालो व सर्वांनी एकविचाराने प्रार्थना केली, " श्रीस्वामी ! आमच्या मनात आलं ते आम्ही सहज बोलत होतो. आमच्या मनातील इच्छा अगदी पूर्ण झाली. आता आम्ही परत पेढे पाहिजेत म्हणणार नाही आमचं लक्ष पेढयाकडे गेलं ही आमची चूकच. पण तृप्ती झाली. आता परत आमच्या मनात हा येणार नाही." विषय आणि दुसऱ्याच दिवसापासून पेढे येणे बंद झाले ते कायमचेच.

० ० ०

श्रीस्वामीच्या जन्मोत्सवानंतर त्यांचे गुरु परमपूज्य श्री बाबा महाराज याची पुण्यतिथी. ती श्रीस्वामीच्या घरीच होत असे. ' अभंग ज्ञानेश्वरी 'चा सप्ताह होत असे. परमपूज्य श्रीस्वामी सत्यदेवानद याच्या मार्गदर्शनाखाली हे दोन्ही उत्सव होत असत. यावर्षी या कार्यक्रमात भाग घेण्याची संधी मला मिळाली. बाडबिस्तारा घेऊन तेथेच राहायचे. साधारण ३० मंडळी होती. सप्ताहाला सुरुवात झाली. तीन दिवस पार पडले. चौथ्या दिवशी माझी प्रकृति बिघडली. बरीच कसर-थंडी वाजून आली. सप्ताह पूर्ण करण्याचा तर निर्धार! तो दिवस तसाच काढला. गोळया घेतल्या. लघन केले. पण पाचव्या दिवशीही ताप होताच. नित्य कार्यक्रम उरकून ७ वाजता आम्ही सर्वजण मंडपात जमलो. प्रार्थना झाली व वाचन सुरू झाले. ' भावार्थ गीता ' वाचायची होती. प्रत्येकाने पाळीने वाचायचे. श्रीसत्यदेवानदस्वामी थाबण्याची सूचना देत व पुढे वाचन सुरू होई माझ्यापर्यंत पाळी आली. घसा बसला होता. बारीक कसर होतीच. ' आता वाचन कसल ! ' अशी मनात शका आली व दोन श्लोक वाचून 'पुढे वाचा' असे सागावे असा क्षणिक मनात विचार आला. श्रीस्वामीचे स्मरण चालू होते. मला ' व्यवस्थित वाचायला येऊ दे. ' अशी प्रार्थना मनात केली. डोळे क्षणभर मिटले. त्याच्या अधुकशा काळोखात प्रकाश किरणासमवेत आशीर्वादाचा उंचावलेला हात दिसला. तोपर्यंत माझी वाचनाची पाळी आली. व मी पुढील ओव्या वाचू लागलो. दोन ओव्या वाचून थांबणारा मी, जवळ जवळ १५ ओव्या वाचल्या. श्रीसत्यदेवानंद-स्वामी "पुरे" म्हणाले व पुढे म्हणाले, " तुम्हाला कोणता ग्रथ पाहिजे? 'ज्ञानेश्वरी' की 'दासबोध'?" मला क्षणभर काहीच कळले नाही की हा प्रश्न त्यानी का विचारावा ? पण लगेच विचार करून मला " एकनाथी भागवत " पाहिजे असे सागितले व त्यानी ते बक्षीस म्हणून दिल्याचे जाहीर केले. मागाहून असे कळले की, माझे वाचन सर्वोत्कृष्ट झाले होते.

● ● ●

# नाम आणि सोऽहम् एकरूप

— श्री. विनायक वा. नातू, मुंबई

**सोऽहम् मध्येच नाम सामावले आहे असे स्वामीजींनी सांगितले आणि माझा संशय फिटला.**

गुरुवार ता. १६।१०।१९६९ रोजी मी पांवसक्षेत्री श्रीस्वामीचे दर्शनास गेलो होतो. तेव्हा स्वामीनी मत्रोपदेश करून " सोऽहम् " चा जप करण्यास सागितले.

उपदेश देण्यापूर्वी श्रीस्वामीनी मी पूर्वी कोणाचा उपदेश घेतला आहे काय, म्हणून विचारले होते. तेव्हा १९२४ साली माझ्या परमपूज्य आजी कै. राधाबाई लिमये यानी मला "नाम" दिल्याचे सागितले. जेव्हा मी स्वामीना ह्यापुढे नामाचा जप करू की आपल्या " सोऽहम् "चा जप करू असे विचारले, तेव्हा स्वामीनी "सोऽहम्" मध्येच तुमच्या आजीनी दिलेले नामही सामावलेले असल्याचे सागून " सोऽहम् "चाच जप करावा असे सागितले. तेव्हापासून आजतागायत तोच जप करीत आहे.

● ● ●

# ‘ काही दूरवर आलों–तेवढ्यासाठींच !’

– श्री. शशिकांत पुरंदरे, पुणे

**––स्वामीजींना अर्पण करण्यास काय न्यावे सुचेना ! शेवटी भगवान रमण महर्षी यांच्या जीवनावर इंग्लिशमध्ये लिहिलेली दोन पुस्तके घेतली.**

परमहस स्वामीजीची माहिती १९६९ साली प्रथम श्री. पाडे यांचेकडून समजली. त्यांनी सागितलेल्या माहितीमुळे स्वामीजीच्या दर्शनाची उत्कठा वाढली व त्यानंतर थोड्याच दिवसानी पावसला जाण्याचा योग जुळून आला. १९६९ साली मार्च महिन्यात रामनवमीच्या शुभ दिवशी स्वामीजीचे दर्शन प्रथम घडले.

इतक्या थोर सत्पुरुषाच्या दर्शनाचा आयुष्यातील तो पहिलाच प्रसंग. त्यामुळे स्वामीजीना अर्पण करण्यास काय न्यावे हेच कळेना. शेवटी भगवान श्रीरमणमहर्षी यांच्या जीवनावर इग्लिशमध्ये लिहिलेली दोन पुस्तके स्वामीजीना अर्पण करण्यास बरोबर घेतली. त्यातील मोठ्या पुस्तकात श्रीरमण महर्षींच्या ह्यातीतील एका विशिष्ट कालखंडात महर्षींच्या समोर घडलेल्या घटनाचे विवरण होते व दुसऱ्या छोट्या पुस्तकात महर्षींचा उपदेश होता.

जाताना रत्नागिरीला स्वामीभक्त श्री. आबेरकर याची मुद्दाम भेट घेतली. त्यांच्याकडूनही स्वामीजीची खूपच माहिती मिळाली. श्री. आंबेरकर यांनी तोपर्यंत महर्षींचे कोणतेही वाङमय वाचलेले नव्हते. तेव्हा माझ्या मनात सहज विचार येऊन गेला की माझ्याजवळ असलेले महर्षींच्या जीवनावरील मोठे पुस्तक पांवसहून परत आल्यावर श्री. आंबेरकर यांना भेट म्हणून द्यावे व छोटे पुस्तक स्वामीजींना अर्पण करावे. परंतु हा विचार मी कोणालाच सागितला नाही.

पांवस येथे जाईपर्यंत दुपार झाली. माझ्याबरोबर माझे आणखी तीन मित्रही होते. दुपारी अडीचच्या सुमारास स्वामीजींनी आम्हास आत दर्शनासाठी बोलावले. स्वामीजींच्या पलंगावर डोके टेकवून आम्ही प्रत्येकाने नमस्कार केला. स्वामीजी ही प्रत्येकास प्रतिनमस्कार करीत. मुखाने मधूनमधून “ ॐ ” म्हणत होते. इतका मधुर ओंकार मी माझ्या आयुष्यात प्रथमच ऐकत होतो.

स्वामीजीच्या सूचनेवरून आम्ही समोर ठेवलेल्या बाकावर बसलो. श्रीरमण-महर्षींची दोन्ही पुस्तके स्वामीजीसमोर ठेवली. दोन्ही पुस्तके स्वामीजीनी थोडा वेळ चाळून बघितली. व छोटया पुस्तकातील कोणतेही पान काढून वाचावयास सांगितले.

आम्ही वाचलेल्या पानामध्ये श्रीरमणमहर्षींना एका शिष्याने अशी शंका विचारली होती की, आयुष्यातील सर्व घटना प्रारब्धाधीन आहेत का? त्यावर श्रीरमण-महर्षींनी उत्तर दिले की, छोटी असो अथवा मोठी असो, प्रत्येक घटता कशी घडावी हे आधीच ठरलेले आहे. (महर्षींचे मूळ उत्तर असे आहे : " एव्हरीथीग इज प्री-डेस-टीन्ड् )

ह्यावर विवरण करीत स्वामीजी म्हणाले : " श्री रमण महर्षी असे म्हणतात की सर्व कांही आधीच ठरलेले आहे, तेव्हा आपल्या हातून काही साधना व्हावयाची असेल तर तीही ईश्वरी इच्छेनेच होणार आहे. म्हणून स्वत.कडे कर्तेपणा घेऊ नये. 'कर्ता करविता परमेश्वर' असा भाव ठेवावा. असा भाव कायम ठेवणे अवघड आहे. परंतु प्रयत्न सोडू नये " त्यानतर आम्हा सर्वांना स्वामीजीनी " सोऽहम् " ध्यान कसे करावयाचे ते सागून अनुग्रह दिला व आमच्याकडून थोडा वेळ ध्यान करवून घेतले. व रोज करावे असा उपदेश केला. मी स्वामीजीना एक शका विचारली, " अधिकारी व्यक्तीकडून उपदेश घ्यावा असे म्हणतात ते खरे का ? " ह्यावर स्वामीजीनी उत्तर दिले, " म्हणून तर आपण इतक्या लाब आलो. "

परत निघताना स्वामीजीचा फोटो जवळ असावा अशी इच्छा मनात आल्या-वरून श्री. दिलीप देसाई याचेतर्फे फोटोसाठी स्वामीजीकडे विचारणा केली. तेव्हा फोटोसाठी पैसे खर्च करू नयेत असा उलट निरोप स्वामीजीनी आम्हास पाठविला ! परतु आम्हीं आग्रह धरल्यामुळे स्वामीजीनी आमचा हट्ट शेवटी पुरवला व आम्हास फोटो मिळाले.

निघण्याच्या वेळी श्रीरमणमहर्षींची दोन्ही पुस्तके स्वामीजींच्या खोलीतच राहिली होती त्यातील मोठे पुस्तक श्री आबेरकराना भेट देण्याचा सकल्प होता, परंतु ते पुस्तक स्वामीजीच्या खोलीतून बाहेर मागवणे प्रशस्त वाटेना म्हणून तो विचार सोडून दिला स्वामीजीच्या निवासस्थानापासून साधारणत १००-१५० फूट दूर गेलेलो असताना श्री. दिलीप देसाई मोठे पुस्तक घेऊन धावत आमच्यापाशी आले व पुस्तक माझ्याजवळ देऊन म्हणाले, " स्वामीजीनी असा निरोप दिला आहे की, हे पुस्तक इतर कोणास भेट म्हणून द्यावयाचे असल्यास बरोबर असू द्यावे. मी तर आश्चर्यचकितच झालो. श्री. आबेरकर याना हे पुस्तक भेट म्हणून देण्याचा विचार मी वास्तविक कोणा-सही सागितला नव्हता. तो 'मुगीचेही मनोगत' जाणणाऱ्या स्वामींजीनी जाणून स्वत:च्या द्रष्टेपणाचा असा अनुभव आम्हास दिल्यामुळे अतिशय आनंद झाला.

रत्नागिरीस आल्यावर श्री. आंबेरकर यांना सर्व वृत्तांत निवेदन केला. ते पुस्तक त्यांना भेट म्हणून दिले. त्यांनाही फार आनंद झाला. आता जेव्हा जेव्हा स्वामींजीची आठवण होते तेव्हा तेव्हा श्रीज्ञानेश्वरांची खालील ओवी मनात उमटते :

**जयाचे नाव तीर्थरावो । दर्शने प्रशस्तीसी ठावो ।**
**जयाचे नि संगे ब्रह्मभावो । भ्रांतासी ।।**

●●●

# स्तोत्रगान अल्पतोय अर्घ्यदान अर्पितो

– श्री. विनायक गोपाळ पागे, कोल्हापूर

**श्रींचे काव्यप्रेम उत्कट! ते भावकवी, महाकवी आणि संतकवी होते.**

अनुग्रहकाल : वैशाख वद्य ८, शके १८६१ दि. ८।५।६९, गुरुवार

श्रीमत् सद्गुरु स्वामी स्वरूपानद याच्या आठवणीच्या आरसेमहालात जिकडे पाहावे तिकडे आपलीच निरनिराळी रूपे पहात आहोत असा दिव्य अनुभव येतो. एका उत्कट 'मातृस्मृति' या कवितेत "स्मृतिगधे दरवळले अतर। सुगध दाटे मनीं। आई आठव तव येऊनी ।। अशा पक्ति घेऊनच स्मृतिगध दरवळत येतो सद्गुरूचे बद्दल जो उत्कट भाव भाविक शिष्याचे मनात असतो तेच त्याचे भाव-रूप स्व-भाव बनत जाते व उत्तरोत्तर गाढ आत्मानुभव होऊन लिहिण्या-बोलण्या पलीकडे जाऊन बसते.

दीपलक्ष्मीचा 'स्वामी स्वरूपानद' विशेषांक १९६९ साली कोल्हापुरात प्रथम जेव्हा प्रकाशित झाला, तेव्हा त्यातील श्रींचे जे दर्शन झाले तीच एक प्रेरणा ठरून अनुग्रह सपादन करण्याचे उत्कट इच्छेने पूर्व संकल्प म्हणून गुरुवार दि. ८ ला भेटू इच्छितो अशा आशयाचे साधे पोस्टकार्ड त्याना लिहिले, त्याचे उत्तर थोडक्यात नेहमीप्रमाणे आले त्याच दिवशी आत्मसमाधानाचा उत्कट अनुभव अद्याप ताजाच वाटतो.

त्याची सेवा आपण कशी करावी याबद्दल विचार चालू होता. श्रीना काव्यप्रेम आहे. ते स्वत: महाकवी, भावकवी, संतकवी इत्यादि सर्वच आहेत. तेव्हा आपला भाव काव्यामधूनच व्यक्त व्हावा अशी माझी इच्छा. लहानपणापासून काही काव्यरचनेची हौस असल्याने अशा प्रकारे सेवा म्हणून गुरुचरित्रांतील एक स्तोत्र, इंदुकोटि० या चालीवरच स्तोत्र रचावे अशी प्रेरणा झाली. त्यातून पुढील स्तोत्र स्रोत पाझरले– रचनाकालातील दोनतीन दिवस भाव-समाधि ही खरोखरीच नित्य शांतीची अपूर्व भेटच असे वाटते.

प्रत्यक्ष सद्गुरूंच्या भेटीतील आनंद ह्या अद्वितीयच आहे. स्तोत्रांतील आशय पाहून श्रीची मुद्रा सुप्रसन्न झाली. माझेबरोबरच आलेल्या पत्नीला ती अधिक पाहता आली. तथापि मी तिथे डोळे मिटून 'स्वस्थ' बसलो होतो. नेहमीप्रमाणे अनुग्रहाचा कागद व खडीसाखर प्रसाद घेऊन खोलीमधून बाहेर पडलो. 'स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवन । सद्गुरु चरण उपासिता । या अभंगोक्तीची प्रत्यक्ष प्रचीती म्हणजे श्रीस्वामींची, त्यांचे वसतिस्थानाची किंवा पांवसची भेट. या स्तोत्रांतील वरप्रसाद फलश्रुतिदायक नववे कडवे नतर एक महिन्याने पूर्ण करता आले. त्यामुळे 'बोधकालातरी ठसेल' हेच श्रीबाबामहाराजाना श्रीस्वामीनी ज्यावेळी अनुग्रह दिला त्यावेळी सहजोद्गार काढलेले, त्याचे चरित्रातून वाचायला येतात त्याची प्रचीती पटते. त्यानतरही काव्यस्फूर्ति वेगवेगळ्या काव्यातून फुलतच राहिली व आत्मानद अनेकतेने प्रगट होत राहिला. हेहि त्याचे कृपेचेच द्योतक होय भावशुद्धीसाठी साधकांना अशा तऱ्हेचे काव्य सच्चितन मननाद्वारेच स्फुरत जाते व तो स्वत. बरोबर इतरानाही समान भूमिकेवर घेऊन जाऊं शकतो. कित्येकदा अप्रगटपणे मार्गदर्शकही होतो. याही प्रकाराने सद्गुरु कृपेचा अनुभव येत रहातो. यात आत्मप्रौढीचा भाग नमून गुरुकृपेचा गौरव आहे. श्रीस्वामीनी स्वत: वाचून पाहून ज्यातील आशयासबधी प्रसन्नता व्यक्तविली ते स्तोत्र खाली देत आहे :—

**—: सद्गुरु स्वरूपानंद स्तोत्र :—**

**प्रकाश चित्स्वरूप दिव्य भानु तेज भास्करा**
**वंदितो पदीं अनन्य सद्गुरु कृपा करा ।। ध्रु० ।।**

**स्तोत्रस्रोत भक्त मानसात आज पाझरे**
**वंदनार्थ शब्द आर्त मुक्त वाहती झरे**
**आत्मतृप्त श्रीगणेश वाहु दूर्व अंकुरा ।। वंदितो० १ ।।**

**निर्मला सुकोमला सुशीतला सुमंगला**
**अमोल लाभ जाहला सुसंग दिव्य आपुला**
**मोदमस्त वाहतो उदात्त वायु निर्भरा ।। वंदितो० २ ।।**

**मोगरा बरा सुगंध मंद मंद दरवळे**
**शब्दसौरभी उदात्त ऐक्यभाव आकळे**
**भावगंध काव्यरंग अर्पु स्वामि सुन्दरा ।। वंदितो० ३ ।।**

**सज्जना निरंजना स्वभक्त दैन्य भंजना**
**कृपाघना दयाघना स्वभाव भक्त रंजना**
**शारदीय ज्ञानदीप तूं अभंग गोजिरा ।। वंदितो० ४ ।।**

ज्ञान धाम षड्-विराम सौख्यपूर्ण चंद्रमा
निर्गुणा गुणालया विशुद्ध जान्हवी क्षमा
वर्णना गुरो अमूप मूक जाहली गिरा ।। वंदितो० ५ ।।

पूर्ण ब्रह्म, विष्णु तूं महेश तूंचि दत्त तूं
संत, भक्त नित्य तूं विमुक्त तूं अनंत तूं
राम रंजनी विराग योग छत्र चामरा ।। वंदितो० ६ ।।

माय बाप बंधु आप्त तूच एक सोयरा
ध्यास भास एक आस स्वामिया भवंतरा
वास घ्या निरंतरा! सत्स्वरूपसुंदरा ।। वंदितो० ७ ।।

अक्षरीं निरर्थ स्वार्थ मोक्ष भक्ष रक्षणा
पोपटी चर्पटी उगाच ही विचक्षणा
अर्घ्यदान स्तोत्रगान अल्प तोय भास्करा ।। वंदितो० ८ ।।

अष्टकी गुरु प्रसाद लाभला विनायका
नित्यपाठ प्रेमभेट तोषवील भाविका
माउली स्वरूप राम देतसे कृपा वरा ।। वंदितो० ९ ।।

• • •

# पाहिले परब्रह्म साजिरे

– सौ. सुमती मधुकर गोरे, विलेपार्ले

**" सद्गुरु माऊली सोऽहम्‌ची माहिती करून देत होते. मी पहात होते. पाहाता पाहाता ॐकाराचा स्पष्ट ध्वनी ऐकू येऊ लागला. त्यांच्या अंगप्रत्यंगातून ॐ ही अक्षरे दिसू लागली. पाहावे तिथे ॐ शिवाय जागा शिल्लक राहिली नव्हती. "**

सद्गुरुस्वामी स्वरूपानदजीचे दर्शन घडले तेंच मुळी आश्चर्यकारक पद्धतीने. मी व माझा मुलगा चि. सुधीर १ मे ते ५ मे १९७० ला यात्रा कपनीतून राजापुरची गगा, हेदवीचा गणपति इत्यादि पाहाण्यासाठी रत्नागिरीला येणार होतो. 'दीपलक्ष्मी' मध्ये स्वामी स्वरूपानदाची समग्र माहिती व त्याचे चरित्र वाचले होते. सद्गुरूच्या शोधार्थ मी पूर्वीपासून प्रयत्न करीत होते. त्यासाठी अनेक सत वाङमयाचा अभ्यास करीत होते. मनाची तळमळ वाढत होती. गणेशाची भक्तीही त्यासाठी चढत्या वाढत्या प्रमाणात करीत होते.

स्वामीच्या हस्ते ' श्रीमत् अभग ज्ञानेश्वरी ' स्वाक्षरीसुद्धा घ्यावयाची या इच्छेने मी एक पत्र १६-४-१९७० ला पाठविले. पत्राच्या उत्तराची उत्सुकतेने वाट पाहात असता त्याचे २५-४-७० चे पत्र मला ३०-४-७० ला मिळाले त्यात एक ओवी होती. " करू नामाचा गजर। सुखे होऊ भवपार।। " स्वामीच्या स्वाक्षरीच्या या आशीर्वादात्मक पत्रामुळे त्याच्या दर्शनाची उत्सुकता वाढत होती.

यात्रा कपनीतून एकेक स्थळ पाहात आम्ही रत्नागिरीला येऊन पोहोचलो. मी गणेशभक्त असल्यामुळे गणपतीपुळे येथील गणेशाला प्रार्थना केली की, स्वामीचे दर्शन घडू दे. रत्नागिरीला मी प्रथमच येत होते. सारे रस्ते अनोळखी. बरोबर मुलगा लहान म्हणजे आठ वर्षाचा. माहिती होती ती फक्त 'दीपलक्ष्मी'त वाचलेली. अशा दोलायमान मनस्थितीत रात्री गणेशाची प्रार्थना करून झोपले. अंतर्ज्ञानाने स्वामी स्वरूपानदजींनी हे सर्व ओळखले पहाटे दृष्टात झाला. ' चल उठ, तुला भाटयाला जायचे आहे. ' कानात आवाज झाला. आवाज इतका सुमधुर नाजूक. त्या आवाजाचे वर्णन शब्दात करता येणार नाही. जागी झाले. पहाटेचे ३। वाजले होते. मनाशी स्वामीच्या दर्शना-

साठी जाण्याचा निश्चय केला. मनात एकेक प्रश्न आले. प्रेरणेच्या द्वारा त्यांची उत्तरेही मिळाली. आम्ही ' दत्त मदिर कार्यालयात ' उतरलो होतो. तेथून भाटयाच्या खाडी-पर्यंत कसे जायचे ? " टॅक्सी कर."

सताच्या तेथे गर्दी असल्यास ११।। पर्यंत रत्नागिरीला परत येऊ शकले नाही तर ही मडळी १२।। वाजता परतीच्या प्रवासाला निघतील मग काय करायचे, " एस. टी. स्टॅडपासून तू दादरपर्यंत एकटयाने नक्की प्रवास करू शकशील. " मन शात झाले. मी चटकन् तयारी करून व यात्रा कपनीच्या चालकाना सागून निघाले. प्रवासात कोणताही अडथळा न येता देसाई बधूच्या घरी आले. मोहन बाहेर ओटीवर होते. त्यानी म्हटले की, मी पार्ल्याहून पत्र पाठविले होते त्याप्रमाणे आले आहे. स्वामीना ' श्रीमत् अभग ज्ञानेश्वरीवर ' स्वाक्षरी करून ती देण्यास सागावे. ते म्हणाले, " स्वामीनी ८।। वाजता स्वाक्षरी करून ठेवली आहे " मी तेथे पोहोचले तेव्हा नऊ वाजले होते. सद्गुरूच्या सामर्थ्याची चुणूक मिळाली त्या वेळेला गर्दी नव्हती. माझ्या अगोदर एक तरुण आत गेला त्यावेळेला दरवाजा उघडला मी त्याक्षणी बाहेरून दर्शन घेतले. त्या क्षणी सद्गुरूच्या सभोवती एक दिव्य तेजोवलय फिरून गेलेले पाहिले. मनाने आतून निर्णय दिला, ज्या गणेशाची तू अनेक वर्षे भक्ती करतेस तोच गणेश मानवी रूपाने लोकोद्धारासाठी इथे प्रकट झालेला आहे शरीराला अकारण कप सुटला पण तो भयाचा नव्हता तो तरुण आत गेल्यावर उघडझापेचा मधला दरवाजा बद झाला. ती तेजस्वी, आरक्तवर्णीय मूर्ति थोडा वेळ दिसेनाशी झाली मन शात झाल्याचा अवर्णनीय समाधानाचे क्षण मी उपभोगीत होते. तो तरुण बाहेर आल्यावर मला व चि. सुधीरला आत बोलाविले स्वामीनी प्रवासाची आस्थेने चौकशी केली. मी उत्तरले, "या अनोळखी ठिकाणी मी केवळ पहाटेच्या आपल्या दृष्टातानुसार सुखरूप आलेली आहे." सूर्यापासून जसे किरण निघतात तसे स्वामीच्या चेहऱ्यापासून मद शीतल किरण बाहेर पडत होते ते पहात असताना स्वामीनी " श्रीमत् अभग ज्ञानेश्वरी 'चे दोन्ही भाग व खडीसाखरेचा प्रसाद दिला. चि. सुधीरला श्रीमत् अभग ज्ञानेश्वरी सार व स्तोत्र व लहान फोटो दिला. मी स्वामीना म्हटले, "मी गणेशभक्त असल्यामुळे 'श्रीमत् अभग ज्ञानेश्वरी 'ची २१ पारायणे करीन. हा ग्रथ मला समजावा व इतराना समजावून देता यावा "त्यावर स्वामी हळूवार,वात्सल्यपूर्ण व मधुर आवाजात 'आशीर्वाद' असे म्हणाले असे हे स्वामीचे ' प्रसन्न दर्शन ' माझ्या अत करणात कोरले गेले आहे.

दिवाळीनतर ३-११-७० ला आम्ही सर्व श्री गोरे, चि. सुधीर व मी आश्रमात दोन दिवस रहाण्यासाठी आलो. ३-११-७० ला दुपारी ३।। वाजता अनुग्रह मिळाला त्यावेळेला आलेला माझा अनुभव :— सद्गुरु माऊली ' सोऽहम् 'ची माहिती करून देत होते. मी पहात होते. पहाता पहाता ' ॐ' काराचा स्पष्ट ध्वनी ऐकू येऊ लागला. त्यांच्या अगप्रत्यगातून रोमारोमातून तेजाची ' ॐ' ही अक्षरे दिसू लागली. पहाते

तेथे ' ॐ' शिवाय जागा शिल्लक राहिली नव्हती. म्हणजेच ॐकारावर आरूढ झालेली गुरुमूर्ति दिसली. श्वासोच्छवासातून अनोळखी मंद सुगंधी वारा वाहात होता. असेच काही क्षण गेले. त्यानी माझ्याकडे दृष्टी वळविली त्याबरोबर त्यांच्या नयनरम्य डोळ्यातून निळे निळे किरण बाहेर पडले त्याच्या डोळ्यात माझी दृष्टी खिळून गेली. ते किरण माझ्या नयनात शिरले. मला शात शात वाटायला लागले त्यानी माझ्याकडून ' सोऽहम् ' ची प्रक्रिया करवून घेतली. त्यानंतर आध्यात्मिक प्रश्न मी त्याना घरून लिहून आणलेले दिले. त्यानी दुसऱ्या दिवशी म्हणजे ४–११–१९७० ला श्री. नाना ससारेद्वारा उत्तरे लिहून दिली. मध्यम आकाराचा फोटो ' प्रसाद भेट ' स्वाक्षरी व तारीख घालून दिला ' सजीवनी गाथे 'च्या प्रती शिल्लक नव्हत्या म्हणून स्वत.च्या कपाटातील ' कव्हर घातलेले पुस्तक ' ' प्रसादभेट ' म्हणून स्वाक्षरी तारीख घालून दिली. ' हे मी माझे महद्भाग्य समजते. ' आत्मप्रभा ' हे पुस्तक घेऊन जाण्यास सागितले म्हणून मी ते पुस्तक विकत घेतले दि १६-१-१९७५ पासून दर गुरुवारी ' स्वरूप-पत्र-मजुषा ' यातील सूक्ष्म अर्थ भगिनीना सागने एक तासात साधारणपणे तीन पत्राचा अर्थ सागितला जातो

संसारात राहूनही मुक्त व्हायचे असेल तर ' स्वरूप-पत्र-मजुषा 'तील आशय व्यवहारात उतरविण्याचा जर प्रामाणिक प्रयत्न केला तर माणसाचे जीवन सुखी बनेल असा माझा विश्वास आहे त्यातील सर्वच पत्रे मनन-चितन करण्यासारखी आहेत. स्वामी सत्यदेवानंद सरस्वतीनी अत्यत विचारपूर्वक माडणी करून प्रत्येक पत्रातील महत्त्वाचा सदेश स्पष्टीकरण करून सागितला आहे त्यामुळे सामान्य बुद्धीच्या साधकांना तर दिलासा मिळेलच पण प्रयत्नपूर्वक अभ्यास करणाऱ्यानाही मार्गदर्शक होतो. उदाहरणार्थ, पत्र क्रमाक ४१ वे :— भावार्थ गीतेच्या दुसऱ्या अध्यायाचे नित्यश: मनन केल्यास परम समाधान प्राप्त होईल असे श्रीमत् सच्चिदानद सद्गुरु माऊलीनी स्वप्रचीतीचे बोल सांगितले आहेत. तसेच पत्र क्रमाक ४२:—भावार्थ गीतेचा बारावा अध्याय व श्रीज्ञानेश्वरीचा दुसरा अध्याय चितनासाठी सुचविला आहे यातील मर्म हेच आहे. जसाजसा ' सोऽहम् ' साधनेत भक्त पारगत होत जाईल. तशी तशी त्या साधकाची दृष्टि विशाल होईल. मी म्हणजे देह नव्हे. हा भाव दृढ होईल. सद्गुरु माऊलीचा प्रत्यक्ष सहवास जास्त लाभला नाही हे खरे; परतु त्याची दृढभेट व्हावयास पाहिजे असेल तर ' श्रीमत् अभग ज्ञानेश्वरी 'चे व इतर वाङमयाचा अभ्यास केल्यास आणि ' सोऽहम् ' च्या अनुसधानात राहिल्यास सद्गुरु माऊलीच्या भेटीचा आनंद लाभतो असा माझा अनुभव आहे.



# पर मनोगत जाणणारे स्वामी स्वरूपानंद

– श्री. महादेव विष्णू जोशी वैद्य, मुरुड हर्णे

**" स्वामींना जे विचारायचे होते तो खिशातला कागद खिशातच राहिला. सोऽहम् मंत्राचा जप स्वामींनी स्वतः करून दाखविला. येणारा मनुष्य अनुग्रहीत असो वा नसो. सगळ्यांशी ते समानत्वाने वागत. सगळ्यांचेच समाधान करीत. "**

चैतन्यरूप सद्गुरु स्वामी स्वरूपानंदांना शतश. प्रणाम.मी व माझे स्नेही श्रीरामबोवा जोशी, राहणार केळशी असे दोघे स्वामीचे दर्शनाकरिता दिनाक २१।११।१९६७ रोजी दापोली-रत्नागिरी एस टी. गाडीने गेलो. सायंकाळी पावसला पोचलो. नतर दुसरे दिवशी दिनाक २२।११।६७ रोजी सकाळी स्नानसंध्या आटोपून स्वामीचे दर्शनास निघालो. जोशी याचे मनात 'सोऽहम्' मत्राचा जप कसा करावयाचा हे विचारावे असे वाटले. मी त्याना सागितले, तुमचे प्रश्न काय असतील ते कागदावर लिहून द्या. आपण स्वामीना तो कागद दाखवू, याप्रमाणे त्यानी कागद लिहून घेतला व आम्ही देसाई याचे घरी गेलो नेहमीप्रमाणे हातपाय धुवून पडवीत जाऊन बसलो व स्वामीचा निरोप आल्यावर त्याचे खोलीत जाऊन साष्टाग नमस्कार घालून स्वामीचे समोर त्यानी सागितल्यावर बसलो. स्वामीचे पुढे मी. स्वामी बसलेलेच होते व माझे उजवे बाजूस सदर जोशी असे बसलो. स्वामीनी आमचेकडे दृष्टीक्षेप केला व मला म्हणाले, " तुम्ही उठा व त्याना माझे समोर बसू द्या " त्याप्रमाणे आम्ही बसलो. लगेच स्वामीनी त्याना माडी घालून बसण्यास सागितले व आपण 'सोऽहम्' मत्राचा जप कसा करावयाचा हे त्यानी स्वत. करून दाखविले व त्याचेकडून करून घेतला. नाभीपासून ब्रह्म रध्रापर्यत हळूहळू श्वास वर न्यावयाचा व क्षणभर थाबून पुन: खाली सोडावयाचा. वर नेताना सोऽऽ व खाली सोडताना हम् असा श्वासाचा आवाज होतो त्यावर लक्ष ठेवावयाचे असे सागितले व त्याचेकडून करवून घेतला. आम्ही काहीही न विचारता आमचे मनातील हेतू जाणून त्यानीच सागितले. यावरून दुसऱ्याचे हृद्गत ते समजत अशी खात्री झाली खिशातला कागद खिशातच राहिला. वास्तविक श्री. जोशी हे त्याचे अनुग्रहीत नाहीत व अनुग्रह घेण्याच्या इच्छेनेही आलेले नव्हते. परतु दर्शनाला येणाऱ्या मनुष्याचे ते कसे समाधान करीत हे पाहून आनद झाला व आमची श्रद्धा अधिकच दुणावली.

● ● ●

# श्रीसद्गुरू स्मृतींच्या मी चांदण्यांत न्हाते

—सौ. अरुणा नगरकर, पुणे.

१९७२ हे वर्ष माझ्या आयुष्यांतले अत्यत पवित्र आणि महत्त्वाचे असे ठरले. ह्यावर्षी मे महिन्यात मला प्रथमच परमपूज्य श्रीस्वामीकडे जाण्याचा योग आला. ‘आपल्या पतीचे गुरु’ ह्या भावनेने मी त्याच्याकडे गेले. आपण त्यांचा अनुग्रह घ्यावा असे त्यावेळी तर वाटले नाहीच, परतु एक ओढ, भक्ति ही देखील फारशी वाटत नव्हती.

तेथे गेल्यावर मात्र कुठेतरी प्रेमाची जबरदस्त ओढ आहे असे वाटू लागले. परतु मनापासून विश्वास नसल्याने फक्त ह्या वातावरणात आपल्याला बरे वाटते एवढेच वाटले.

त्यावेळी सध्याचा नवीन आश्रम नव्हता. जुन्या आश्रमातील एक गोष्ट. एक दिवस आश्रमातील सर्वजण सायकाळी ७ वाजता नेहमीप्रमाणे प्रार्थनेला बसले होते. मी एकटीच दोन मुलाना घेऊन जुन्या आश्रमातील माडीवरच्या खोलीत बसले होते. खाली नित्यपाठ सपला व सर्वजण ध्यानाला बसले. सगळीकडे शातता पसरली. मी धाकट्या मुलाला माडीवर घेऊन निजवीत होते. पण एकाएकी काय वाटले कुणास ठाऊक. त्याला अक्षरश: माडीवरून खाली लोटले व धावतच जिना उतरून खाली आले. समोरच नळावर दिल्लीहून आलेल्या एक बाई हातपाय धूत होत्या, त्याच्याकडे मी धावत सुटले. मी नळापाशी त्याच्याजवळ गेले आणि त्या धाडकन् माझ्या अंगावर कोसळल्या. त्याना पॅरॅलिसिसचा ॲटॅक आला होता. जर मी तेथे गेले नसते तर त्या खाली दगडावर पडल्या असल्या. परमपूज्य स्वामीच्या दिव्य शक्तीने माझ्याकडून हे काम करवून घेतल्याबद्दल मी स्वत.ला धन्य मानते.

त्यावेळी ५-६ दिवस आम्ही पांवसेत होतो. एक दिवस मला सद्गुरुमाऊली पूर्वी इतराशी बोलत होते तसे आता आपल्याशी बोलणार नाही म्हणून फार वाईट वाटले. त्याच दिवशी दुपारी परमपूज्य श्रीस्वामीनी मला एकटीला खोलीत बोलावले व म्हणाले, ‘तुम्ही इथे येऊन दोन दिवस झाले पण प्रकृतीमुळे मी काही तुमच्याशी बोलू शकलो नाही. आता आपण बोलू या.’ असे म्हणून तुम्ही कुठे राहता, घरी कोण कोण आहे, काय करता, मुले किती इत्यादि अगदी व्यावहारिक गोष्टीवर गप्पा मारल्या. नंतर आम्ही पुण्यास परतलो.

पुण्यामध्ये डिसेंबर १९७३ मधील एक अनुभव. मध्यरात्र उलटून गेली होती. सगळीकडे नीरव शातता होती. अशा वेळी मला एक स्वप्न पडले. परमपूज्य स्वामी आमच्या खोलीत आले ह्यांच्या डोक्यावरून हात फिरविला. मी फक्त त्यांच्या पवित्र चरणांचे दर्शन घेण्यात गुग झाले होते. इतक्यात ते माझ्या जवळ आले. माझ्या डोक्यावर थोपटल्यासारखे केले व त्याच्या मृदु आवाजात म्हणाले, 'मुले जागी असतांना आपण इतके शांत झोपू नये?' त्याचे हे शब्द माझ्या कानात घुमत होते व स्पर्श जाणवत होता तेवढयात श्रीस्वामी अदृश्य झाले व मला जाग आली. बघते तो माझा धाकटा मुलगा जागा होता व बसून राहिला होता.

त्यानतर लगेच फेब्रुवारी १९७४ मध्ये माझे आवडते सत श्रीगजानन महाराज (शेगाव) याच्या प्रकट दिनाच्या दिवशीच अनुग्रह देऊन सद्गुरुमाऊलीने समर्थोक्तीची जी प्रचीति मला दिली ती मी कधीच विसरणार नाही. ते समर्थवचन म्हणजे--

**संत दिसती वेगळाले परी एकचि स्वरूपीं मिळाले ।**
**अवघे मिळून झाले देहातीत वस्तु ।।**

अनुग्रह मिळाल्यानतर मग मात्र माझी श्रद्धा वाढली आणि वाटू लागले,

**मियां जो नाही आराधिला । आदरे नाही सन्मानिला ।।**
**परि सहज कृपाळुत्वे धावला ।**
**स्वामी माझा मजलागी ।।**

१५ ऑगस्ट १९७४ या दिवशी परमपूज्य श्रीस्वामीनी समाधी घेतली. श्रद्धांजलिनिमित्त 'परमार्थ' मासिकाने 'पराशाति' विशेषाक काढला. त्या मासिकासाठी मी लेख लिहित होते. रात्री ११ वाजता लेख पूर्ण करून मी निजले. रात्री मला स्वप्न पडले. स्वप्नामध्ये परमपूज्य स्वामीजी फोटोतूनच बोलत होते. नंतर त्यांच्या फोटोतून ते श्रीगजानन महाराज याच्या फोटोत आले. तेथे आल्यावर मी त्याच्याजवळ 'तुम्ही का गेलात' असे म्हणून खूप रडले. त्या वेळेला त्यानी पुन्हा मला मृदु आवाजात सागितले, 'मी गेलो नाही. मी इथेच आहे. सोऽहम् ध्यान हळूहळू जमेल.' एवढे बोलून त्यानी मला मातापित्याच्या अगाध प्रेमाने मिठी मारली. तो कापसासारखा मऊ, चद्रासारखा शीतल स्पर्श अजूनही मला आठवतो व अंगावर आनंदाचे रोमांच उठतात.

ज्याप्रमाणे आईच्या प्रेमाचे मुलाला सतत अनुभव येतात त्याचप्रमाणे आपल्या सद्गुरूचे प्रत्येक शिष्याला सतत अनुभव येत आहेत. आकाशातल्या चादण्यांची मोजदाद होईल पण या अनुभवांची कुठवर मोजदाद करणार? फक्त डोळयांत अश्रु उभे राहतात आणि ओठावर शब्द येतात—

**'सद्गुरुराये कृपा मज केली ।**
**परि नाही घडली सेवा काही ।।"**



# तीस वर्षांनीं तेंच दर्शन

– सौ. विजया गो. दत्तवाडकर, कोल्हापूर

**" तीस वर्षांपूर्वी स्वप्नात ज्या देवाने दर्शन दिले तो देव आणि चारपाच वर्षांपूर्वी ज्यांचे दर्शन घडले ते स्वामी स्वरूपानंद यांच्यात विलक्षण साम्य होते. इतक्या लहान वयात स्वामींनी आपल्याला स्वप्नात दर्शन दिले हे आठवले की विलक्षण आनंद होतो. "**

फार वर्षापूर्वीची गोष्ट आहे त्यावेळी मी बारातेरा वर्षाची होते. माझे वडील आजारी होते. त्याची प्रकृति अगदी काळजी करण्यासारखी झाली होती. त्या काळजीतच आम्ही सर्वजण होतो एक दिवस मला भयानक स्वप्न पडल. त्या स्वप्नाची आठवण झाली की अजून अगावर काटा उभा राहतो स्वप्न असे, मी व आई आणि मावशी अशा सर्वजण माझ्या आत्याबाईच्याकडे गेलो. त्या पुण्याच्या मडईजवळ राहात होत्या. दरवर्षी त्याच्याकडे दासनवमीचा उत्सव होत असे. सर्व उत्सवाची तयारी चाललेली होती. आम्ही जाऊन बसलो. आत्यान वडिलाच्या प्रकृतीची चौकशी केली व आईने सर्व हकिगत सागितली. त्याचे बोलणे चालणे चालले होते. मला मात्र चैन पडेना. त्याचे देव खालच्या मजल्यात होते. तेथे मी गेले आणि देवापुढे उभे राहून देवाला करुणा भाकली " देवा, परमेश्वरा आमच्या दादाना बरे वाटू दे. मी तुला दोन आण्याची खडीसाखर वाटीन. " हे माझे बोलणे चालले आहे. ते ऐकून की कोण जाणे, त्या महापुरुषाने डोळे उघडले आणि स्मित हास्य करून आपला उजवा हात उचलला आणि नकारार्थी हलवला. या सर्व गोष्टीचा मला काहीच अर्थ कळला नाही मी नुसते पहातच राहिले. एवढ्यात जागी झाले. देव म्हणजे एक तेजःपुंज तरुण महायोगी होता. अगात पाढरे शुभ्र कपडे, डोक्याला कानटोपी, डोळे मिटलेले, हात आजानुबाहू, आसन माडी घातलेली आणि ध्यानस्थ बसलेला तरुण महायोगी पुरुष होता तो. पुढे आठ दहा दिवसांनी माझे वडील वारले व या सर्व गोष्टीवर पडदा पडला. या गोष्टीला तीस ते बत्तीस वर्ष होऊन गेली. चारपाच वर्षापूर्वी मी पावसला गेले त्या वेळी मला स्वामीना पाहून यांना कोठे तरी पाहिले आहे असे वाटू लागले. कोठे पाहिले याचा विचार करू लागताच. तीस वर्षांपूर्वीचे स्वप्न मला आठवले आणि मनात एकदम प्रकाश पडला. आपल्याला तीस वर्षापूर्वी स्वप्न पडले होते त्या स्वप्नात आपण हेच रूप हीच मूर्ती

पाहिली होती. तीच मूर्ती आपल्यापुढे प्रगट झाली की काय ? हेच समजेना. मन भांबाऊन गेले. सारखे स्वप्नातला देव आणि आपल्या पुढे असलेले स्वामी हे दोन्ही एकच आहेत. असे सारखे वाटू लागले. हे कळून आल्यावर हाच आपला देव, हेच आपले स्वामी आणि हाच आपला परमेश्वर. समोरची मूर्ती आणि स्वप्नातील मूर्ती दोन्ही एकच असल्याची खात्री पटली आणि आनंदाला पारावार राहिला नाही आणि एकदम मनात आले की, आपल्याला इतक्या लहान वयात स्वामींनी स्वप्नात दर्शन दिले आणि इतके दिवस कोठे होते? पण आपल्याला दर्शन झाले याचा मनाला अतिशय आनद झाला आणि ऊर भरून आले. तीच मूर्ती, आता सारखी डोळ्यापुढे उभी आहे.

सदैव त्याचा आशीर्वाद लाभावा हीच त्याच्या चरणी विज्ञापना.



## ‘करूं नामाचा गजर’

**—श्रीमती अंबाबाई देशपांडे, बेळगाव**

**“स्वामींनी दिलेल्या सोऽहम् जपाचा आदेश काटेकोरपणे नियमितपणे व एकाग्रतेने करणे हीच खरी स्वामींची सेवा अशी माझी समजूत आहे.**

श्रीस्वामीचे प्रथम दर्शन पावस येथे १९६९ मध्ये झाले. दुसरे वर्षी १९७० मध्ये अनुग्रह मिळाला. “सोऽहम्” चा जप हा आदेश.

अनुग्रहानतर एकसारखे भजनाचे भास व हल्ली तालाचे आवाज येतात. श्रीस्वामी समाधिस्थ होण्यापूर्वी स्वप्न पडले. स्वप्नात “उदारा जगताधारा” ही प्रार्थना मी माझ्याच तद्रीत म्हणत होते. तेव्हा श्रीस्वामी माझ्या समोर बसलेले दिसले मला वाटले मी काही खास विशेष म्हणजे मूलभूत असे म्हणत नसून स्वामीनीच रचलेली सुदर प्रार्थना म्हणत होते. स्वप्न सपले. जाग आली समाधिस्थ होण्यापूर्वी दर्शनाची इच्छा असूनही काही प्रापंचिक अडचणीमुळे अथवा प्रकृतीमुळे झेपले नाही म्हणून स्वामीनी दर्शन दिले अशी धारणा आहे.

स्वामीनी दिलेला “सोऽहम्” च्या जपाचा आदेश अत्यंत काटेकोरपणे नियमित व एकाग्रतेने करीत आहेच. हीच स्वामीची सेवा अशी समजूत आहे हा जप हीच एक साधना असावी. ही साधना मनासारखी व्हावी असे वारंवार वाटते. व मन.शाति, समाधान मिळावे. गुरूचे वारवार मार्गदर्शन होऊन आध्यात्मिक प्रगती व्हावी हीच गुरुचरणी प्रार्थना. परमपूज्य स्वामीची तीनचार पत्रे आहेत त्यातील काव्यपर उपदेश उद्धृत केले आहेत. दिनाक १५।९।७० च्या पत्रात स्वामीजी म्हणतात— नाभीपासूनी ब्रह्मरध्रात। ‘सोऽहम्’ ध्वनि असे खेळत, ।। तेथे साक्षेपे देऊनी चित्त ।। राहावे निबात घडिघडि ।। दिनाक २५।६।१९७१ चा उपदेश म्हणजे “करू नामाचा गजर। सुखे होऊ भव-पार” दिनाक १।८।७२ च्या पत्रातील मौक्तिके :—

।। स्वामी म्हणे मना आत्म-सुखी गोडी। लावितां आवडी स्थिरावेल ।।”



# श्री स्वामींच्या सत्संगांत सुगंधाची सोबत

**– श्री. एन्. एन्. जाधव, पुणे.**

**श्रीस्वामींच्या खोलीत दरवळणाऱ्या सुगंधाने माझे मन आकर्षून घेतले हा सुगंध कुठपर्यंत येणार होता समजत नव्हते.**

मी १९६२–६३–६४ चे कालावधीत रत्नागिरीचे परिसरात काम करीत होतो. त्या कालावधीत गांवखडी मुक्कामी माझा दहा दिवस हगामी मुक्काम असलेने कार्यालयीन कामासाठी गावखडीला पावस गावावरूनच जावे लागे. परतु दुर्दैव माझे की त्यावेळी माझी व स्वामीची भेट होऊ शकली नाही नी त्याचे दर्शनाचा लाभ घेता आला नाही.

रत्नागिरीहून अलिबाग, गर्डहिग्लज, फलटणची सफर करून पुन: माझी नियुक्ति वेगुर्ले मुक्कामी १९७० चे ऑक्टोबर महिन्यात झाली नी वेगुर्ला येथील कार्यालय बदलून रत्नागिरीला आल्याने पुन: रत्नागिरीचे परिसरात १९७२ चे मार्चच्या १७ तारखेला येण्याची सधी लाभली.

तत्पूर्वी माझे मित्र श्री. मुधोळकर यानी स्वामीचे बाबतीत बरेच काही सागितले असल्याने त्याना केव्हा एकदा डोळ्याने पाहीन असे झाले होते दिनांक १७।३।७२ ला कामाचा चार्ज घेतला, १८।४ ला कार्यालयीन काम केले नी लाभलेल्या पहिल्याच रविवारी दिनाक १९।४।७२ ला पावसला रवाना झालो.

स्वामीची प्रकृती बरी नसल्याने व स्वामीना त्रास होऊं नये म्हणून त्याचे दर्शन बाहेरून घ्यावे लागे. नेहमीच्या रिवाजानुसार स्वामीचे दर्शनाचा लाभ बाहेरूनच घ्यावा लागल्याने मन जरा विषण्ण झाले. म्हणून स्वामीचे एका सेवकाला आर्जवून सांगितले की मी पुण्याहून बदलून येथे आलो आहे. स्वामीना जवळून भेटण्याची इच्छा आहे. माझा मानस आपण स्वामीना कळवावा. त्यांची अनुज्ञा असेल तर विचारा. त्यांनी मला जरा बसायला सागितले. माझे नाव विचारून घेतले नी गेले.

दहाबारा मिनिटाचे अंतराने स्वामीनी मला बोलावले असल्याचे कळले. मन अत्यत उल्हसित झाले. आल्याचे सार्थक झालेसे वाटून मी त्याचे खोलीकडे रवाना

झालो. दृष्टादृष्ट होताच मी साष्टांग नमस्कार घातला. स्वामीना मनोमन अभिवादन करून त्याचे खोलीत प्रवेश केला. त्यांनी समोरच बाकावर बसण्यास खुणावले. मी बिचकतच त्यांचे समोरचे बाकावर बसलो. त्यांनी सेवकाला प्रसाद घेण्यास सागितले.

स्वामीची प्रकृति त्यावेळी बरी नव्हती. आवाज क्षीण झालेला होता. प्रकृति अस्वास्थ्यामुळे ते बोलणे टाळत असत परंतु भाग्य माझे की त्यानी माझे कुशल व थोडी चौकशी अत्यंत क्षीण झालेल्या आवाजात केली. "श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी सार" प्रसाद दिला नी नाजुक स्मित करून आशीर्वाद दिला. मी एवढा वेळपर्यंत त्याचे खोलीत बसून निश्चित मनाने एक एक गोष्टीचा वेध घेत होतो. त्यावेळी त्याचे खोलीत दरवळणाऱ्या अगरबत्तीच्या सुगधाने माझे मन आकर्षून घेतले. मी थोडा स्तब्ध नी एकाग्र झालो, प्रसाद घेऊन बाहेर आलो.

मन मात्र आतच राहिले कारण आत जाणवणारा अगरबत्तीचा सुवास मी बाहेर आलो तरी दूर होईना. दुपारचे जेवण उरकले नी स्वयपाकघराचे शेजारचे दालनात विश्रातीसाठी बसलो तरी तो सुगध नाकातून हालेना. भेटलेल्या साधकवृन्दात गप्पा मारून जाण्याची वेळ झाली तरी माझ्या भोवती त्या अगरबत्तीचा सुगध दरवळत होता. मी त्याच क्षणी स्वामीचेकडे जास्त आकर्षिलो गेलो नी हा सुगध माझी सोबत कोठपर्यंत करणार आहे हे पाहण्याचे ठरविले

वाटले होते स्वामीचा आश्रम सोडताच तो दूर होईल, पण छे, एस टी गाडीत बसलो तरी तो माझी पाठ सोडीना. मला थोडे आश्चर्य वाटले नी स्वामीची पूर्ण कृपा पहिल्या भेटीतच अनुभवाला आल्याचे समाधानही झाले. त्या सुगधाने माझी सोबत गाडीतून भाटयात उतरेपर्यंत केली. एस. टी. गाडीतून उतरून मी जमिनीवरून समुद्रातील पडावात पाय ठेवताच तो सुगंध सपला. स्वामीच्या स्वामित्वाचा परिसर भाटयापर्यंत आहे. हे त्या सुगधाने सूचित केले.

● ● ●

# सद्गुरूसेवेचा मंगल योग

– सौ. स्नेहलता मोरेश्वर फडके, कोल्हापूर

**आपल्याला कोणत्याही ग्रंथाचे ज्ञान नाही किंवा काही विचारले तर सांगता येणार नाही. तेव्हा आपण अनुग्रह मागावा की नाही ? असे आंदोलन मनात सारखे चालले होते. आणि....**

• १९७० सालचा नोव्हेंबर महिना दिवाळीच्या आधी दोन दिवस मी सौ. यमुताई कुलकर्णी याचे बरोबर पावसला गेले. त्यावेळी जाताना एका सत्पुरुषाचे दर्शन घ्यावे व आशीर्वाद मिळावा एवढ्याच इच्छेने गेले आम्ही नेहमीच इथून सहाच्या सकाळच्या गाडीने निघतो त्या प्रमाणे निघालो व दुपारी १ ला पोहोचलो लगेच तीनला प्रथमदर्शन झाले त्यावेळचे ते प्रसन्न हास्य व प्रेमळ नजर आठवली की अजून डोळे, मन हृदय भरून येते. त्यावेळी सौ यमुताईना अनुग्रह मिळाला आणि माझे मात्र एकसारखे डोळे भरून येत होते असे का होते ते कळत नव्हते दुसरे दिवशी सकाळी ८ वाजता दर्शन घेऊन निघायचे अस ठरवले होते सौ. यमुताईचा आनद बघून मला पण वाटायला लागले की असा आनद आपल्याला केव्हा होईल ? आणि होईल का ? कारण आपल्याला कोणत्याही ग्रथाचे ज्ञान नाही किवा विचारले तर काही सागता येणार नाही आणि सागितले तरी करता येणार नाही तेव्हा आपण अनुग्रह मागावा का नाही ? असे एकसारखे मनात आदोलन चालू होते आणि सकाळी ८ ला नमस्काराला जायचे म्हणून बाहेरच्या सोप्यात बसलो होतो. तेव्हा माझ्या मनात असे आले की, आपल्याला बाकी काही नको आपल्याला त्याचा आशीर्वाद असला की झाले आणि काय आश्चर्य ! प्रकृती ठीक नसतानासुद्धा सपूर्ण वाक्यही बोलण शक्य नव्हते तरी पण मला जेव्हा आत बोलावल तेव्हा स्वामी उठून बसले होते व मी गादीवर डोके ठेवल्याबरोबर मला ऐकू येईल एवढ्या मोठ्या आवाजात 'माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे ह' असे म्हणाले आणि मला इतका आनंद झाला की काही केल्या भावना आवरेनात गुरु माऊलीचे ते शब्द, शब्द नसून प्रत्येक शब्दातून इतकी माया ओसंडत होती की अगदी लहानपणी, कळत नसताना आईने जवळ घेऊन कुरवाळून जस समजावल असेल आणि आपण शांत झालो असू तसेच अगदी तसेच प्रत्येक

शब्दात इतके सामर्थ्य होते की मला जवळ घेऊन पाठीवरून हात फिरवून अत्यंत कोमलपणाने व प्रेमळपणाने सांगितले– आणि मी अतिशय शांत व आनंदी झाले.

१९७२ चा जून महिना, जूनची ४ तारीख, मी माझ्या दोघा मुलांना घेऊन पांवसला गेले. बरोबर आणखी सुरेखाच्या दोघी मैत्रिणी होत्या. त्यावेळी सिद्धचरित्र नुकतेच प्रसिद्ध झाले होते ते तिथे वाचून यावे असे मी जातेवेळी ठरवले होते. नेहमी-प्रमाणे दुपारी १ ला पोहोचलो. प्रथमदर्शन ४ वाजता झाले आणि मी माऊलीना विचारल की इथे तीन दिवस राहून सिद्धचरित्र वाचू का ? ते दिवस पावसाळयाचे असल्यामुळे खाडीतून जाताना त्रास होईल तरी आपली इच्छा असेल तर त्रास होणार नाही असे मी सागितले. दुसरे दिवशी सकाळी दर्शनाला गेले तेव्हा परत विचारले, तेव्हा तीन दिवसात वाचणार म्हणजे चार तास बसाव लागेल, मी बसेन म्हटल्यावर बरे, म्हणाले आणि ८।। वाजता आत बोलावून सिद्धचरित्राची पोथी दिली. मला विचारल की, कुठे बसणार ? मी सागितले देसायाच्या देवघरात बसून वाचीन. तर चालेल म्हणाले व मी तिथे बसून पोथी वाचली.

पूर्वी मला असं नेहमी वाटायचे की आपल्याला स्वामीची काही तरी सेवा करायला मिळावी म्हणून मी एकदा त्याची वृद्ध सेविका भागिरथीला विचारलेसुद्धा होते की मी कपबशी धुवून आणू का तर ती नको म्हणाली, आणि सागितले की, स्वामीना कुणी दुसऱ्याने केलेले आवडत नाही पण माझी तशी इच्छा होती. म्हणून मला तिथे सिद्ध-चरित्र वाचायला ठेऊन घेतले. तेव्हा माझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या– त्यावेळी आश्रमात दुसऱ्या कोणी स्त्रिया नव्हत्या व इकडे आत्याबाई एकटच्या होत्या म्हणून त्यानी मला इकडे राहायला बोलावले आणि म्हणाल्या, " तुमच्या वाचनाची वेळ सोडून उरलेल्या वेळात मला मदत करा " मी आनदाने इकडे आले आणि मला सर्व तऱ्हेने स्वामीची सेवा करायला मिळाली. तेव्हा गणपति पुळयाजवळ लक्ष्मी नारायणाचे स्थान आहे. तिथून पाणी येत असे ते पिण्याकरिता गाळून बाटल्या भरून ठेवणे, ताट वाढून आत नेऊन देणे वगैरे सर्व बारीक सारीक सेवा करायला मिळाली आणि उरलेला मऊ भात रोज मला मिळत असे. ते चार पाच दिवस अतिशयच आनदात गेले की हे सपूच नयेत असे वाटत होते.



# सोऽहं मंत्र—महौषधि

— श्री. दीनानाथ शंकर वायकूळ, कोल्हापूर

**पोटदुखी आणि अल्सर यांनी भयंकर आजारी होतो. स्वामींचे पत्र आले. त्यानंतर सर्व औषधे बंद करून "सोऽहम्" मंत्राचा ध्यास घेतला. हळूहळू प्रकृती बरी झाली. दोन महिन्यात पूर्ण बरा झालो.**

अठरा वर्षापूर्वी पावस, जिल्हा—रत्नागिरी येथे माझे मेव्हणे श्रीदत्तात्रय भिगार्डे याचेकडे गेलो ता १२ जून १९५७ हा दिवस अचानक मुबईचे माझे मित्र पाडुरंग हरि लाड सकाळी ११ वाजता आले. अचानक येण्याचे कारण विचारले. ते म्हणाले, 'तुम्ही इकडे आल्याचे पत्र आले. लागलीच श्रीस्वामीचे दर्शन घ्यायचे म्हणून आलो. त्यांनी स्वामीची माहिती सागितली. आणि आश्चर्याचा धक्काच बसला. तसा मी १९४२ पासून प्रतिवर्षी पावसेस दहा-पधरा दिवस येऊन राहात असे. पण असे कोणी थोर-तपस्वी, थोर साधक, थोर योगी, व्यक्ति इथे आहे हे कोणी मला सागितले नव्हते आणि कोणी बोलताना ऐकलेही नव्हते आणि सध्याकाळी चार वाजता मेव्हण्याना बरोबर घेऊन श्री. देसाई याच्या घरी गेलो महाराजाच्या खोलीत प्रवेश केला आणि स्मित हास्याने हात जोडून आमच स्वागत केल गेल. आमचेही हात जोडले गेले. पाया-वर मस्तक ठेऊन सर्वानी दर्शन घेतले जवळच असलेल्या बाकावर बसायला सागितले आम्ही बसलो. मृदु, कोमल, हळूवार, प्रेमळ शब्दांनी आमची चौकशी केली. महाराजाची वाणी म्हणजे अमृत. महाराजानी मला प्रश्न केला, 'शिरडीला साईबाबाचे दर्शन घेऊन आला ना?' मी फक्त 'हो' म्हणालो. त्या तेज.पुज योगी पुरुषाच्या डोळ्यात पाहिल्यावर माझा मी हरवून गेलो. चमत्कार म्हणून नव्हे दैवी सामर्थ्याने. मी फेब्रुवारी १९५७ मध्येच शिरडीस जाऊन आलो होतो. विनम्रपणे महाराजाच्या पायावर मस्तक ठेऊन सजीवनी गाथा व खडीसाखर प्रसादभेट घेऊन एका महान योगी, संत, साधक, व्यक्तीच्या दर्शनाने आनदाने न्हालेल्या अवस्थेत घरी परत आलो.

१९५७ पासून १९७४ पर्यत प्रत्येक वर्षी मी श्रीस्वामी स्वरूपानद महाराजांच्या दर्शनास जात असे. महाराजाचा कृपानुग्रहही १९५९ साली मला लाभला. महाराजाच्या कडून सजीवनी गाथा, अभंग ज्ञानेश्वरी, श्रीगीता तत्त्वसार, अमृतधारा, वगैरे अकरा ग्रंथ 'प्रसादभेट' म्हणून लाभले आहेत. ता. १९–१२–१९७२ रोजी दत्तजयंती.

श्रीस्वामी स्वरूपानंद महाराजांच्या दर्शनास जाण्याचे ठरविले. माझे बरोबर श्री. व सौ. आचरेकर पाडुरंग खटावकर, हेहि होते. दुपारी १२ वाजता पावसेस पोचलो. श्री. दत्तात्रय भिगार्डे यांचेकडे भोजन व विश्रांती घेऊन महाराजांच्या दर्शनास श्री. देसाई याचे घरी सायंकाळी ५ वाजता गेलो. बाहेर बरेच लोक बसले होते. दर्शनाला आलेल्या लोकाना बराच वेळ थांबावे लागले होते. महाराजाची प्रकृति बरी नव्हती. बोलताना त्रास होत होता. एक एकजण जाऊन दर्शन घेऊन येत होता. इतक्यात महाराजाच्या सेवकाचे बाहेर येऊन विचारले " इथे वायकूळ कोण आहेत ?" मी उभा राहिलो. सेवक म्हणाले, 'चला'. दैवी शक्तीशिवाय हे होणे कठीण नाही. मी दर्शन घेतले. माझ्या कानात महाराज तीन शब्द बोलले, " माझा आशीर्वाद आहे." मी कृतार्थ झालो माझ्या जीवनाचे सार्थक झाले.

० ० ०

जुलै, ऑगस्ट, सप्टेबर १९५७ या काळात मी पोटदुखी व अल्सर याने भयकर आजारी होतो डॉक्टर, वैद्य याची औषधे झाली पण आराम वाटेना शेवटी ता. २।१०।५७ ला महाराजांना पत्र पाठविले, या यातनातून आता तुम्हीच मुक्त करा, म्हणून करुणा भाकली. आणि महाराजाचे तागलीच १६।१०।५७ ला पत्र आले. ते पत्र वाचले सर्व औषधे बद केली. आणि 'सोऽहम्' मत्राचा ध्यास घेतला हळूहळू तब्येतीला आराम पडला दोन महिन्यानी पूर्ण बरा झालो. तो आजतागायत औषध नाही. पथ्य नाही. औषध फक्त एक. मिळेल तेवढा वेळ 'सोऽहम्' मत्राचा जप. केवळ महाराजाचा कृपाप्रसाद !

● ● ●

# स्वरूपनाथांच्या दरबारांतील ‘ माझी गुरुगीता ’

– श्री. वि. शं. वष्ट, माधवपूर-वडगाव, बेळगाव

**—एका गुरुभक्ताकडून १००० रुपये पाठवून श्रीस्वामींनी माझा ग्रंथ पुरता प्रकाशात आणला.**

श्रीस्वामीच्या परपरेतील थोर अधिकारी पुरुष श्रीमत् सद्गुरु श्री. बापू महाराज यांच्या जीवनचरित्रावर ‘ श्रीगुरुगीता ’ लिहिलेला ग्रथ छापण्याचे मनामध्ये ठरविले आणि थोडी फार वर्गणी गोळा करू लागलो होतो. इतक्यात हा ग्रथ छापता छापता श्रीस्वामीना ‘ श्रीसद्गुरु-गीता ’ ग्रथाविषयी ध्यास लागला होता. श्रीगुरुभक्तिपरायण श्री. साने याचेकडून श्रीस्वामीनी ग्रथ मागवून घेतला, तो वाचून घेतला. त्या ग्रथात स्वामीजी पुढे म्हणतात,

**“ सद्रूप चिद्रूप आनंदरूप । तेंचि जाणीव आपुले स्वरूप ।**
**स्वरूपी भोगोनि सुख अमूप । राहावे सुखरूप होवोनिया ।। ”**

**“ श्रीगुरु-गीता ” अखंडाशीर्वाद । देतसे स्वामी स्वरूपानंद ।**
**स्मरोनियां एक अभेद । सद्गुरुपद अविनाश ।। ”**

**“ स्वये जगन्नाथ साधकाचा । हात धरोनिया नेटका चालवितो ।**
**स्वामी म्हणे झालो कृतार्थ जीवन । सद्गुरु चरण उपासितां ।।**

असे सविस्तर पत्र मला पाठवून दिले आणि श्रीगुरु गीता ग्रथ रजिस्टर पोस्टाने पाठविला होता.

ग्रथ पोहोचताच, स्वामीजीना मला भेटण्याची इच्छा होती की काय ? असे मला प्रेमभराने वाटू लागले. आनदाचा व श्रीगुरुभक्तीचा कल्लोळ मनामध्ये महासागराच्या पावसेच्या खाडीवरील लाटा उसळू लागल्या. त्या आनदाला नच पार. त्या आनदाचे वर्णन अवर्णनीय आहे.

स्वामीनी मला बोलावून घेतले, गुरूपदेश प्रथम दर्शनीच सागितला. स्वामीनी मला प्रेमभराने न्याहाळले आणि आशीर्वादाचा हात वर केला आणि स्वामी म्हणाले, “आपला ‘ श्रीगुरु-गीता ’ ग्रथ महाप्रासादिक आहे. माझ्या जीवनातील हीच घडलेली

सुवर्णमयी घटना आहे. खरोखरीच साक्षात्काराची प्रचीती मला ताबडतोब मिळाली! धन्य ते माझे भाग्य !

यानंतर स्वामींनी मला दोनतीन दिवस ठेऊन घेवून प्रसाद देवून कृतार्थ केले, आणि मी बेळगांवी आल्यावर स्वामीची तब्येत बरी नसतांना देखील अगदी क्षीण तब्येतीत मला श्रीस्वामीभक्ताकरवी १००० रुपये पाठवून हा ग्रंथ पूर्ण प्रकाशन करून दिला. माझे परमभाग्य माझ्या सारख्या अज्ञ बालकाकडून हा ग्रंथ करवून घेवून स्वामीनी मला पावन केले ! आणि मला स्वामीनी बोलावून दिलेले पहिलेच दिव्य दर्शन ! काय वर्णावा स्वामीचा महिमा! ....शब्दच अपुरे पडतात ! !

● ● ●

# सुखकर्ता दुःखहर्ता स्वामी समर्था !

– सौ. शोभना रानडे, पुणे

**" . . . . चारच दिवसात माझ्या नावे १०० रुपयांची मनीऑर्डर आली. स्वामींनी पैसे पाठवले होते. सोबतच्या पत्रात लिहिले होते, " दुःखामागून सुख । सुखामागून दुख " असे संसाराचे रहाटगाडगे चालूच रहाणार. आपण आपले मन शांत ठेवावे. " भक्ताच्या सांसारिक अडचणीत स्वामी कळकळीने सहाय्य करीत. अशीच ही एक हृदयंगम आठवण—**

मला स्वामीच्या दर्शनाची ओढ का लागली हे सांगण्यास थोडी आधीची माहितीही सागणे आवश्यक आहे. माझे पती स्वामी स्वरूपानदांचे अनुग्रहीत असल्यामुळे परस्पराशी स्वामीच्या सबधी बोलणे होत असे. मला स्वामीच्या भेटीची तळमळ लागली. त्यानतर ध्यानी, मनी, स्वप्नी, अखड स्वामीच्याच भेटीचा ध्यास लागलेला होता.

सहा महिन्यांनी तो योग आला. मी रत्नागिरीला व तेथून पुढे पांवसला जाऊन पोचले. उद्या दर्शन होणार या आनंदात मी होते. पण तेवढयात जो मुसळधार पाऊस सुरू झाला तो सात दिवस थाबलाच नाही. तेव्हा मात्र खरेच आपण कमनशिबी आहोत का? असे मनात आले. आठव्या दिवशी पाऊस थाबल्यावर मी माझ्या बरोबर आलेल्या मुलीस घेऊन निघाले. ती म्हणाली, "काकू, स्वामीना समोर नारळ ठेवलेला, नमस्कार केलेला, काही आवडत नाही. हे कशाला घेतलेस ?" तिने हे सारे लोकाकडून ऐकलेले. मी काहीच बोलले नाही.

त्यावेळी देसायाच्या घरी जाण्यास 'तर' लागत असे. किवा पाण्यातून जावे लागे. मी पाण्यातून जाणे पसंत केले व जाऊ लागले. आणि भोवऱ्यात अडकले. बरोबर आलेली मुलगी ओरडली, " काकू, तुम्ही भोवऱ्यात सापडलात. आता बाहेर कशा पडणार? मी हात देते " मी तिला म्हटले, " मी कुठे जात आहे ते तुला माहीत आहे का? स्वामी माझी सत्त्वपरीक्षा पहात आहेत. " असे म्हटल्याबरोबर मला चालावयाला वाट मिळून मी स्वामीच्या दर्शनाला गेले. भीतभीतच नारळ व उदबत्त्या ठेवल्या.

स्वामींनी खुणेने जवळ आणावयास सांगून त्यांचा ' स्वीकार केला आणि 'हे' कसे ठीक आहेत ना ?' असे विचारले. माझे समाधान झाले. ' पति हाच गुरु! स्त्रीला दुसरा गुरु नाही. " असे माझ्या हातावर खडीसाखर व 'श्री ज्ञानेश्वरी-नित्यपाठ' पुस्तक देऊन आशीर्वाद दिला.

तेव्हापासून स्वामीच्या फोटोपुढे हात जोडून उभे राहावे व त्यांचा आशीर्वाद मागावा असे चालले होते. दुसरा अनुभव बाळंतपणातून उठून आले त्यावेळचा! बाळंतीण होऊन घरी आले. त्यावेळेला मुलगी झाली, तीही गेली. शिवाय जवळ पैसाही नाही. सगळीकडे भकास वाटू लागले. तोच डोळ्यासमोर स्वामीची मूर्ती दिसली. फोटोसमोर उभी राहून सद्‌गदित कंठांने सागितले, " आता साभाळणारे तुम्हीच आहात. रक्षण करणारेही तुम्हीच आहात." त्यानंतर चार दिवसांनी १०० रुपयाची मनीऑर्डर आली. तेव्हा अवाक् होऊन मी पोस्टमनलाच विचारले की, 'मनीऑर्डर कोणाची ?' कारण मला कल्पना होती, आत्ता पैसे पाठवणारे कोणीही नाही. तेव्हा पोस्टमनने सांगितले, 'पांवसच्या स्वरूपानंद स्वामींनी पैसे पाठवलेले आहेत.' हे ऐकून माझे हृदय भरून आले. मागोमागच पत्रही मिळाले. पत्रात काय होते माहीत आहे ? ' " दुःखामागून सुख । सुखामागून दु.ख । असे संसाराचे रहाटगाडगे चालूच रहाणार. आपण आपले मन शात ठेवावे" आणि पत्र वाचून खरोखर मन शात झाले.

आमच्या वाड्यात बकुळीचे झाड होते व स्वामींना बकुळीची फुले फार आवडत. म्हणून नेहमीप्रमाणे मी गुरुवार १५ ऑगस्टला ह्या दिवशी फोटोला फुले वाहिली आणि नमस्कार करून वर पहाते तो सर्व फुले खाली पडलेली! मला फार वाईट वाटले व असे का झाले, असे वाटू लागून डोळ्यातून पाणी आले. थोड्याच वेळाने ९।–९॥ च्या सुमारास स्वामींनी देह ठेवल्याचे समजले.

जशी आई मुलाला खाचखळगे असेल तर बोटाला धरून सरळ रस्त्याने नेते, तसेच गुरूमाऊली आपल्या लेकरानी हाक मारली की ओ देऊन मार्ग दाखवण्यास सदैव तयार असते अशी माझी खात्री आहे. स्वामींच्या बद्दल कितीही लिहिले तरी थोडेच आहे.

● ● ●

## संतांचा महिमा स्थलकालातीत

– श्री. विनायक गोपाळ पागे, कोल्हापूर

**"श्रीस्वामींच्या स्मृती असंख्य स्वरूपभक्तांच्या मनात दाटून येतात. कांहींना वार्धक्याने, आजाराने तर लेखनशैली नसल्याने त्या स्मृतींचे शब्दांकन होत नाही. स्वामीभक्त श्री. पागे यांनी अनेक इतर बंधु-भगिनींचे अनुभव संकलित करून आपली स्वामीप्रीती दाखवली आहे."**

.. श्रीस्वामी स्वरूपानंदांच्या संदर्भात कोल्हापूर येथील ब्रह्मेश्वर बागेत राहणाऱ्या एक वयोवृद्ध तपोवृद्ध सांप्रदायिक परमपूज्य श्री. आजीबाई म्हणजे श्री. सावित्रीबाई कुलकर्णी याचेकडून जी थोडीबहुत माहिती मिळाली ती पुढीलप्रमाणे :—

श्रीस्वामीचे नाव सुमारे सहासात वर्षांपूर्वी ऐकले. त्यापूर्वीच आमचेकडे विजापूरचे श्रीसद्गुरु रामचन्द्रमहाराज तिकोटेकर यांची एक दुर्मिळ प्रतिमा व सेवेसाठी त्यांच्या काष्ठ पादुका त्याचे अंगावरील शालीचा तुकडा इत्यादीमुळे व विजापूरचे सद्गुरु रघुनाथमहाराज यांचे मार्गदर्शनाखाली साधना सुरू होतीच. उत्कट भक्तिप्रेमाचे अनुभवहि अधूनमधून प्रत्यही येत व येतात.

रामभाऊ, मुलगा स्वामीचे प्रथमच दर्शन घेऊन रत्नागिरीहून आल्यानतर त्याना आपणही भेटावे असे वाटू लागले. परंतु पाय अधू झाल्याने वृद्धापकाळी अशक्तपणामुळे प्रत्यक्ष भेट कधीच होऊ शकली नाही. चारपाच वर्षापूर्वीचा अनुभव म्हणजे सकाळी ५-५।। चे सुमारास त्यांचे अतर्मनात श्रीरामचन्द्र महाराज म्हणतात की, "ते बघ गोडबोले! तुला पहायचे होते ना? ते आलेत पहा!" आणि वर नजर करून पहातां गांधी वेषांत कपाळावर तिलक, डोळ्याला महात्मा गांधीप्रमाणे चष्मा लावलेला, तेज:पुज, गोरापान, असा चेहरा बराच वेळ उघडचा डोळचांना दिसला व शेवटी 'हेच स्वरूपानंद' असे कानी ऐकू आले. व दृश्य अंतर्धान पावलें.

दुसरा अनुभव दोनतीन वर्षांमागे कोल्हापूर येथे श्रीजामसडेकरांचेकडे गुरू-पौर्णिमा उत्सव मोठ्या भक्तिभावाने साजरा झाला. त्याचे वृत्त नंतर चारआठदिवसातच श्री. रामभाऊ पांवसेला श्रीस्वामीच्या दर्शनासाठी गेले त्यावेळी श्री. आजी श्रीस्वामीचे मोठ्या तैलचित्राचे समोरच खांबाशी टेकून बसल्या होत्या व दुपारचे आरतीचे

वेळेस ध्यानमग्न असतां स्वामींचे सूक्ष्मरूपाने त्या स्थानी झालेले प्रत्यक्षागमन त्यांना जाणवले होते व तसे त्यांनी बोलूनही दाखविले होते. श्रीस्वामींना उत्सवातील फोटो वगैरे दाखविण्यास नेल्या वेळी त्यात आजीचा फोटो प्रथमच स्वामीनी पाहिला व 'याच आजी, यांना मी पाहिले, उत्सवांत खांबाशी टेकून त्या बसल्या होत्या ना ?' असा प्रश्न श्रीस्वामींनी रामभाऊंना विचारला तेव्हा ते आश्चर्यचकित झाले होते.

श्रीस्वामींनी १५ ऑगस्टचे दिवशी समाधी घेतली. त्या दिवशी पहाटेचे वेळी आजींना जो दृष्टांत झाला, त्यात त्यांना भिंतीवर तीन व्यक्ति बसलेल्या दिसल्या त्यात श्रीज्ञानेश्वरमहाराज तेजस्वी पुष्पमालांनी मंडित, भरजरी वेषांत असून मुक्ताई, सोपानदेव बसले असून 'श्रीनिवृत्तिनाथांना घेऊन' येण्यासाठी आम्ही चाललो आहो.' असे मुक्ताई बोलल्याचे कानी आले. त्याचा अर्थ दुपारी जेव्हा स्वामीचे महानिर्वाण झाल्याचे वृत्त फोनद्वारा कळले, तेव्हा लागला !

दोनतीन साधकाना श्रीस्वामीनी स्वतः मार्गदर्शन न करता त्यांच्या शंका, तुम्ही कोल्हापुरात जाता तेव्हा आजीना भेटावे असा मनोदय व्यक्त करून त्यांचे भेटी मधून त्याचे साधकाचे समाधान झाल्याचे सांगितले.

कोल्हापुरातील दुसरे एक ज्येष्ठ वयोवृद्ध पुण्यपुरुष श्री. शिवरामशास्त्री कोडोलीकर हेही श्रीरामचन्द्रमहाराजाचे निस्सीम गुरुभक्त आहेत. त्याच्या लहानपणीच श्री. गुडाक्कामहाराज (श्री. तिकोटेकर रामचन्द्र महाराजाच्या कन्या) यांचेकडून गुरूपदेश मिळालेला आहे व ४० वर्षे पर्यंत ते श्रीरामचन्द्र महाराजाचा समाधीउत्सव कऱ्हाड जवळ कडेगाव या गावी मनोभावे साजरा करीत आले आहेत. तसेच कोल्हापुरातही श्री. आजीचे घरी हा उत्सव प्रतिवर्षी चैत्र वद्य षष्ठीला होत असतो. त्याचा गुरुभक्ताना मोठा प्रेमसोहळ्याचा लाभ होत असतो. श्रीशिवराम शास्त्री हे येथील श्रीरामचन्द्र महाराजांच्या परम योगिनी शिष्या श्रीमती गोदूताई कीर्तने यांनी स्थापन केलेल्या आनंदभुवन या गुरुस्थानाला बरेच वर्षापूर्वी आपल्या लहानग्या भाच्यास बरोबर घेऊन गेलेले असता तिथे श्रीरामचद्रमहाराजाचे एक भव्य तैलचित्र आहे ते पाहून ' हे महाराजांचे चित्र आहे काय ? असा प्रश्न केला असता 'होय' म्हणाले. त्याच रात्री त्यांना दृष्टान्त झाला व ' मला चित्र म्हणतोस काय ? मी साक्षात् परब्रह्म आहे.' असे ऐकू आले. त्यावर त्यानी मनोमन क्षमा मागून पुन्हा चित्र म्हणून सबोधणार नाही. अशी कबुली दिल्याचा अनुभव मोठ्या भावपूर्ण शब्दात सांगितला. तसेच श्रीसिद्धचरित्राची स्वहस्ते लिहिलेली प्रत ते छापून प्रकाशित होण्याचे मार्गावर असतांना श्रीस्वामीनी पाहून सतोष व्यक्त करून श्रीअभंग ज्ञानेश्वरी प्रत सप्रेम भेट म्हणून त्यांना दिल्याचे सांगितले. श्रीस्वामीनी समाधी जेथे घेतली ती जागा त्यांना स्वप्न दृष्टान्तात प्रत्यक्ष दाखविल्याचेही त्यांनी सांगितले. ही घटना श्रीस्वामींचे महानिर्वाणाचे आदलेच दिवशी त्यांचे अनुभवास आली.

श्रीआजींचेकडे नित्य दर्शनास व अध्यात्मिक मार्गदर्शन लाभलेल्या एका गृहस्थाश्रमी साधिका सौ. सिधूताई पुरुषोत्तम हेबाळकर त्यांचेही अनुभव उद्‌बोधक आहेत· यांचे आजेसासूचे घराण्यात श्रीदत्तात्रेय व श्रीपांडुरंगाची उपासना पुष्कळ झालेली आहे. शिवाय श्रीक्षेत्र मुरगोड (कर्नाटक) येथील सिद्ध सत्पुरुष श्री. चिदंबर दीक्षित याचीही उपासनाभक्ति माहेरचे घराण्यास लाभलेली आहे. दृष्टांताद्वारे सत्पुरुषांचे दर्शन, शिवपिडीचे दर्शन, सिद्धांचे आशीर्वाद, प्रकाशदर्शन इत्यादि अनुभव येऊन गेले असून मनाला अंतर्मुख अधिकाधिक होण्याकडेच उपकारक होत असतात. सद्‌गुरु कोणास करावे ? मत्र कोणत्या देवतेचा घ्यावा? अशा संभ्रमात असताना श्री. तिकोटेकर महाराजाचे परपरेतील श्रीरघुनाथ महाराज याचे समक्ष दर्शन व श्रीस्वामीचे प्रत्यक्ष मार्गदर्शन कसे लाभले हेही उद्‌बोधक वाटते. त्या लिहितात ' ऑक्टोबर १९७२ मध्ये बेळगांवहून आई कोल्हापुरास आली होती. चार दिवसाहून जास्त सवड तिला नव्हती श्रीस्वामीचे भेटीसाठी पावसला जावे, असा विचार आला. पण सोबत कुणाची मिळेना. मनी उत्सुकता फार वाढली. पहाटेस स्वप्नात श्रीस्वामीचे हस्ताक्षरांतील पत्र वाचले. 'उदयीक यावे' – सही– "रामभाऊ गोडबोले" – सकाळी अचानक श्रीमती आजींचा मुलगा रामभाऊ कुलकर्णी आमचेकडे आला व रजा घेऊन सोबती पावसेस जाण्याचे ठरले. रत्नागिरीस तीन चे दुपारचे गाडीने कांहीही त्रास न होता रात्रीस पोहोचलो. श्री. लिमये (श्रीस्वामीचे एक अनुग्रहित) यांचेकडे मुक्काम होता. रात्रभर झोप लागली नाही. ध्यास भासमय अनुसंधान सुरू झाले. व आसन कसे घालावे, अभ्यास कसा करावा इत्यादि श्रीस्वामी शिकवत होते. सकाळी ९ वाजता श्रीक्षेत्र पांवसला पोहोचलो. ११ वाजता दर्शनाला यावे असा श्रीस्वामीचा निरोप आला. भेटीस जाताना असा विचार केला की आपण योग्य मार्गावर आहो की नाही हे त्यांच्याकडूनच समजून घ्यावे. स्वतः कांही एक विचारणार नाही.

खोलीत दर्शन घेऊन बसल्यावर माझ्या आईने एक प्रश्न विचारला. त्यावर श्रीस्वामी माझ्याकडे बोट करून "यांना विचारा" या सांगतील," असे म्हणाले, मी म्हणाले, "मला काय येते, आपणच समजाऊन द्यावे." यावर श्रीस्वामीनी दहा वेळां तरी "सोऽहम्" धारणेचा अभ्यास करून दाखविला. माझे पूर्ण समाधान झाले.

स्वामींच्या जन्मोत्सवास जावेसे फार वाटत होते. पण दरवर्षी काही ना काही अडचणी असायच्याच. ७३ साली सर्व तयारी करून ठेवली पण ऐन वेळी मुलीचा पाय सायकलीत अडकल्यामुळे दुखापत होऊन जाण्याचे रद्द होऊन मनाचा फार विरस झाला. जन्मोत्सवाचे दिवशीच पहाटे स्वप्नात पाहिले की, पावसच्या उत्सवात प्रसादास मोठमोठ्या पंक्ती बसलेल्या आहेत; पलिकडे श्रीस्वामीही पानावर बसलेत; वाढत वाढत त्यांचे पानापाशी आले, त्यांना भात वाढला तेव्हा त्यांचे पानापाशी सभोवती सातआठ मुले जेवायला बसलेली आहेत. श्रीस्वामी त्यांना घास भरवीत आहेत.

श्रीस्वामींनी समाधी घेतल्या दिवशीं मला बातमी कळली नाही. तरीही त्याच दिवशी पहाटे दृष्टांत झाला की श्रीस्वामी घरी आलेले आहेत व आशीर्वाद देत आहेत. योगायोगाने श्री आजींच्या सल्ल्याप्रमाणे श्रीरघुनाथमहाराज पागे (श्री. तिकोटेकर) यांचा अनुग्रह परंपरागत पद्धतीनुसार यापूर्वी घेतला होता. त्याप्रमाणे वाटचाल सुरू आहे. प्रपंचात राहून सुद्धा चितन, मनन, वाचन आदि करून यथाशक्ति करवून घेत आहेत. नाना प्रकारे प्रापंचिक शारीरिक अडचणी, क्लेश याचे निवारण श्रीगुरुकृपेने होत आहे असे अनुभवास येऊन त्यांचे केवढे मोठे उपकार आपणा सर्वांवर आहेत ? हे आठवून कृतज्ञता वाटते--

स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवन । सद्‌गुरु चरण उपासिता ।।



# एका मालाकाराची सुमनांजलि

—श्री. शामराव उपळेकर, कोल्हापूर

**मी एक सेवेकरी भक्त असून कोणाचा अनुग्रह घेतलेला नाही. श्री-स्वामींची निरपेक्ष सेवाच मला आवडते. स्वामींनी आपल्या दरबाराची सजावटीची सेवा माझ्याकडे दिली आहे. मीही त्याप्रमाणे करण्याचा निर्धार केला आहे.**

मी ता. १३-१२-७२ रोजी जन्मोत्सवास स्वत:चे खर्चाने माझे संपूर्ण डेकोरेशन घेऊन गेलो. त्यावेळी पांवसमधील एका भक्ताने लाकडी स्टॅंडचा पाळणा भेट म्हणून दिला होता. त्याला मी डेकोरेशन करणार होतो. पण ज्या भक्ताने तो पाळणा दिला होता. त्याने खऱ्या फुलाचे डेकोरेशन करण्याचे ठरविलेले मला समजले. तेव्हा मी त्याना आनदाने सागितले की आपण डेकोरेशन केले तरी मला चालेल. शेवटी त्यानीच खऱ्या फुलाचे पदर आणून माझ्या पुढे ठेवले. आणि मलाच ते डेकोरेशन पुरे करण्यास सागितले. ते मी अगदी मन लावून केले. त्याच वेळी मी सपूर्ण पाळण्याची मापे घेऊन आलो होतो. त्याच वेळी मी श्री. भाऊसाहेब याना सागून आलो होतो की पुढील वर्षी मी संपूर्ण पाळण्याचे डेकोरेशन घेऊन येणार आहे.

तेथून मी इकडे आल्यावर गुरुपौर्णिमेला काम चालू केले.

यंदाचे वर्षी नवीन काही तरी करावे याचा मी संकल्प केला होता. त्याप्रमाणे थर्मोकोलचे डेकोरेशन करण्याचे योजिले. त्याप्रमाणे कामासही सुरुवात केली. प्रथम श्री. क. दा. राऊत पेटर याच्याकडे जाऊन त्यांना माझ्या डेकोरेशनची सर्व रूपरेषा सागितली. त्यानीही या कामात मला मदत करण्याची इच्छा दर्शविली. त्याप्रमाणे आम्ही दोघांनी या कामास सुरुवात केली. हे काम निम्मे अधिक तयार झाले, पण आणखी पैशाची अडचण आली. पण या गोष्टीकडे कोणीही लक्ष देण्यास तयार नव्हता. तेव्हा मी हा सर्व भार सद्‌गुरु याच्यावर टाकला की, ज्याचे काम मी करीत आहे त्यांनीच याची तजवीज करावी असे एका जवळ म्हणालो. आणि मी घरी आलो तेव्हा एक इसम लग्नाच्या डेकोरेशनची ऑर्डर घेऊन आला होता असे मला समजले. तेव्हा मी लगेच त्याचेकडे जाऊन काम पक्के करून घरी आलो. तोपर्यंत दुसरा इसम मागील कामाचे पैसे घेऊन आला होता. वरील डेकोरेशनचे काम सायंकाळी पूर्ण करून मी घरी आलो.

बाहेर बाजारात जाऊन काही तरी खरेदी करण्यास म्हणून बाहेर पडलो. तेवढ्यात श्री. श तराम जामसांडेकर वाटेत भेटले आणि श्री. सदानंद नार्वेकर यांच्याकडून आलेले एक पत्र त्यांनी माझ्याकडे दिले. ते तसेच मी खिशात ठेवले व पुढील कामास निघून गेलो. हा दिवस बुधवार तारीख २०-६-७३ होता. दुसरे दिवशी म्हणजे गुरुवारी सकाळी ९ वाजता श्रीदत्त व श्रीसाईबाबा यांचे फोटो समोर हे पाकीट ठेऊन लगेच ते पाकीट उघडले. तेव्हा त्यात १५० रुपये व पत्र होते. यालाच म्हणतात गुरुकृपा! बाकीचे काम पूर्ण झाले.

नतर दिवाळीच्या कामास सुरूवात केली. ते काम पूर्ण होताच श्रीमंत स्वामीच्या पाळण्याचे डेकोरेशनचे डिझाईन काढून घेऊन ते करण्यास सुरुवात केली. ते एक महिन्यात पूर्ण केले. नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत श्रीमंत स्वामी यांच्या जन्मोत्सवाचे डेकोरेशन करण्याबद्दल सेवा मंडळाकडून पत्र आले. त्याचे उत्तर म्हणून मी उत्सवाचे आधी दोन दिवस येत आहे असे कळविले. हे काम सेवाभावाने करण्याचे होते.

त्याप्रमाणे मी सर्व डेकोरेशन घेऊन शुक्रवार ता. १३-१२-७३ रोजी सकाळी सहाचे गाडीने निघून दुपारी अडीच वाजता पावसला पोहोचलो. परतु भाटे ते पावस या आठ मैलाच्या मध्यावर डेकोरेशनची एक करंडी मोटारीवरून उडून वाटेत पडली. त्यात सर्व नवीन केलेले डेकोरेशन होते. हे मला पांवसच्या स्टँडवर आल्यावर समजले. लगेच ड्रायव्हर व कडक्टर याना ही गोष्ट सागितली. त्याना असे सांगितले की, वाटेत करंडी जर मिळाली तर परत जाताना पाहून मला ती येथील स्टँडवर अगर श्रीस्वामी यांचे घरी कळविणे व तेथून मी आश्रमात आलो तेथे लोक जेवण्यास बसले होते. मी आघोळ केली. नतर मी व श्री. जायदे जेवणास बसलो. जेवण झाल्यावर थोडीशी विश्रांति घेतली व चहाकॉफी झाल्यावर श्रीस्वामी याचे दर्शनास गेलो. दर्शन घेऊन बाहेर आल्यानतर बाहेरच्या भक्त मडळीना झालेला सर्व प्रकार सांगितला. त्यांना या गोष्टीबद्दल चिता वाटली. पण मला त्याची चिता वाटली नाही. कारण रस्त्यांत पडलेली वस्तू परत मिळणे अत्यंत कठीण होते. त्यामुळे मी त्याचा जास्त विचार केला नाही. लगेच श्री. देसाई बधूनी ताबडतोब एक इसम सायकलवरून पाठवून दिला. तो सायकाळी परत आला व करंडीचा काहीच पत्ता लागला नाही. सायंकाळी मी बाकीच्या डेकोरेशनच्या करंड्या व सामान घेऊन उत्सवाचे घरी घेऊन गेलो. व तेथेच मुक्काम केला. दुसरे दिवशी दुपारी जेवण झाल्यावर डेकोरेशन मंडपात लावणेस सुरुवात केली. रात्री आठ वाजता सर्व काम संपले. दुसरे दिवशी रविवारी सकाळी ७ वाजता वाचनाचा सप्ताह चालू होणार होता. म्हणून आम्ही सर्व मंडळी पहाटे चार वाजता सर्व प्रार्तविधी आटोपून तेथील मंडप झाडून स्वच्छ केला व तेथे सर्व बैठकी घालून सुसज्ज केला. वाचणारी सर्व मंडळी साडेसहा वाजता तेथे हजर झाली होती. सात वाजता सप्ताह चालू झाला.

सायंकाळी चार वाजता सप्त्याचे पहिल्या दिवसाचे वाचन संपले. चहापान झाले व आम्ही सर्व मंडळी श्रीमत् स्वामी यांचे दर्शनास गेलो असता तेथे असे समजले की, "तुमची हरवलेली डेकोरेशनची करंडी सापडली आहे. लांज्याला मिळाली आहे. सोमवारी सायंकाळी आणून देणार आहे. पण त्यातील एक लहान हार मी माझ्या घरातील श्रीदत्ताचे फोटोस घातला आहे. त्याची किमत काय असेल ती मी देणार आहे. तरी मला विचारून सांगा. तेव्हा मी त्याना असा निरोप पाठविला की, त्याचे पैसे मी घेणार नाही." ही सर्व श्रीदत्ताचीच व सद्गुरुकृपाच आहे. या गोष्टीचे मला अत्यत आश्चर्यच वाटले. त्यामुळे जन्मोत्सव बहारीचा झाला. सर्व आनंदात बुडाले.

मी एक सेवेकरी भक्त असून मी कोणाचा ही अनुग्रह घेतला नाही. इतर लोकानी मला अनुग्रह घेण्याबद्दल सागितले. तेव्हा मी असे सागितले की, त्याचे पथ्य मला जमणार नाही. मी आपली निरपेक्ष सेवा हीच मला अत्यत आवडते. यावरून श्रीमत् स्वामीनी आपल्या दरबाराची सजावट माझ्याकडे दिली आहे. मीही याप्रमाणेच करण्याचा निर्धार केला आहे.



# ऐसी अनुग्रहाची कथा !

—सौ. नलिनी कुलकर्णी, कोल्हापूर

**" ज्याला मी कोण ? माझे मूळचे रूप काय? ह्या प्रश्नाचे उत्तर मिळ-ण्याची तीव्र इच्छा झाली तो परमार्थाचा व गुरु उपदेशाचा खरा अधिकारी होय. "**

**हरी ॐ तत् सत्**

चार वर्षापूर्वी मी परमपूज्य स्वामीचे प्रथम दर्शन घेतले. त्यानंतर मला त्यांचा अनुग्रह मिळावा असे सारखे वाटू लागले. पण आपल्या गाठी स्वामीची सेवा किंवा इतर काहीच जमा नाही तर आपण अनुग्रह मागावा कसा? असे सारखे माझ्या मनात येई.

त्यानंतर माझ्या एका मार्गदर्शकाने काही स्वरूपात त्यांच्या सेवेचे मार्गदर्शन करून दिले. त्यानंतर दोन वर्षानंतर अनुग्रह मागावा असे माझ्या मनात सारखे घोळू लागले. त्याप्रमाणे मी पत्रव्यवहार केला. स्वामीनी मला लगेच अनुग्रहासाठी येण्यास सांगितले. त्यावेळी माझ्या मनास इतके समाधान वाटले की ते सांगता येत नाही.

कारण त्यावेळी स्वामीची अवस्था अत्यत नाजुक होती. माझ्यामुळे त्यांना त्रास होतो हे कळत असूनसुद्धा माझे स्वार्थी मन तिकडे धावत होते. पण स्वामी हे शेवटच्या क्षणापर्यंत शिष्यांना आपली मायेची व आशीर्वादाची पाखर घालत होते. आजही ती तशीच आहे. अखंड आहे.

अनुग्रहानंतर जप रोज चालू ठेवला पण माझ्या मनाला एक गोष्ट सारखी खटकत राहीली. स्वामीनी मला अनुग्रह दिला, पण मी याला पात्र आहे का? माझे पूर्व सुकृत काय आहे, कोणास ठाऊक, व आतापर्यंत तरी मी परमेश्वरासाठी काय केले आहे ? त्यांची सेवा माझ्या कडून कोणत्याच रूपात घडलेली नाही. असे सारखे विचार मनात येत असता एक दिवस योगायोगाने मी ' पांवसचा प्रेमदीप ' हे पुस्तक पाहिले व ते वाचत असता अकराव्या प्रकरणात गुरु माऊलीने माझ्या प्रश्नाचे उत्तर खालील उताऱ्यात दिले—

**ज्याला ' मी कोण? माझे मळचे रूप काय ?' ह्या प्रश्नाचे उत्तर मिळण्याची तीव्र इच्छा झाली तो परमार्थाचा व गुरु उपदेशाचा अधिकारी होय. त्या व्यक्तीची**

जात, धर्म, वय, वेष, व्यवसाय, रंग,रूप, पूर्वचरित्र काहीही असो! तो शिष्य होण्याच्या योग्यतेचा समजावा. "

हे वाचल्यावर माझ्या मनाची काय अवस्था झाली हे सांगता येत नाही. गुरुमाऊली आपल्यावर किती सूक्ष्म दृष्टी ठेवून आपले रक्षण करते याची प्रचीती आली.

गेल्या वर्षी १५ ऑगस्ट या दिवशी स्वामींनी देह त्याग केला. इथून बरेच भक्तगण पावसला गेले होते. पण मला नंतर फारच उशीरा स्वामींच्या देहत्यागाची बातमी समजली. हे लौकर कळले नाही म्हणून मनास फारच वाईट वाटले. पुढे तिकडून येणाऱ्या लोकाकडून समाधी कशी घेतली याचे वर्णन ऐकावयास मिळाले. त्यामुळे मनाला फारच चुटपुट लागली व ते पाहाण्याचे आपल्या नशीबी नव्हते असे वाटले. " ज्ञानेश्वरमाऊली नंतर हीच दुसरी समाधी " असे सर्वजण वर्णन करीत होते. त्यानतर तीन महिने गेले. मधून मधून मनात पुन्हा तोच विचार घोळत राहायचा. त्यानंतर घडलेला प्रसंग म्हणजे दिवाळी अंक वाचण्यासाठी आम्ही काही बायकांनी एका वाचनालयात नाव घातले होते. शेवटी ते सर्व अंक सर्वांना प्रत्येकी एक या प्रमाणे वाटले. माझ्या वाटणीला 'राजस' हा दिवाळी अंक आला आणि तो चाळून पाहते तो काय आश्चर्य! त्या अकात स्वामीजींच्या समाधीचे यथासांग वर्णन व लोक 'रामकृष्णहरी' हा जप करीत दिंडीतून निघालेले छायाचित्र छापले होते. गुरुमाऊलीने अशा प्रकारे माझी दर्शनाची इच्छा पूर्ण केली. इथे कोल्हापुरात. धन्य ती गुरुमाऊली!



# मी सदैव पाठीशी आहे

**– सौ. नलिनी श्री. हुद्दार, कोल्हापूर**

**" माझ्या मनात नेहमी यायचे की अनुग्रह घेतला तो स्वामींच्या उत्तर काळात; त्यामुळे मला त्यांचे व्हावे तसे मार्गदर्शन झाले नाही. पण जेव्हा जेव्हा शंका येतात तेव्हा स्वामी निश्चित मार्गदर्शन करतात. "**

मी एक सामान्यांतील सामान्य साधिका आहे असे म्हणावयास हरकत नाही. मला स्वामीचा सहवास फारच थोडा लाभला. त्यामुळे माझ्या संग्रही आठवणी अशा थोड्याच आहेत. श्रीस्वामीचे दर्शन अगदी जवळून असे एकदाच झाले. पण त्यावेळी मी त्याची अनुग्रहीत वगैरे नव्हते. त्यामुळे त्यांचा आमच्यात संवाद झाला तो व्यावहारिक दृष्टिकोनातूनच झाला. त्यानी आम्हाला प्रसादादाखल प्रत्येकाला पुस्तके दिली. ती घेऊन आम्ही परतलो होतो. पण त्यावेळी माझ्या मनात ती मूर्ती पाहून आपण अनुग्रह घ्यावा असा विचार आला होता; पण भिडेखातर उच्चार होऊ शकला नाही.

त्यानंतर १८ नोव्हेंबर १९७३ साली मी परत एकदा पांवस क्षेत्री गेले. त्यावेळी श्रीस्वामी निर्वाणीचे बोल बोलत आहेत आपण एकदा काय आहे ते पाहून यावे असे माझ्या मातोश्रीना वाटले व त्यांच्या बरोबर केवळ दर्शनाकरिताच मी गेले. मातोश्री, मी, सासरे व भाऊ, भाचा व माझी मुले असा परिवार माझ्याबरोबर होता. दुपारचे दोन वाजले असतील आम्ही पांवसच्या परिसरात पाय ठेवला. सध्याकाळच्या दर्शनास जाऊन आलो. श्रीस्वामीची प्रकृती बरी नसल्याने त्यांचे दर्शन खोलीच्या दारातूनच होत होते. श्रीस्वामीच्या खोलीत अंधुक प्रकाशात दिसत असे. त्यातून ते झोपलेल्या स्थितीतच दर्शन घ्यावे लागे. दर्शन झाल्यावर डॉ. मिराशी यांची भेट झाली. त्यांना मी केवळ उत्सुकता म्हणून विचारले की, " अनुग्रह घेणाऱ्याना श्रीस्वामी कसा काय अनुग्रह देतात? त्यावेळी खोलीत बोलावतात काय ?" असा माझ्या विचारण्याचा आशय होता. पण त्यांनी मलाच विचारले की, " कोणाला अनुग्रह घ्यावयाचा आहे ? " त्यावेळी मी चटकन् बोलून गेले की, ' मलाच '. ते परत म्हणाले, " उद्या सकाळी ते स्नानास उठतात त्यावेळी ते मंत्र कागदावर लिहून ठेवतात, त्यानंतर तुम्हाला १ वाजतां अनुग्रह मिळेल. त्या नंतर तुम्ही कोल्हापुरास जाण्यास हरकत नाही. "

मी अनुग्रह घेणार असे ऐकताक्षणीच माझ्या मातोश्रींना आनंद झाला. डॉ. मिराशीना मी बोलून गेले, पण माझ्या मनात अनंत विचार चलबिचल करणारे सुरू झाले. मी मातोश्रीना म्हणाले, " मी काही अनुग्रह घेत नाही मला ते जमेल असे वाटत नाही. " त्यावर आई म्हणाली, " जमेल. केल्याने सर्व जमते, तेव्हा तू अनुग्रह घेच. माझ्या मनातील इच्छा आहे. " त्यावर मी साधकबाधक विचार करीत राहिले. रात्र झाली – भजन ध्यानास बसले. जेवण झाले, माझ्या मोठ्या मुलीला अचानक ताप भरला, पण हे जर सासऱ्याना कळले तर ते रागावणार तेव्हा इथे राहण्याचा व अनुग्रह घेण्याचा मोह टाळून आपण सकाळच्या लवकरच्या गाडीने कोल्हापूरास जावे,असा मनामध्ये पक्का निश्चय करून मी झोपले.

सकाळी उठले तो घाईगर्दीत दर्शनाची वेळ केव्हा झाली ते समजलेच नाही. मुलीचा ताप देखील काही एक औषध न घेता पूर्ण उतरला होता व मी रात्री कोणता ठाम निश्चय करून झोपले होते तेही पूर्ण विसरून गेले. दर्शनाकरिता मंडपामध्ये जाऊन आम्ही सर्व बसलो तोच डॉ. मिराशी म्हणाले, " नारळ व गुरुदक्षिणेचे पाकीट घेऊन या. " ती. अण्णानी (सासरे) केव्हा नारळ आणून ठेवला होता देव जाणे. मी नारळ व गुरुदक्षिणा घेऊन श्रीस्वामीच्या समोर राहिले व माझे भानच हरपले.

त्यानंतर श्रीस्वामीच्या महासमाधीनतर भाद्रपदातील अष्टमीच्या दिवशी मी दुपारी सर्व घरातील सर्व कामे झाल्यावर दुपारी आडवी झाले होते. थोडी जाग– थोडी झोप अशी अवस्था होती. एका खोलीतून दुसऱ्या खोलीत गेले. तिथे एका भिती-जवळ पलंग होता. त्यावर एक गृहस्थ बसले होते त्याच्या दुसऱ्या बाजूला मोठा गालीचा अथरला होता, त्यावर माझी आई व एक गृहस्थ बसले होते. मी पलगावर बसते इतक्यात माझ्या आईच्या जवळच्या गृहस्थाने आईच्या खाद्याला दोनदा आपल्या चापटचा मारल्यासारखा स्पर्श केला त्या बरोबर आईला समाधीच लागली व तिच्या अतरातून'ॐ'काराचा ध्वनी बाहेर पडू लागला. मला इतके आश्चर्य वाटले की, तिच्या मुखातून तर उच्चार होत नाही व असा ध्वनी कसा उत्पन्न होत आहे ? असा विचार करीत असतानाच तो ध्वनी इतका नाद मधुर व सुदर होता की, ऐकता ऐकता मी तल्लीन झाले. माझ्या मनातील शंका ओळखून माझ्या शेजारच्या बसलेल्या गृहस्थाने माझ्या कानात सागण्यास प्रारभ केला. पण घरांतल्यानी हाक मारल्याने मी जागी झाले.

डॉ. कुलकर्णी याना हे स्वप्न मी सागितले. त्यांनी असा अभिप्राय दिला की " तुम्हाला स्वामी मार्गदर्शन करीत आहेत. "

माझ्या मनात सारखे विचार यावयाचे " मी अनुग्रह घेतला तो श्रीस्वामीच्या उत्तरकाळात. त्यामुळे मला त्याचे व्हावे तसे मार्गदर्शन लाभले नाही. आता मला कोण

सांगणार ? " पण त्यांनी ज्या ज्या शंका वेळीवेळी आल्या त्यांचे निरसन करून मार्ग-दर्शन केले व सध्या तरी मी पूर्ण समाधानी आहे.

तसेच परमपूज्य स्वामी सत्यदेवानंदांनी कळकळीचे जे निवेदनच लघु व लघुत्तम अभ्यासक्रमाचा अवलंब करण्यास सांगितला आहे. त्यामुळे मी श्रीस्वामींच्या अगदी निकट असून त्याचा माझा सहवास रोज आहे असे वाटते.

हरि ॐ तत्सत्



# देवा तूं सागर – मी तुझी लहरी

– श्रीमती ताराबाई वि. काळे, कोल्हापूर

**"पतिवियोग घडला तो प्रसंग स्वामींना कळवला होता. त्याचे उत्तर इतके समाधानकारक आले की मी रोज त्याचे पारायण करते. एकदम मनःस्थितीत बदल पडला. झोप स्वस्थ लागायला लागली. मन शांत झाले.**

सौ. किसाताई (यमुताई) व त्यांचे पती श्री. दादा कुलकर्णी हे पांवसला निघाले. त्यांच्या बरोबर मी १२ एप्रिल १९७१ ला पावसला आले. आम्हाला ४ वाजता दर्शन झाले. त्यावेळी स्वामी उठून बसत व हळू आवाजात प्रत्यक्ष बोलत असत. यावेळी अपार आनंद व समाधान इतके झाले की शब्दानी वर्णन करणे अशक्य ! खूप खूप वर्षांनी प्रेमळ वत्सल आई आपल्या पाडसावर अमृत वर्षाव करत आहे अशा नेत्रांनी त्यांनी पाहिले. मंद स्मित, ते अमृतवर्षाव करणारे डोळे अजूनी दिसतात. मी काहीच बोलू शकले नाही. माझ्या वतीने श्री. दादा कुलकर्णी यांनीच त्यांना माझी माहिती म्हणजे नाव व "आपलं चरित्र वाचलं म्हणून त्या दर्शनाला आल्या." असं सांगितलं; तेव्हा स्वामी म्हणाले, 'उद्या बारा वाजता या, अनुग्रह देऊ.' किसाताईच्या सांगण्याप्रमाणे नारळ, हार, मनुका बरोबर घेतल्या होत्या. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी म्हणजे दि. १३-४-१९७१ ला दुपारी सव्वाबारा वाजता अनुग्रह दिला व प्रक्रिया स्वतः करून दाखवून माझ्याकडून दोनतीन वेळा करवून घेतली. त्याचे समाधान आज मी उपभोगीत आहे. 'संजिवनी गाथा' प्रसाद भेट म्हणून मिळाली. त्यातील कोणतेही पान उघडून वाचा म्हणाले. मी पान उघडल तर "देवा तू सागर, मी तुझी लहरी । दोघासी अंतरी भेद नाही ।" हा अभग आला. आता त्याच मर्म सर्व भावार्थ कळला. त्यावेळी घाबरून आपले वाचले पण तन्मयता नव्हती. 'सोऽहम्' साधनेचा अर्थ सांगितला. प्राण ब्रह्मरंध्र किवा भ्रूमध्यात न्यावा. तिथे स्थिर करून काय दिसते ते पहावे. गुरुमूर्ती दिसेल किंवा अन्य देवता दिसतील. सोडताना लक्ष नसले तरी चालेल; पण ओढताना व स्थिर करताना लक्ष पाहिजे अशी साधना दिवसातून दोन वेळा करावी व सतत अनुसंधानाचा अभ्यास चालू ठेवावा.

त्यानतर तीन महिन्यांनी पतिवियोग घडला तो प्रसंग कळवला होता. त्याचे उत्तर इतके समाधानकारक आले की मी त्यांचे रोज पारायण करते.एकदम मनःस्थितीत

फरक पडला. झोप स्वस्थ लागायला लागली. मन शांत झाले. पुढे दोन महिन्यांनी दर्शनाला गेले त्यावेळी पुन्हा ती वात्सल्यदृष्टी! आपली आई भेटावी तशी! अभंग ज्ञानेश्वरी 'प्रसाद भेट' मिळाली व पादुका पूजेकरिता करायला सांगितल्या. त्यावेळी मी बरोबर माझ्या मुलीला सौ. सरोज देशपांडे हिला नेली होती. एक वस्त्रही मिळविले. स्वामीचे बहुतेक सगळे ग्रंथ मी घेतले आहेत त्याचे वाचन करते. आपल्या शंकाच समाधान होते व प्रत्यक्ष सहवासाचे सान्निध्य वाटते. तब्येत बरी नसल्याने कुठे विशेष जाणे जमत नाही. ग्रंथांची सोबत त्यानंतर ३–४ वेळ पांवसला उत्सव, सप्ताह या निमित्तानी गेले आहे. स्वामी समाधी घेण्यापूर्वी ३१-७-७४ बुधवार रात्री १ वाजून १० मिनिटांनी एकदम स्वप्नातून जागी झाले. जवळच घड्याळ बघितले. १-१० रात्रीचे वाजले होते. स्वप्नांत स्वामी क्षीण झालेले, निजलेले दिसले.मी दर्शनाला गेले.त्यांनी माझ्या डोक्यावर हात ठेवले व हातानी जवळ येण्याला खूण केली व हलक्या आवाजात 'अंतर पराचे धरावे' अस काहीसं सांगितले व मला जाग आली. दुसरे दिवशी मग आम्ही पावसला त्यांच्या दर्शनाला गेलो त्यावेळी बाहेरूनच निजलेले दर्शन घेतले व मांडवात त्याच दिवशी त्यांच्या चादीच्या पादुका व्यासपीठावर होत्या त्याचे दर्शन घेतले. मन:शांती समाधान त्याच्या ग्रथापासून मिळते व सहवासाचा भास होतो. कधी लिहिण्याची संवय नाही पण आपला अनुभव कळविण्याची आज्ञा झाल्याकारणाने थोडासा साराश कळविला आहे.



## जो तो सांगे – ज्याला त्याला !

– संकलन : सौ. यमुताई कुलकर्णी, कोल्हापूर

**कोल्हापूरच्या अनेक श्रीभक्त भगिनींचे अनुभव लेखिकेने एकत्रित करून श्रीसेवा केली आहे.**

१९७२ च्या दिवाळीपूर्वी प्रत्यक्ष श्रीचे दर्शन झाले. त्यापूर्वी वर्षभर आमच्या घरी माझी मोठी बहीण सौ. यमुताई श्रीच्या पादस्पर्शित खडावांचा प्रसाद घेऊन मलकापुरला आमच्या घरी थाबली होती. कुटुबपरिवारासह पांवसहून कोल्हापूरला परतताना एका रात्री सर्वाचा मुक्काम झाला होता. मला पावसला येण्याचा तिचा खूप आग्रह होता, पण जाणे झाले नाही. त्याच वर्षी श्रावण महिन्यात आमचे घरी भयकर प्राणसकट आले. स्टोव्ह भडकला, माझी साडी पेटली. मी कोल्हापूरच्या डॉ. प्रभूच्या हॉस्पिटलमध्ये होते. भयकर जखमा अन् वेदना सोसत होते. गुरुवारी रात्री यमुताई झोपायला म्हणून एक दिवस आली. झोपण्यापूर्वी तिने नित्यपाठ म्हटला आणि मी ऐकला. त्याच पहाटे खोलीच्या खिडकीतून शुभ्र वलयातून शुभ्र वेषात स्वामीच आले. त्याचा फोटो मी पाहिला होता. ते आमच्या मलकापुरच्या घरी पादुका ठेवल्या होत्या तिथेच उभे राहिले. मी त्याना पाट घ्या, मनुका ठेवा असे सांगत होते. मला उठायला येत नव्हते. मनुका घेऊन ते शातपणे उठले. "आतापर्यत मी या भागात आलो नाही. आता येईन. पावशी आबा पायाला लावायचा" इतकेच म्हणून तसेच शुभ्र वलयातून निघून गेले. मी पाय झाडून एकदम जागी झाले. ते दृश्य किती तरी वेळ जसेच्या तसे समोर उभे राहात होते. दोन तीन महिन्यानी प्राण सकटातून मी बाहेर पडले, ती सरळ पावसला गेले. दर्शन मिळाले. प्रसाद मिळाला. आणि अनुग्रह देऊन सदैव आपल्या कृपाछत्राखाली आधार देऊन परत पाठवले. मुलीला, मुलाला लौकरच अनुग्रह मिळाला. अशी ही गुरुगगा घरी आली. पावस हेच आता आमचे तीर्थक्षेत्र आहे. तिथली वारी घडावी म्हणून मनोमनी प्रार्थना करते अन् तशी ती घडतेही !

**– सौ. कमळ तारे**

१९७१ साली माझ्या चुलत बहिणीबरोबर मी पांवसला गेले होते. स्पेशल कार होती. त्यामुळे सगळ्यांना परतण्याची घाई होती. खोलीत दर्शनाला गेले. "काय विचारायचे का?" असे हळू आवाजात विचारत होते. तेवढेच लक्षात आहे. पुढे आविष्कार झाल्यामुळे काही समजले नाही. परत आल्यावर आपण विचारणार होतो याची जाणीस झाली मन हळहळू लागलं. खरे म्हणजे गुरुदेव रानडयांच्या समाधीवर चिठ्ठी ठेवून मला अनुग्रह मिळाला होता. माझी साधना बरोबर होते का ते मला विचारायचे होते. पुढे हार्ट वीक झाल्याने दवाखान्यात होते. एकदा तरी पांवसचे ते दर्शन डोळे भरून मिळावे म्हणून मन व्याकुळ होत होते. श्रीना पत्र घालून विचारले. सौ. यमुताईंना घेऊन चला असा लकडा लावला. १९७२ च्या मे महिन्यात सौ. यमुताईबरोबर या असे उत्तर आले. साधन समजून दिले. सिद्ध चरित्राचा प्रसाद मिळाला. डोळे तृप्त झाले. पुन्हा येण्याचा हट्ट घ्यायचा नाही असे ठरवून परत आले. प्रत्येक वेळी यमुताई बरोबर खडीसाखरेचा प्रसाद सद्‌गुरु पाठवित होते. प्रकृतीची चौकशी करत होते. अमृताचे भोजन पुरेसे वाटेल का कुणाला ? पुन्हा दर्शन घेण्याची इच्छा आवरेनाशी झाली. श्रीना तसे पत्रात लिहिलेही. उत्तर आले, " येण्याची घाई करू नका. प्रकृती बरी नाही. तिथेच स्मरण करावे. पुन्हा एकदा भेट होईल. " १५ ऑगस्टला श्रीनी देह ठेवल्याची वार्ता येऊन थडकली. छातीला जणु धडकी बसल्यासारखी झाली. " पुन्हा एकदा भेट होईल " एवढेच शब्द मी ऐकत होते. सौ. यमुताईच्या घरी श्रीचरणाशी बसून मी हट्ट धरला ' मला पावसला न्या. ' एकदा भेट द्या, स्पेशल गाडीत माझी सोय झाली. श्रीचे चिन्मय दर्शन या डोळ्यानी घेतले पाच मिनिटे चालले तर दम लागणारी मी, चार मैल त्या आनदयात्रेत चालत होते. अर्थात चालत होते हे मला कळतच नव्हते. श्रीसमाधीस्थानी बसले आणि मी भानावर आले. माझ्या पायातले बळ निघून गेले. अशी दुसरी भेट आणि जन्मोत्सवाला अशीच सौ. यमूताईचा पदर धरून आले सद्‌गुरुस्मरणे सगुण दर्शन देणाऱ्या कृपासागर श्रीचा महिमा किती सांगू ?

**— सौ. वत्सुबाई कुलकर्णी**

पावसच्या परमहसाच दिव्यदर्शन घेऊन मे महिन्यात सौ. यमुताई आल्या होत्या. त्या दर्शनाचा आनद वर्णन करता करता त्याचे डोळे भरून येत. मला वाटू लागले असे ते दर्शन मी कधी डोळे भरून पाहीन बरं ? त्याच्या बरोबर १९७० च्या ऑक्टोबरमध्ये मी पावसला आले. दुपारी त्याना आत बोलावल. मला बाहेर बसल्या बसल्या वाट लागले, मला का नाही बोलावले ? त्याना अनुग्रहासाठी बोलावलं होतं हे समजल्यावर वाटलं आपल्याला कधी मिळेल का अनुग्रह ? आणि पुढे दोन तीन महिन्यानीच आम्ह उभयतांना अनुग्रह मिळाला. जीवनात अनपेक्षित चढउतार आले. पण सद्‌गुरुस्मरण

सर्व सुखदु:खांत सतत त्यांच्याच कृपेने चालू आहे. तीच शक्ती सर्वकाल साथ देत असल्याची अनुभूती घडीघडीला होते. श्रीकृपेचे किती तरी अनुभव हृदयात भरून राहिले आहेत, पण सगळे प्रकटसुद्धा करायला मन तयार होत नाही. अगदी अलिकडची घटना, १५ ऑगस्टला श्रीनी संजीवनी समाधी घेतली. देशभर ज्ञानदेवांची सातशे वर्षानी संजीवनी समाधी सर्वत्र सजीवन शिंपत आहे. अशा पर्वकालीच श्रीनी तोच सोहळा समस्त भक्ताना दाखविला. 'रामकृष्णहरी'चा गजर साऱ्या वातावरणात कोंडून राहिला होता. तेंव्हा पासून रामकृष्णहरीचा जप मी सारखाच करू लागले. तो वैखरीला छंदच लागला. डिसेबरला नामयज्ञाची सागता झाली. त्या उत्सवाला मला जाता आले नाही. त्यानतर दिवसभर कामाने थकल्यावर सोऽहम् भजनही बसून फारसे होईना. उगीचच वाटू लागले मी रामकृष्णहरी उठता बसता म्हणते. श्रीनी सोऽहम् भजन सागितले आहे. दोन्हीचा अर्थ एकच ना ? प्रश्न वारवार येत होता. २५ डिसेंबरच्या रात्री मी स्वप्न पाहिले. मी ते स्वप्न समजतच नाही. ते दिव्य दर्शन होते. पांवसच्या मंडपात श्री खुर्चीवर बसले होते. दोन्ही पाय खाली सोडले होते. मडळी दर्शन घेऊन पुढेपुढे जात होती.पायावर डोके ठेवायचे या आनंदात पाळीतून मीही पुढे सरकत होते. मी पायावर डोके ठेवले वर पाहिले. सद्गुरूनी डोळे मिटले होते. जरा डोळे उघडून पाहतील तर किती आनंद होईल, एवढा विचार मनात आला आणि ते नेत्र हळूहळू उघडलेले पाहिले. पण ओठ मिटले होते. "तुजपाशी जाता काय धरू भीड । पुरवी माझे लाड " असे मला झाले होते. दोन शब्द बोलले तर किती चागले होईल. पुन्हा मनात आले. अन् ओठ हलले. " राम कृष्ण हरि– राम कृष्ण हरि " दोनदा सावकाश श्रीमुखातून ते स्पष्ट मंत्रमय शब्द बाहेर पडले मी जागी झाले. घड्याळाकडे लक्ष गेले. चार-सव्वाचार वाजले होते. उठल्यापासून रामकृष्ण हरि जपाचा वेगळाच आनंद जाणवत होता. माझ्या प्रश्नाचे मला उत्तर मिळाले होते. हा आनद मी सौ. यमुताईना सागत होते. त्या म्हणाल्या, कुणाला आता काही विचारायचे कारणच नाही. २५ डिसेबर हा बाबांचा पुण्यतिथीचा दिवस. मडपात उपस्थित राहून श्रीनी तुमची इच्छा पुरवली आहे. सिद्धाच्या मुखातील अक्षरे म्हणजे सिद्धमंत्रच. दोन्ही एकच जमेल तेव्हा सोऽहम् भजन करा नाही तर रामकृष्णहरीचा सूर धरा. दोन्हीच फलित एकच स्वरूपानद . . असे सद्गुरुस्वरूपानद आमच्या जीवनात भरून राहिले आहेत.

**– सौ. स्नेहलता फडके**

पांवसच्या सद्गुरुदेवाचा दर्शनानद अनेक मुखातून ऐकत होते. आपल्याला ते दर्शन एकदा तरी घडाव असं वाटत होतं. कुडाळला मुलीकडे मुक्काम होता. एकटीच तिथून पावसला निघाले. श्रीची प्रकृति तितकीशी ठीक नव्हती. दर्शन दारातून झाले. आशीर्वादाचा हात पाहिला. आनदाच्या लहरीनी अत:करण व्यापून गेले.

कृतकृत्यतेनं मन न्हाऊन निघालं. कोल्हापूरला आल्यावर अनुग्रह मिळावा असे सारखे वाटू लागले. त्यांच्या कृपादृष्टीत सुस्नात झालेली भक्त मंडळी आगळयाच आनंदात आपली नित्यकर्मे करताना मी पाहिले होते. माझी इच्छा पूर्ण झाली. मला पत्राने अनुग्रह आला (ज्येष्ठ शुद्ध एकादशी १९७२) सौ. यमुताईकडून समजून घ्या, अशी सूचना होती. सद्‌गुरूंच्या भक्तीत बुडून त्यांनीही मला सर्व भक्तीप्रेमाने सांगितले. सद्‌गुरु-स्वरूप सत्यदेवानंदाचे चरणही वास्तूला लागले. मोठ्या आनंदात वाचन भजन चालले होते; फक्त श्रीचे आतून दर्शन झाले नाही असे उगीच केव्हा तरी मनात येई.

१९७४ मध्ये जिजी महाराजांच्या प्रसिद्ध शिष्या सुलोचनाबाई पाटणे यांचा मुक्काम चार दिवस कोल्हापूरला होता. त्या भेटीला येणाऱ्या मंडळीना आत्मबोध करीत होत्या. सजीवनी गाथेतली प्रतिमा पाहून त्या उद्‌गारल्या, 'पूर्णसिद्ध.' पुढे त्या म्हणाल्या, तुम्हाला सिद्ध सद्‌गुरु लाभले. पण ते प्रत्यक्ष बाहेर बोलू शकत नाहीत. तुम्हाला हवे तर माझ्याकडे या मी वस्तुदर्शन करून देईन. मी इच्छा दाखविली नाही. तेव्हा त्या म्हणाल्या, " याच जन्मातील संधी वाया घालवता आहात. " मी काहीच उत्तर दिले नाही. घरी आल्यानंतर मला वाटले, मी चुकले तर नाही? संतांचा अनादर तर केला नाही ? मला सिद्धगुरु मिळाले असताना त्यानीच का सागू नये ? श्रीना मनोमनी प्रार्थना केली "मी चुकले की बरोबर केले तेवढे सागा." चार सहा दिवसांनी आमच्या घरी माजघरात मी निजले होते. समोरच्या भिंतीवर रथावर कृष्णार्जुनाचं मोठे मनोहर छायाचित्र फार वर्षांपासून आहे. अर्धजागृतीत की स्वप्नात कोण जाणे स्वामी समोर पाटावर येऊन बसले. जवळच स्वामी सत्यदेवानंद. मी मनात म्हटले– 'भिंतीवरून खाली उतरून आले का?' एवढ्यात सद्‌गुरु स्वरूपानदांनी हातावर खवा दाखविला आणि ते सत्यदेवानदाना म्हणाले, " हा खवा आहे. " सत्यदेवानद बोलले, " होय, त्यात फक्त साखर घालायची म्हणजे झाले." ते दर्शन, ते शब्द माझी शंका कायमची फिटली. अशी सद्‌गुरुमाय भेटली. स्वतःची नाही पुण्याई ही सद्‌गुरुकृपेची आहे नवलाई !

• • •

# विसरू कसा मी गुरु पादुकाला

– श्री. वि. के. फडके

एक दिवस स्वामींचे अंतरंग शिष्य व माझे आडनावबंधू श्री. ल. रा. फडके रात्री अचानक माझ्या घरी आले. बरोबर त्याचे भाचे श्री. भट होते.

आमच्या घरात पूज्य श्रीब्रह्मचैतन्यमहाराज ' (गोंदवलेकर) याच्या गळ्यातली एक रुद्राक्ष माला आहे. माझ्या वडिलाना ती महाराजाच्या एका शिष्याने प्रसाद भेट म्हणून दिलेली आहे.

बोलण्याच्या ओघात ती माळ मी श्री. फडके याना दाखवली. तेव्हा ते म्हणाले, " तुम्ही ही माळ घेऊन ताबडतोब पांवसला जा व ती स्वामीच्या हातून घ्या. "

मी 'हो' म्हणालो. परतु ताबडतोब पावसला जाणे मला कठीणच वाटले. जाऊ पुढे मागे केव्हा तरी असे मी मनाशी ठरविले.

परंतु स्वामीची इच्छा मी ताबडतोब पांवसला यावे अशीच असावी. कारण मी तिकडे जायचा आळस करतो असे पाहिल्यावर स्वामींनी एक चमत्कारच केला. त्या दिवसापासून ओळीने तीन दिवस मला एकच स्वप्न पडले. त्या स्वप्नात पाढऱ्या शुभ्र वेषातील एक व्यक्ती मला ती माळ देत आहे असे दृश्य मला दिसले. एकच स्वप्न लागोपाठ तीन दिवस पडल्यामुळे त्या स्वप्नातील सकेत मला थोडासा जाणवू लागला व मी ती हकिगत श्री. भट याना सागितली. ते म्हणाले, " तुम्हाला पावसचा अर्जट कॉल आहे. तुम्ही ताबडतोब निघा."

आता जाणेच प्राप्त होते, सगळा आळस झटकून मी पांवसला गेलो व त्या थोर महात्म्याचे डोळे भरून दर्शन घेतले. त्या वेळचे स्वामीचे ते निरागस दैवी हास्य पाहून मला तीव्रतेने असे वाटले की, कुणी तरी स्वामीचे हे निष्पाप हास्य कॅमेऱ्याने टिपून घेतले पाहिजे. त्या मधुर हास्यातूनच स्वामीच्या दिव्यत्वाचे मला दर्शन घडले !

शेवटी निघताना स्वामी माझ्या कानाशी हळूच म्हणाले, " चमत्कार घडले तरी कुणाला सांगू नयेत. श्री समर्थांचे एक वाक्य नेहमी लक्षात ठेवावे. ते म्हणतात– **'काही चमत्कार झाला तो सांगो नये दुसऱ्याला । जरी आळुकेपणे सांगितला तरी पुन्हा होणार नाही ।'**



माळेचा चमत्कार मी बऱ्याच लोकांना सांगितला होता. त्या संदर्भातच स्वामींनी मला ही सूचना दिली होती !

एकदा मी अशाच काही अडचणीत सापडलो असता स्वामींना सगळी हकिगत कळविली. त्यावर स्वामीचे जे उत्तर आले त्यात त्यांनी लिहिले होते. ' भक्तांच्या प्रमुख लक्षणापैकी ' यदृच्छा लाभ संतुष्टः ' हे एक प्रमुख लक्षण आहे. '

पूज्य स्वामींच्या या वाक्याने माझी तळमळ कमी झाली व ईश्वरावर भार टाकून मी स्वस्थ राहिलो व विशेष म्हणजे पुढे लवकरच मोठ्या अकल्पित रीतीने मी त्या अडचणीतून मुक्त झालो.

पूज्य स्वामीची काही पत्रे माझ्या सग्रही मी जिवापाड जपून ठेवली आहेत. त्यातील बऱ्याच पत्रात त्यानी नामजपावर भर दिलेला आहे.

पावसला गेलो असताही त्यानी मला ब्रह्मचैतन्यमहाराजाचा आवडता राम-नामाचा जपच करावयास सांगून तो जप मनामध्ये वाटेल तेव्हा व वाटेल त्या ठिकाणी केला तरी चालेल असे सागितले होते. व आज या नामजपाचाच मला केवढा तरी आधार वाटतो !

पूज्य स्वामीच्या दर्शनाचा योग मला आयुष्यात फक्त एकदाच आला. परंतु त्या एकाच भेटीत मला सारे काही मिळाले व नतर पुन्हा भेट न झाल्याबद्दल कधीही खेद वाटला नाही. पूज्य स्वामीना भेटल्यावर असे वाटले की, एवढी माया, एवढे प्रेम साऱ्या आयुष्यात आपल्यावर कधी कुणी केलेच नाही !



# सद्गुरूंच्या सहवासातील बारा वर्षं !

– वसंत दामोदर भट, पुणे

**संकल्प-साधना-सिद्धि ह्यांचे अर्थ इतरांना कसेही असोत, माझ्या दृष्टीने मात्र, स्वामींच्या दर्शनास जाण्याची प्रथम इच्छा झाली हाच 'संकल्प'! ....बारा वर्षे वारंवार दर्शनास गेलो हीच साधना.... आणि सदैव स्वामींची प्रेमळ कृपादृष्टि लाभली हाच सिद्धिलाभ!....**

एखाद्या शिक्षकाचा सत्कार समारंभ असावा. त्याच्या बरोबरचे इतर शिक्षक त्याच्या संबंधी गौरवपर भाषणे करीत असतात. त्याच्या हाताखाली शिकून समाजात नावलौकिक व प्रतिष्ठा पावलेले विद्यार्थी शिक्षकाच्या गोड आठवणी सांगत असतात. अशाच वेळी शाळेतील एखाद्या शिपायालाही आपल्या सरांबद्दल काही बोलण्याची इच्छा होते. तोही त्याच्या संबंधी काही आठवणी मोठ्या अकृत्रिम शैलीने सहजतेने, स्वतःच्या बुद्धीप्रमाणे सागत असतो. आज माझी स्थिती त्या शिपायासारखीच झाली आहे !

१९६२ साली रत्नागिरीला गेलो होतो. वेळ होता. केवळ सहलीचा आनंद व स्वामीबद्दल कुतूहल म्हणून स्वामीच्या दर्शनास गेलो. कोणतीही आध्यात्मिक तळमळ नव्हती, किंबहुना सताबद्दल, भोंदुगिरी, बुवाबाजी अशा काही विचाराची छाप मनावर पडलेली होती.

**प्रेमळ पिता :**

प्रथम भेटीत स्वामीनी माझी मोठ्या आस्थेने चौकशी केली. स्वामीच्या प्रेममय बोलण्याचा व आकर्षक व्यक्तिमत्वाचा परिणाम माझ्यावर खोलवर झाला. स्वामी मला प्रेमळ पित्यासारखे वाटू लागले. पुढे वर्षांतून दोनतीन वेळा स्वामीच्या दर्शनासाठी मी का जात असे, हे मला सांगता येत नाही. मित्र मंडळी जेव्हा 'तू का जातोस?' असे विचारीत तेव्हा 'जावेसे वाटते म्हणून जातो.' ह्या पलीकडे उत्तर नव्हते. परतत्त्वाशी एकरूप झालेल्या ज्ञानी सत्पुरुषाच्या शक्तीची मीमांसा त्यातले जाणकार लोक करूं शकतील. आम्हाला मात्र 'जावेसे वाटते म्हणून जातो.' ह्या पलिकडे उत्तर ठाऊक नव्हते.

नंतरच्या भेटीत स्वामींनी ज्ञानेश्वरीतील एकदोन ओव्या वाचून घेतल्या. **या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे जे सर्वगत । ते तत्त्वज्ञ संत । स्वीकारीती ।।** वाचल्यावर स्वामी म्हणाले, "स्वीकारीती ह्यातील 'स्वी' दीर्घ आहे. त्याचा उच्चार दीर्घ करावा. नंतर त्यानी ओवीचा अर्थ समजून दिला.

**दिव्य शक्ति :**

नतरच्या श्रीस्वामीच्या दर्शनाच्या प्रसंगी श्रीस्वामीजवळ असणाऱ्या दिव्य शक्तीचा अनुभव मला हळूहळू येऊं लागला. सतांजवळ मोठ्या शक्ती असतात ह्या समजुतीने प्रत्येक भेटीच्या वेळी ईश्वरी शक्तीचा मागोवा घेण्याचा मला छंदच लागला. अनेक वेळा मुद्दाम चमत्कार, किवा आपल्या शक्तीचे प्रदर्शन असे काही न करताही श्रीनी त्याच्या अगाध शक्तीची चुणूक अगदी सहजगत्या दाखविली. त्यातील काही उदाहरणे पुढे देतो —

एकदा श्रीच्या दर्शनासाठी मी, माझे बधू श्री. विष्णूपंत, मित्र श्री. पेडसे गेलो होतो. दर्शन घेताना मी पलंगावर मस्तक टेकले. मग आम्ही त्रिवर्ग स्टँडकडे फिरावयास गेलो. विष्णूपत त्यावेळी म्हणाले की, सत्पुरुषाना साष्टांग नमस्कार घालावा, कपड्याकडे न बघता, जमिनीवर नमस्कार घातला तर काही बिघडत नाही. दुपारी परत दर्शनास गेल्यावर मी साष्टाग नमस्कार घातला, तेव्हा बाकावर बसलेल्या विष्णुपंताकडे पहात स्वामी म्हणाले, " एवढा साष्टांग नमस्कार घातलाच पाहिजे, असे नाही, भाव असला म्हणजे झाले. " स्वामीनी आमचे सकाळचे बोलणे जाणले असे वाटू लागले. परगावी चाललेले सभाषणही स्वामी जाणू शकत असले पाहिजेत अशी एकदा खात्री पटली. एकदा मी पावसला जाण्यापूर्वी माझे बंधू श्री. बाळकृष्ण पुण्याला आले होते. सहज चर्चेत ते मला म्हणाले, " मी तीनचार महिन्यापूर्वी स्वामीना एक पत्र लिहिले आहे, त्या पत्रात अभग ज्ञानेश्वरीसाठी पचवीस रुपये पाठवण्याची इच्छा आहे.पण सासारिक अडचणीतून जमेल तेव्हा पाठवीन. " हे ऐकून मी म्हटले, " मी पांवसला लवकरच जाणार आहे. तेंव्हा मी तुझ्यासाठी पैसे देईन. "

पांवसला गेलो. दर्शन घेतले. बाकावर बसलो. स्वामी हळू आवाजात म्हणाले, " मागे बाळकृष्णाचे एक. . . . . . " एवढे शब्द कानी पडल्यावर मी ओळखले. बुद्धीत वेगळाच प्रकाश पडला, स्वामी त्यांच्या अगाध शक्तीची चुणूक दाखवत आहेत हे स्पष्ट कळत होते. आम्ही नऊ भावापैकी कोण ना कोण तरी पांवसला वरचेवर जात असे, कोण ना कोण तरी एखादे पत्र लिही. सभाषणात स्वामी एरव्ही दुसऱ्या जवळ ह्याचा कधीच उल्लेख करीत नसत, पण आज तीनचार महीन्यापूर्वी बाळकृष्णांनी पाठवलेल्या पत्राचा उल्लेख करून स्वामी संताजवळ असणाऱ्या शक्तीची चुणूक मला दाखवत होते, हे मी क्षणात जाणले आणि त्यांचे वाक्य पूर्ण होण्याच्या आतच पुण्यातील आमचा संवाद सांगितला.

'अभंग ज्ञानेश्वरी 'साठी पैसे दिल्यावर स्वामींनी 'पावती कोणाच्या नावे करायची ? " म्हणून विचारले. माझ्या अहंकाराची थोडी परीक्षा होती हे ओळखून मी म्हटले, 'बाळकृष्णाच्याच नांवाची व ग्रंथही त्यांच्याच पत्यावर पाठवावयाचा.

**ईश्वराची इच्छा तीच संतांची !**

कोयना भूकंपानंतर लगेच पावसला जाण्याचा योग आला. एस. टी. कोयनानगरवरून जाताना एक विचार सारखा घोळत होता. स्वामी सारख्या सताना भूकंप, पूर वगैरे सारख्या घटना अगोदर कळत नाहीत का ? कळत असल्या तर ते लोकाना अगोदर सांगून उपकार कार्य का करीत नाहीत ? जगाच्या कल्याणा सताच्या विभूति असतात ना ? असे विचारचक्र चालू होते. पावसला श्रीचे दर्शन झाल्यावर स्वामीनी एक पुस्तक हातात दिले, कोणतेही पान उघडून वाचावयास सांगितले. मी वाचले. त्यात त्यानी सताची लक्षणे दिली होती. त्याचा आशय –' अशी व्यक्ति त्रिकालज्ञ ' असते. भूत-भविष्य-वर्तमान ती करतलआमलवत् जाणत असते. पण ऊठसूट भविष्य सांगत सुटत नाही. . . . ईश्वराची इच्छा आणि त्याची इच्छा यात फरक नसतो. " माझ्या शकांचे पूर्ण निरसन झाले.

**सर्व ईश्वरास पोहोचते :**

माझा चिकित्सक स्वभाव जाणून आणि माझा साधनमार्गावर विश्वास वाढावा म्हणून स्वामी त्याच्या दिव्यशक्तीची जाणीव करून देऊन मला त्यातून काही उपदेश करीत. काही दिवस स्वामीच्या फोटोला मी नुसते एक तुळशीपत्र नित्यनेमाने वाहात असे. कधी असा विचार येई, स्वामीचे अनेक शिष्य, प्रत्येक जण असे काही करीत असणारच. स्वामीना याची काही सवेदना, जाणीव होत असेल का ? एक गुरु किती शिष्याकडे दररोज अन्तर्दृष्टीने पाहाणार? वगैरे. तदनतर श्रीच्या भेटीत इतर गोष्टीबरोबर श्री म्हणाले, ' साधे तुळशीपत्र भावनेने वाहिले तरी देवाला ते पोहोचते. . . . साधनेचे अवडंबरही करण्याचे अट्टाहास करण्याचे, कारण नाही."

माझे मित्र श्री. गुळजकर व मी पांवसला गेलो असता त्याला बोटीने प्रवास करण्याची इच्छा होती. बोटीने त्याने कधीच प्रवास केला नव्हता. मुबईहून पुण्यास जाण्याचा त्याचा आग्रह चालला होता. आमची ही मतभेदात्मक चर्चा सकाळी चालली होती. दुपारी आम्ही दर्शनास आंत गेल्यावर स्वामी कोणत्याही प्रसंगी सोऽहम् अनुसंधान सतत ठेवावे हे सांगत असताना म्हणाले, "तुम्ही बोटीने प्रवास करीत असा, घरी असा, सतत सोऽहम् चालू ठेवावे." ह्यावरून आमचा बोटीनेच प्रवास होणार हे मी जाणले आणि तसेच झाले.

श्रीसदगुरुनाथांनी इसवी सन १९६२ ते इ. स. १९७२ पर्यंत प्रत्येक वेळी मला एखादा ग्रंथ देऊन एखादं दुसरे पान वाचावयास सांगितले. ह्या वाचनात शंकांचे निर-

सन असे, त्यांना काही उपदेश करावयाचा असेल तर तो असे. आत्मप्रभा, श्रीगोंदवलेकर महाराजांची प्रवचने वगैरे काही ग्रंथांची दोनदोन तीनतीन पानेही स्वामीसमोर बसून मी वाचली आहेत. स्वामीसमोर वाचताना बुद्धीत काही वेगळीच संवेदना होई. एखादे वेळी पूर्वी वाचलेलाच मजकूर आपण पुन्हा त्याच्यासमोर वाचला तरी तो नव्या अर्थाने समजू लागे. बुद्धीस प्रकाशमान करण्याची ही श्रीची इच्छा फारच आश्चर्यकारक होती.

'ध्यानाला बसतांना अमुकच दिशेकडे तोड करून का बसावे ? ईश्वर सर्वत्र आहे, कोठेही तोड करून बसले तरी काही हरकत नाही' असे मला वाटे. माझ्या घराच्या रचनेमुळे मी पश्चिमेकडे तोड करून बसत असे. एकदा स्वामीनी एक लेख वाचावयास सागितला. त्यात पूर्व अथवा उत्तर दिशेस तोड करून ध्यानास का बसावे ते दिले होते. ध्यानास कसे बसावे, दृष्टी भ्रूमध्यावर, लक्ष तालूवर, अनुसधान सोऽहमचे, तसेच बोटे कशी मिटून घ्यावी, तर्जनी अगठा कसे गोलावर ठेवावे, वगैरे गोष्टी होत्या. आणि वाचन चालू असता स्वामी, तर्जनी अंगठा मिटून दाखवणे, स्वतःच्या भ्रूमध्यावर तालूवर स्पर्श करणे वगैरे हालचाली स्वतः करून दाखवत होते. ईश्वरास जाणण्यास मार्ग एकच. तो म्हणजे सतत सोऽहम अनुसधान, असे म्हणाले.

इतर साधकांना नादश्रवण, प्रकाशदर्शन, स्वप्ने, दृष्टांत अशा गोष्टी अनुभवास येत असल्याचे मी जेव्हा ऐकत असे तेव्हा असे अनुभव आपल्याला का बरे येत नाहीत म्हणून मी थोडा सचित होत असे. माझी ही चिता स्वामीनी एकदा दूर केली. त्यानी त्यावेळी मला वाचावयास दिलेल्या मजकुराचा आशय असा होता– ' रात्रीच्या वेळेला रेल्वेने आपण प्रवास करीत असता काही स्टेशने येऊन जातात, आपणाला ती कळत नाहीत, तरी आपण मुक्कामाला पोहोचतोच. त्याप्रमाणे प्रत्येकाला अनुभव येतील असे नाही तरी प्रगति होतच असते. प्रगतीची मुख्य लक्षणे म्हणजे समाधान. . . . विकार वासना क्षय." पुढे सद्गुरु म्हणाले, ' गुरुकृपा झाली की तीन जन्मापेक्षा जास्त जन्म घ्यावे लागत नाहीत."

**देहबुद्धीने कळणार नाही :**

स्वामीनी असलेले ज्ञान, शक्ती, सिद्धी म्हणा वगैरे त्याना कशा प्राप्त झाल्या असतील ? ह्याबद्दल मला नेहमी कुतूहल वाटत असे. असे चमत्कारही होतात कसे असे वाटते. आमचे बंधू श्री. दत्तात्रय ऑफिस कामात स्वतःची काही चूक नसताना संकटात आले होते, ते पूर्वी स्वामीकडे गेलेले नव्हते. ' ह्या संकटातून सुटलो तर तुमच्या दर्शनास येईन ' असा संकल्प त्यांनी केला होता. संकटातून मुक्त झाल्यावर श्री. दत्तात्रय, श्री. बाळकृष्ण असे आम्ही तिघे भाऊ, मित्र पेंडसे असे पांवसला गेलो. दर्शनासाठी आत गेल्यावर चौघेही बाकावर बसलो. श्रीनी गोंदवलेकर महाराजांची प्रवचने माझ्या हातात देऊन, कोणतेही प्रवचन वाचावयास सांगितले. मी वाचू लागलो, ' कोकणातील

नेद्या कोठून उगम पावतात हे आपणास कळत नाही. दृश्य जगताबद्दल आपले इतके अज्ञान तर अदृश्याबद्दल बोलायलाच नको. मी बोलतो कसा, माझे ज्ञान येते कोठून, हे सामान्य देहबुद्धी असणाऱ्या माणसांना कळणे शक्य नाही. (हे मजसाठी होते) . . ."
लोक अडचणी आल्या की माझ्याकडे येतात. कोळसा उगाळावा तेवढा काळाच . . .
प्रपंचात राहून कोणी सुखी झाल्याचे ऐकिवात नाही (बंधू दत्तात्रेयासाठी)

आम्ही चौघेजण ज्या ज्या भूमिकेतून स्वामीकडे पाहात होतो त्या सर्वांचे दर्शन त्या एका प्रवचनात होते. वाचनानंतर श्री. बाळकृष्णानी स्वामीना विचारले, " आध्यात्मिक प्रगतीत प्रारब्ध आडवे येत नाही का ? प्रारब्धाप्रमाणे साधनाही घडते." त्यावर स्वामी म्हणाले– " प्रारब्धाप्रमाणे फल देणे हे ठरविणारा तरी कोण ? ईश्वरच. आपण त्याचीच करुणा भाकावी म्हणजे झाले. "

**गुरुचरण देखिले :**

पूर्वी काही भेटीत स्वामीच्या पायाचे दर्शन असे कधी मला झाले नाही. स्वामी बसलेले असले तरी पाउले धोतराने झाकून घेऊन बसत. एकदा ओटीवर बसलो असताना विचार आला· ' सद्‌गुरू चरण उपासिता ' त्या चरणांचे दर्शनही आपणास कधी झालेले नाही. थोडा वेळ गेला. मोहनचा आधार घेऊन स्वामी खोलीच्या दारापर्यंत चालत आले. किलकिल्या नजरेने त्यांनी सर्वत्र पाहिले. आणि ते परत आत गेले. स्वामी उभे असताना मी एकदाच तेव्हा पाहिले. गुरुचरणाचे दर्शन झाले.

**प्रसादवस्तु ज्याची त्यानेच खावी ! :**

सौभाग्यवती मीना व मुलगी चि. विद्या ह्यांच्यासह पांवसला गेलो असतांना एक गमतीदार प्रसग घडला. विद्या त्यावेळी दोन अडीच वर्षांची असेल. दर्शन घेतल्यावर स्वामीनी मला प्रसाद म्हणून खडीसाखरेचा खडा दिला. विद्याने तो पाहून लगेच मागितला, म्हणून मी तिला तो दिला. लागलीच स्वामीनी खूणेने तो खडा तिच्या हातून परत घेण्यास मला सुचविले. मी विद्याला तो परत मागितला पण ती काही तो देईना. मी बळजबरीने घेतल्यास भोकाड पसरून ती रडू लागेल ह्या विचाराने मी थोडा स्तब्धच होतो.तेव्हा स्वामीनी तिच्यासाठी हातात एक खडा घेत मला तिच्या मुठीतील खडा काढून घेण्यास सागितले व मी तो घेतला. स्वामी प्रसाद देताना काय संकल्प करून देत असतील हे आपणास कळणार नाही, असे ठरवून पुढे प्रत्येक वेळी मी ताबडतोब तो खाऊन टाकीत असे.

**अमलानंदांच्या सहवासात पावस :**

माझे मामा श्री. ल. रा. फडके (ऊर्फ अमलानद) ह्यांच्या बरोबर दोन वेळा पावसला जाण्याचा योग आला. आमचा भाचा मामाबरोबरच पांवसला जाण्याचा हट्ट धरून बसला होता. म्हणून मामा, भाचा, दिलीप पावसकर, व मी असे पावसला गेलो

त्यावेळी मामांना स्वामींनी दुसऱ्यास अनुग्रह देण्याची अनुज्ञा दिली ती अशी– " आम्ही तिघे आत गेल्यावर मोहन काही तरी कामासाठी बाहेर गेला म्हणून स्वामींनी मामांना शेजारी राहण्यास सांगितले. स्वामींच्या अंगास किंचितसा स्पर्श करून मामा अत्यंत लीनतेने उभे होते. मी व दिलीप बाकावर बसलो होतो. स्वामी मृदु आवाजात मामाना सांगू लागले–" आपल्या सांप्रदायात गादी चालवणे, मठ चालवणे असा प्रकार नाही. फूल उमलले की त्याला दुसऱ्याला सुगंध दे असे सांगावे लागत नाही. सोऽहम् साधनेनंतर बारा वर्षे आपण स्त्री, पैसा, मान इत्यादि गोष्टींपासून पूर्णपणे अलिप्त राहू शकतो अशी स्वत ला च स्वतःची खात्री पटली की, दुसऱ्याला अनुग्रह देण्याचा अधिकार आपोआपच प्राप्त होतो. तुम्हास योग्य अशा व्यक्तीस अनुग्रह देण्यास आता हरकत नाही." " एखाद्याला संस्कृत येत नसल्यास गुरु परंपरेचे श्लोक सांगितलेच पाहिजेत असे नाही, नुसती सिद्धपुरुषांची नावे सांगितली तरी चालतील. वगैरे सूचना त्याच वेळी मामाना दिल्या.

'दीपलक्ष्मी' अंकाच्या प्रकाशनापूर्वी पुन्हा एकदा मामांबरोबर पांवसला गेलो होतो. मामानी मला, स्वामींची अनुज्ञा घेऊन मामांच्या डायरीतील कांही मजकुराचे लिखाण करण्यास सांगितले. देसायांच्या घरी माडीवर बसून मी स्वामींच्या काही पत्रातील मजकुराचे लिखाण मामांच्या सांगण्याप्रमाणे केले, लिखाण दुसरे दिवशी स्वामी पाहणार असल्याने सुंदर हस्ताक्षर, शुद्धलेखन ह्याकडे विशेष लक्ष द्यावे लागत होते.

दुसरे दिवशी सकाळी स्वामींनी ते पाहिले, वाचून घेतले. माझ्या कडील पेन घेऊन दोन तीन शुद्धलिखाणाच्या चुका दुरुस्त केल्या. त्यावेळी श्रींच्या कुंडली संबधी एक लेख लिहिण्याचा माझा मानस स्वामींना सांगितला. त्यावर त्यानी लिहिण्यास हरकत नाही म्हणून सांगितले; पण लिखाणात दुसऱ्याशी तुलना करून श्रेष्ठत्व वगैरे दाखवण्याचे प्रकार नसावे असे सांगितले. मामाकडे पहात म्हणाले, " शक्यतो लिखाणात कुणी दुखावले जाईल, तुलना होईल, असे नसावे." मामाना दीपलक्ष्मी अंकासंबधी आणखीही अनेक बाबतीत मार्गदर्शन केले.

**ज्ञानेश्वरी सप्ताह :**

स्वामींनीच योग आणून आमच्या कडून एक ज्ञानेश्वरी सप्ताह आश्विन इ.स. १९७२ ला करवून घेतला स्वामींना आवडणारी गोष्ट म्हणजे ज्ञानेश्वरी सप्ताह. आपण एकदा तरी केला पाहिजे असे आमचे मित्र श्री. सुभाष दामले, श्री. विश्वनाथ काळे ह्यांच्याशी बोलताना मी सहज म्हणालो होतो. तदनंतर श्री. काळे एकदा पांवसला गेले असताना स्वामी समोर काही तरी बोलायचे म्हणून आम्ही एकदा सप्ताहास येणार असे म्हणाले. खरं कांहीच ठरले नव्हते. पण तदनंतर तिघांनाही नाना अडचणीतूनही एकत्र सप्ताहासाठी जाण्याचा योग आला. तसे कळविले. आम्ही जाण्यापूर्वी "वसंत भट

सप्ताहासाठी येणार आहेत." असे स्वामींनी सर्वांना सांगितले. आम्ही गेलो तेव्हा स्वामीची प्रकृति बिघडली होती. त्यावेळी आतून श्री. तात्या पाथरे ह्यांच्यातर्फे स्वामीनी सप्ताहासंबधी सर्व सूचना आम्हास दिल्या. सप्ताह विष्णू मंदिरात करावा, कोणत्या दिवशी कोणते वाचन करावे, सुरुवात केव्हा करावी, वगैरे. विष्ण मंदिराजवळ राहणाऱ्या श्री. फडके गुरुजीना आम्हास पाणी वगैरे काही मदत लागल्यास तशी देण्यासबधीची सूचना स्वामीनीच एकातर्फे पाठविली. आमच्यापेक्षा सद्‌गुरूनाच सप्ताहाची एकदर तयारी करावी लागत आहे असे वाटण्यासारखे वातावरण दिसत होते. (वर्षभर सप्ताहाची पद्धत त्यानंतर काही काळाने पुढे सुरू झाली.)

दुसऱ्या दिवशी स्वामीचे दर्शन घेऊन विष्णू मदिराकडे सप्ताहाची सुरूवात करण्यास जाणार होतो. अगणात दर्शनासाठी सकाळी जाऊन बसलो, आम्ही तेथे बसलो आहोत हे पाहून श्री बाबा देसाई जवळ आले व म्हणाले की, रात्री स्वामीची प्रकृति बिघडली. तुम्ही खिडकीतून दर्शन घेऊन जा. हे ऐकल्यावर थोडे वाईट वाटले. पण नतर खिडकीतून दर्शन घेऊन अगण ओलाडून आम्ही पुढे गेलो. तोच 'अहो, भट इकडे या' म्हणून बाबाची हाक ऐकू आली. मागे वळलो. तेव्हा श्री बाबा देसाई म्हणाले, "थाबा, हायकमांडचा आतून निरोप आलाय. दररोज सकाळी, सप्ताहासाठी जाणा-या तुम्हा तिघांना, दारातून दोन पावले आत जाऊन, स्वामीचे दर्शन घेता येईल." ह्या निरोपाने सद्‌गुरूच्या प्रेमाने आनद वाटला.

आम्हास विष्णु मदिरातून दुपारी येण्यास काही वेळा उशीर झाला तर जेवण्यापूर्वी आम्ही आलो की नाही ह्याची चौकशी श्री. भाऊसाहेबांजवळ स्वामी करीत. आम्ही आल्यावर श्री. भाऊ लगेच आत तसे कळवीतही असत. आमच्या तेथील वास्तव्यात मोटी मजा आली. तात्या देसाई याच्या घरात आश्रम होता. आश्रमात एक साधक माझी अधूनमधून विनोदाने चेष्टा करीत सप्ताह काळात मी कोणतीच बधने अशी पाळत नव्हतो. हा एक विषय असे श्री. दामले पायात चप्पल न घालता विष्णु मंदिराकडे उन्हातून ये-जा करीत श्री. काळे गार पाण्याने आघोळ करीत. दोघेही दुपारी झोपत नसत. पण माझे सर्व वागणे नेहमीप्रमाणे होते. 'तू मानसा नियम करी' म्हणून एक साधक गमतीने मला म्हणाले मी म्हटले, "तसे नाही, 'तू मानसा हळूहळू नियम करी' असे आमचे आहे व हळूहळूही फारच सथ आहे" 'कर्मेंद्रिये व्यापारी वर्ततु सुखे' म्हणजे शरीराला क्लेश न देता अध्यात्म आम्ही करतो. आमचा परमार्थ हलकाफुलका आहे. आतून बाहेरचा आहे.' मी म्हटलेले 'तू मानसा हळूहळू नियम करी' हे वाक्य संध्याकाळ पर्यत खोलीत स्वामीपर्यत एका सेवकाने नेले. त्यावर श्रीही मनमोकळे हंसल्याचे तो सेवक म्हणाला.

एके दिवशी सकाळच्या वाचनाच्या मध्यंतरांत विश्रांतीच्या दहा मिनिटात आमच्या गप्पा चालल्या होत्या. 'मोठ्याने वाचन केल्याने फार भूक लागते." असे

श्री. दामले म्हणत होते. विष्णू मंदिराजवळ खाण्याची काही सोय नव्हतीच. आश्चर्य म्हणजे त्याच वेळी आश्रमातून श्री. दातार आमच्यासाठी खिचडी घेऊन आले. श्री-सद्गुरु काही कमी पडू देणार नाहीत, कल्पतरुच अशी प्रचीति आली.सातव्या दिवशी अभंग ज्ञानेश्वरीचे वाचन सपत आले होते. श्रीच्या सूचनेवरून श्रीस्वामी सत्यदेवानंद सरस्वती व श्री. अशोक रेळेकर त्यावेळी मंदिरात आले. वाचन संपताना आनंदाने अश्रु आले. श्रीसत्यदेवानंद सरस्वती स्वामीनी गीतापठण केले. आरत्या वगैरे म्हटल्या.

अभग ज्ञानेश्वरी वाचन सपले. आम्ही सध्याकाळी परत आलो. श्रीस्वामीनी आतून निरोप पाठवला. 'उद्या संपूर्ण भावार्थगीता वाचन करा.' आठव्या दिवशी सपूर्ण गीता वाचन करायचे असते हे मला माहीत नव्हते. आम्ही दररोज ते ते अध्याय वाचत होतो हे स्वामीना कळवले. त्यावर आतून निरोप आला—'तुम्हास वेळ नसेल तर पहिला व बारावा अध्याय वाचा' आम्ही शरमलो, आम्हाला एकदाच काय, पण दोनदा गीता वाचण्याइतका वेळ होता. दुसऱ्या दिवशी सपूर्ण भावार्थ गीता वाचन केले.

नतर उद्यापनासाठी श्रीस्वामीनी श्री. तात्या पाथरे याजकडून विचारणा केली. ह्यावर आम्हास काही कल्पना नाही, स्वामी सांगतील तसे करायचे असे मी म्हटले. काही खर्च येईल अशी कल्पना येऊन आत मध्ये तिघांचे पैसे पाठवले. तद्नंतर उद्यापनाचा दिवस स्वामीनी ठरविला. एक मेहुण स्वामीनीच सागितले. त्या दिवशी ब्राह्मणास व सवाष्णीस देण्याची दक्षिणा सहा कागदाच्या पुड्यात आमच्याकडे पाठविली, स्वत: स्वयपाकाच्या सूचना दिल्या. आम्ही दिलेल्या पैशाच्या मानाने ब्राह्मण सवाष्ण दक्षिणा स्वयपाक खर्च सर्वच जास्त होता. पण ती योजना स्वत. सद्गुरूनीच केली होती. असा आमचा सप्ताह सपला. श्री. स्वामीनी आम्हास चागलेच शिक्षण त्या काळांत मोठ्या प्रेमाने दिले.

**संकल्प-साधनासिद्धी :**

श्रीस्वामीचा देह मिरवणुकीने समाधिस्थळाकडे चालला होता. 'रामकृष्णहरि' मंत्राचा घोष चालू होता. परमभक्त श्री. पानसरे काकांना हाताचा आधार देत मी चाललो होतो. मनात समिश्र भावनाची आदोलने चालली होती. पावसच्या ऋणानु-बधासबधी विचार चालले होते. ह्या दिवशी आपण पावसमध्ये आहोत ह्याचे थोडेसे समाधान होते. इ. स. १९६२ पासूनच्या पावस भेटी आठवत होत्या. सकल्प-साधना-सिद्धि ह्याचे अर्थ इतरांना कसेही असोत, माझ्या दृष्टीने मात्र श्रीस्वामीच्या दर्शनास जाण्याची प्रथम इच्छा झाली. हाच सकल्प इ. स. १९६२ ते १९७४ पर्यंत वारवार बारा वर्षे दर्शनास गेलो हीच साधना झाली आणि सदैव स्वामीची प्रेमळ कृपा दृष्टी हीच सिद्धि लाभली.



# संसार भगवंताचा

–सौ. कमल जोशी, सांगली

आपण म्हणतो तो त्रयोदशाक्षरी मंत्र स्वामीच्या मुखाने सांगून घ्यावा. आपलं करणं फलदायी होणार नाही असे मन बजावून सागत होते. अखेर धारिष्टच धरून तात्या पाथरेना म्हटले, "मी आत स्वामीच्याकडे जाऊ का हो ? मी काही त्यांना विचारणार आहे." त्यांनी स्वामीना विचारले. खोलीत गेले. तुमच्या मुखाने मला माझा मत्र सांगा आणि १३–१४ वर्षाची असताना टाळमृदुगाचे नाद, भजन चालू आहे. मी स्वस्थ डोळे मिटून बसले आहे, असे स्वप्न मला पडले होते. त्यावेळी स्वप्नात म्हटलेला मत्र अभग पुष्कळ दिवस माझ्या लक्षात होता. नतर मी विसरले. तो तुम्ही सागाल का ? " ते ऐकून स्वामी अगदी मनापासून हसले. त्या दिव्य हास्याने जणू खोली व्यापून उरली आहे आणि कोणी तरी अमृताचा वर्षाव माझ्यावर करीत आहे, असे मला वाटले. " बर, सध्याकाळी आरतीनंतर बोलावतो " स्वामीनी सांगितल. मनाची हुरहुर थांबली. पण जाता जाता म्हणाले, ' मुले, पती ह्या सर्वांना घेऊन का आत आला नाही !' ' मी म्हटले तुम्हाला त्रास होईल. मुले फार दंगा करतात.' ते गप्प बसले. पण ' सहज बोलणे हितोपदेश ' हे संतांचे लक्षण मला त्याना ह्यातून शिकवावयाचे होते.

आरती झाली. ठरल्याप्रमाणे खोलीत अगदी कॉटजवळ गेले. स्वामी म्हणाले, " तुम्ही म्हणालात, मी श्रीराम म्हणते. पण आम्ही सोऽहम् देतो. सकाळीच सागणार होतो. ' मी म्हटल, " मला काही माहीत नाही. मी आपणाला आपण समर्थ (रामदास) आहात असे समजते. आत्मा एकच आहे. अस आपण म्हणता ना ?" यावर त्यानी सागितल, 'मी सागतो ते आणि तुमचा मत्र याचा अर्थ एकच आहे.' यानतर कसे कसे करायचे ते सांगितले. हे चालू असताना धाकटा गडबड करून बोलू लागला, थोरला दाराजवळ जाऊन पडला. ससारे ओरडले, " अहो त्या मुलाना घेऊन बाहेर जाण्यास सांगा." पण सागणार कोण ? सारी शुद्धबुद्ध हरपली होती. एकवार नानाच्याकडे पाहिले मात्र. दुसरीकडे माझे कुठेच लक्ष नव्हते. स्वामीनी पाहिल, पण हे सारे माझ्यापासून कोठे तरी दूर घडत आहे असे वाटत होते. ह्याच्याशी त्या क्षणी माझा काडीमात्र सबध नव्हता. स्वामीनी एक नजर दाराकडे टाकली. " हा ससार भगवताचा. आपणही त्याचेच. आनदात जन्माला आलो. आनंदात जगायचे आणि आनंदात विलीन व्हायचे. हे तत्व नेहमी डोळ्यासमोर ठेव. " असे त्यानीच मला सागितले होते !



# के गुरुगौरव वर्णितां उन्मेष असे ?

– म. दा. भट, पुणे

राजयोगी स्वरूपानंद : माझे सद्‌गुरू

परमपूज्य स्वामी स्वरूपानद दर्शनास येणाऱ्यास क्वचित काही वाचावयास सागत असत. मुगीचे मन ओळखण्याचे सामर्थ्य योगी पुरुषांत असते असं म्हणतात. ह्याची प्रचीती मी सद्‌गुरू स्वामी स्वरूपानदांजवळ अनेक वेळा घेतली आहे. दर्शनास येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनातील अगदी सूक्ष्म भाव, विचार आणि कल्पना कळून घेण्याचे अलौकिक योगसामर्थ्य स्वामीजवळ होते, याचे अनेक दाखले मजजवळ आहेत. एखादी व्यक्ती एखादं वाचन जेव्हा त्याच्यासमोर करी तेव्हा त्या व्यक्तीच्या अतर्मनात उठणारे सूक्ष्म विचारतरग जसे परमपूज्य स्वामीना कळावयाचे तसेच त्या व्यक्तीने त्यातून नेमक काय घ्यावयाच आहे; स्वामीना काय सागावयाचे आहे, यासंबधी अगदी नकळतच एक गुप्त अशी समज वाचणाऱ्यास देऊन टाकण्याचे सामर्थ्य-सुद्धा स्वामीपाशी होते. किबहुना माझ्या अनुभवाजवळ मी अस खात्रीपूर्वक म्हणू शकतो की, अशा वाचनप्रसगी स्वामीना काय सागावयाचं होत त्या विचाराची वा तशा कल्पनेची जाणीव वा समज वाचणाऱ्याच्या मनात अगदी निखालस अशी उत्पन्न करण्याची योगिक ताकद सुद्धा स्वामीत वसत होती.

स्वामी अत्यंत कनवाळू होते. अलिकडे विशेष नाही. परतु इ. स. १९६७ पूर्वी विशेषेंकरून दर्शनास येणाऱ्या साधकाकडून प्रत्यक्ष काही वाचून घेऊन ग्रथाच्या माध्यमातून व्यक्तीशी बोलण्याचा मार्ग स्वामी अवलंबित असत. जिज्ञासू साधकाला काही तरी सागाव अस त्याना वाटे. सिद्धीचा वापर तर करावयाचा नाही. आपल्या-जवळ असलेल्या वाक्‌सिद्धीचा वा इतर सिद्धीचा मागमूस सुद्धा इतरेजनाना लागू नये म्हणून शब्दाने विशेष बोलावयाचे नाही, असा त्याचा दडक असे. त्यातून दीर्घ साधने-मुळे पुढे पुढे स्वामी सहज असे अमनस्क व्हावयाचे. थोडसं बोलणं झाल की त्याना पुन्हा आत्मबोधाच्या ओवरीत विश्रांतीस जावे असे वाटत असावे. त्याच्याशी बोलणारा ह्या विषयात जरा जाणकार असला तर त्याला हे कळावयाच. व्यावहारिक दृष्ट्या मात्र ते आम्हाला म्हणावयाचे, ' आता जरा विश्राती घेतो. पुन्हा बघू. दुपारी बोलवीन.' इत्यादि. इ स. १९६५ नतर मात्र हळूहळू ते अगदी कमी बोलू लागले. इ. स. १९६५

मध्ये माझी बदली सांगलीहून पुणे मुक्कामी झाली. मला आठवतं की, पुण्याला बदलीवर येण्यापूर्वी मी सर्व कुटुंब घेऊन जेव्हा स्वामीच्या दर्शनास पांवस मुक्कामी गेलो होतो, तेव्हा ते मला म्हणाले होते, 'आता बोलणे कमी करणार आहे.' मुळांतच अगदी कमी बोलणारा हा महापुरुष आता कमी बोलणार म्हणजे काय असं कोणाला वाटेल. पण स्वामीच्या ह्या शब्दातसुद्धा अर्थ होता. तो मला कळला होता. पूर्वी दिवसातून काही विशिष्ट काळ तरी स्वामी मनाच्या सर्वसामान्य अवस्थेत येत असत. पण पुढे पुढे तो काळसुद्धा त्यानी कमी केला होता. किवा कमी झाला होता. पुढे अखड अशा समाधीत वा उन्मनीत ते असत. प्रकृतीचं कारण इत्यादि सर्व लौकिकदृष्टया होत. शरीर जोपासण्याइतका मोजका आहार गेल्या २०–३० वर्षात घेणाऱ्या ह्या महापुरुषाला माझ्या मते 'प्रकृतीच' मुळात राहिली नव्हती.

पुढे पुढे स्वामी स्वरूपानद केवळ प्रकाश होऊन राहिले होते. 'पुढे उन्मनीचे शेवटी । देवभक्ता अखड गाठी ।।' अशी त्याची स्थिती होऊन राहिली होती. 'उन्मन्यते परमशिव:' असे स्वामी परमशिव होऊन ठाकले होते. उन्मनीबद्दल विषय आलाच आला आहे म्हणून लिहितो मी ह्या अवस्थेतील परमयोगी पाहिले आहेत तशातऱ्हेच्या श्रेष्ठतम महायोग्याच्या सहवासात मी आलो होतो. काहीकडून मार्गदर्शन, अनुग्रह इत्यादीचे योगसुद्धा माझ्या आयुष्यात पूर्वपुण्यप्रतापे आले परमपूज्य बाबा महाराज सहस्रबुद्धे हे आमच्या सप्रदायातील विद्याविभूषित असे अलिकडील काळातील अखड उन्मनीत राहणारे असे महायोगी होते फलटणचे परमपूज्य गोविंदमहाराज उपळेकर हे सुद्धा विद्याविभूषित असे अखड उन्मन अवस्थेत राहणारे एक महायोगी होते. इस्लामपूरचे धोडीमहाराज हे नाथसप्रदायातील कानफाटचा शाखेतील एक अवधूत महायोगी होऊन गेले सागली जिल्ह्यातील रेवणसिद्धाचे डोगराजवळ अकबरबावा नावाचे असेच एक उन्मनी अवस्थेतील योगी होऊन गेले हे आणि अशासारखे इतर उन्मनी अवस्थेतील योगी मी अगदी जवळून पाहिले आहेत. त्याच्याशी बोललो आहे. ह्या माझ्या सर्व अनुभवावरून मला अस म्हणावस वाटत की, योगशास्त्रदृष्टया अतिश्रेष्ठ तुर्येपलिकडील सपूर्ण अमनस्क अशा ह्या उन्मनी अवस्थेतसुद्धा सर्वसामान्याच्या दृष्टीने पाहिले तर इद्रधनुष्यातील निरनिराळ्या रगाप्रमाणे काही निरनिराळ्या छटा असू शकतात योगसहितेत सुद्धा अस निवेदन केल गेल आहे.

परमपूज्य स्वरूपानदाना मी अगदी जवळून पाहिले आहे समाधीत पाहिले आहे. तसेच चलनवलन होताना, चालताना, बोलताना आणि सर्वसामान्य व्यवहार करताना उन्मन अशा अवस्थेत म्हणजे अगदी हरवलेल्या स्थितीतसुद्धा मी त्यांना पाहिलं आहे. अशा अवस्थेतसुद्धा ते अगदी परमशात असत. त्याच्यातील सत्त्वगुणाचा हा पगडा त्यांच्या त्या उन्मन अवस्थेत सुद्धा जाणकाराला लगेच समजून यावयाचा. सत्त्व गुणाच्या अशा या अलौकिक पार्श्वभूमीवर परमपूज्य स्वामीनी ज्ञानोत्तर अशी

अखड सोऽहम्–साधना केली होती आणि म्हणूनच मला असं वाटतं की, ते गीतेतील उत्तम पुरुष, पुरुषोत्तम असे होऊन राहिले होते. असो.

स्वामींजीच्या आठवणी म्हणून खाली दोन प्रसंग देतो. सर्वच आठवणी देणे ह्या छोटया ग्रंथांत अप्रस्तुत होईल. खालील आठवणी देताना हेतु मात्र असा की, त्या निमित्ताने तरी मी पुन्हा एकदा स्वामीजवळ गतकाळात जाऊन सद्‌गुरू चिंतनाने पुनीत होईन.

**स्मृती १ ली :**

**सकळ धर्मामध्ये धर्म ।**
**स्वरूपी राहणे हा स्वधर्म ।**

श्री. बाबालाल पठाण हे एक मुसलमान धर्मी स्वामीभक्त मल्हारपेठ जिल्हा सातारा येथे असतात. इ. स. १९६२ पासून ते पावस मुक्कामी परमपूज्य स्वामीकडे येत असत. हे मुसलमान गृहस्थ आणि पावसला स्वामीकडे इतक्या भक्तीभावे येतात म्हणून मला प्रथमपासूनच मोठे कुतुहल वाटत असे. पुढे बाबालाल व माझी मैत्री जमली. स्वामीना त्यानी हस्तलिखित ज्ञानेश्वरी स्वहस्ते लिहून अर्पण केली आहे. ह्या स्वामी भक्ताने ज्ञानेश्वरी, दासबोध, एकनाथी भागवत इत्यादि पारमार्थिक ग्रथ वाचले आहेत. अशी माहिती स्वत: श्री. पठाण याजकडूनच मला समजली होती. पावसला माझी व श्री. पठाण याची अनेक वेळा एकत्र अशी गाठ पडत असे. योगायोग मोठे विचित्र असतात हेच खर. जुलै इ. स. १९७४ अखेर स्वामीची प्रकृती एकदम बिघडली. आमचा पुढचा प्रवास चालू झाला आहे, अस खुद्द परमपूज्य स्वामीनीच केद्राना व साधकाना कळविण्यास सागितल होत. आम्ही सर्व आम्हाला कळल्यामुळे पावसला निघालो. पुण्याहून निघालेल्या एका स्पेशल गाडीत मी होतो. गाडी मल्हारपेठजवळ आली आणि मला आठवण झाली ती पठाणची. विचार केला ह्या स्वामीभक्ताला ही बातमी कोण देणार ? गाडीतील सद्‌भक्ताना जरा विनंती केलो. गाडी मल्हारपेठेत जरा उभी केली. पठाणला गाडीजवळ येण्यासाठी म्हणून घरी निरोप पाठविला. पठाण आला. त्याला कडकडून भेटलो. म्हटल, ‘पठाण स्वामी जातो म्हणतात.’ पठाण रडू लागला. म्हटल, ‘तुझ्याजवळ पैसे आहेत ना पावसला यावयास, नाही तर मी देतो.’

‘नको नको साहेब, तुम्ही व्हा पुढ. मी सकाळच्या पहिल्या गाडीने येतोच पहा’ पठाण म्हणाला दुसऱ्या दिवशी पठाण पांवसला आला. आम्ही सर्व शहरी माणस साहेबाला घाबरलो. व्यवसायाची काळजी केली. मुलाची काळजी केली. लगेच परत आलो. परंतु हा पठाण मोठा जिद्दीचा स्वामीभक्त. पंधरा–वीस दिवस पांवसला राहिला. स्वामी संन्निध पावसापाण्यात पत्नी–मुलांना घेऊन. जुलैत पांवसहून जेव्हा

पुण्यास परत येण्यास निघालो तेव्हा त्याचा निरोप घेताना तो मला म्हणाला, ' साहेब बरं नाही वाटत. मन नीघ म्हणून सांगत नाही. ' सद्गुरूंचा एक परधर्मी परमशिष्य आणि त्याची ही एक गोष्ट.

एकदा असाच देसायाच्या ओटीवर बसलो होतो. शेजारी पठाण पण परमपूज्य स्वामीजीचे दर्शन वगैरे आटोपून मजजवळ बसला होता. पठाण मला म्हणाला, 'नित्यपाठातील एका ओळीचा अर्थ मला माझ्या दृष्टीने सागता का ?' मी म्हणालो, 'मी काही ज्ञानी नाही. त्यातून ओटीवर तर मुळीच नको.' परंतु माझं हे म्हणणं ऐकून सुद्धा पठाणाने ओवी उच्चारली होती. मला अर्थ विचारला होता. ती ओवी अशी--

स्वधर्म जो बापा ।<br>
तो नित्ययज्ञ जाण पा ।<br>
म्हणौनि वर्तता तेथ पापा ।<br>
संचारू नाही ।।

' पठाण परधर्मी गृहस्थ आणि अर्थ विचारतो वरील ओवीचा. मला म्हणतो, ' माझा धर्म काय. ह्या ओवीचा अर्थ माझ्या दृष्टीने मी कसा लावू. ' प्रश्न मोठा मार्मिक होता. मी जरा बिचकलो. म्हटल, ' मला त्या दृष्टीने अर्थ तुला सागता येत नाही. डॉ. मिराशीना विचार.' आमच हे बोलण सपल होत. खोलीत परमपूज्य स्वामीना ते समजल होत. आतून डॉ. मिराशी बाहेर आले. पठाणला म्हणाले, स्वामी सागत आहेत, ' सकळ धर्मामध्ये धर्म । स्वरूपी राहणे हा स्वधर्म । ' स्वत.च्या निजस्वरूपात राहणे स्वस्वरूपी राहणे हाच आता तुमचा स्वधर्म. मग वरचा धर्म काही का असे ना ! ' स्वामीनी दिलेले उत्तर ऐकून पठाण आनदित झाला. मला पण मोठा आनद झाला. त्या उत्तराला तोड नव्हती आम्ही सर्व कसे अगदी गप्प बसलो.

**स्मृती ( २ )**

**रामनामच सांगणार आहे--**

गोव्याचे एक सद्गृहस्थ श्री. नाईक स्वामीजीचे परमभक्त आहेत. एकदा श्री. नाईक आपले एक मित्र प्रा. तळवलीकर यास घेऊन स्वामी दर्शनासाठी म्हणून पांवस मुक्कामी आले. मी स्वत: त्यावेळी पावसलाच होतो. प्रा. तळवलीकर यानी पूर्वीच सर्व हकिकत मला रात्री आश्रमातच सागितली होती.

--प्रा. तळवलीकर याना अगदी लहानपणीच मातृपितृवियोग झाला होता. त्यांचं पालनपोषण त्याच्या वृद्ध आजीने केल होत. गोव्यात देवदेवस्कीचे प्रकार जास्त म्हणून प्रा. तळवलीकर याच्या आजीने त्याना अगदी लहानपणीच सागितले होते, ' बाळ, रात्री रामनाम घेत जा राम तुझं रक्षण करील ' आजीची आज्ञा व प्रेम म्हणून प्रा. तळवलीकर लहानपणापासूनच नित्यनेमे रामनाम घेत असत. पुढे त्यांची

वृद्ध आजी निवर्तली. ते मोठे प्राध्यापक झाले. भरभराटले. म्हणून त्यांची रामनामावर आणि रामभक्तीवर विशेष श्रद्धा होती. ह्या सर्व पार्श्वभूमीवर गोव्याहून निघतानाच त्यांनी श्री. नाईक यांस असं सागितलं होते की, तुमचं सोऽहम् वगैरे काय असावयाचं ते असो. मी मात्र रामनाम सोडणार नाही.

सकाळी प्रा. तळवलीकर स्वामीजीच्या खोलीत दर्शनास म्हणून गेले. स्वामीनी आपली सजीवनी गाथा त्याना प्रसाद भेट म्हणून दिली आणि खालील अभंग वाचण्यास सागितला :

**श्वासोच्छ्वासी देख राम-नाम जप।**
**होतो आपोआप अखंडित ।।**
**तेथे रात्र दिन ठेवी अनुसंधान।**
**सांडूनी मीपण सोऽहं भावें ।।**
**राम-नामी चित्त रंगतां स्वानंदें ।**
**सुखें हातां चढे तत्त्व-बोध ।।**
**होता तत्त्व-बोध लाभे पराशांति ।**
**जीवासी विश्रांती स्वामी म्हणे ।।**

प्रा. तळवलीकरानी वरील अभग वाचला त्याचे नेत्र प्रेमाश्रूनी भरून आले. त्यानी स्वामीना प्रणिपात केला. स्वामीनी आशीर्वाद देत त्याना सागितल होतं, तुम्हाला अस रामनामच सागणार आहे. प्रा. तळवलीकराना नतर स्वामीनी अनुग्रह दिला आणि त्याच दिवशी गोव्याचा हा रामभक्त पावसच्या रामाचा भक्त झाला.

इ. स. १९६२ ते १९७४ या कालखंडात परमपूज्य स्वामी स्वरूपानदाकडे मी अनेक वेळा गेलो प्राय. दर दोन महिन्यानी मी पावसला जात असे. स्वामीच्या योगशक्तीच्या अशा अनेक गोष्टी मी अनुभवल्या आहेत आणि काही पाहिल्या आहेत. या सर्व गोष्टी एकत्र केल्या तर एक लहानसे ‘ लीलाचरित्र ’ तयार होईल. साप्रत स्वामी स्वरूपानद–‘ एक अलौकिक राजयोगी ’ हे पुस्तक मी तयार करीत आहे. स्वामीच ते मजकडून पूर्ण करून घेतील. असो.

# गुरूबधूंचे मित्रप्रेम

– श्री. वि. गो. ( काका ) लिमये, पुणे.

स्वामी स्वरूपानंद आणि मी गुरूबधू. आमचे मैत्रीचे सबध जवळजवळ पंचावन्न वर्षांचे. मुबईस आम्ही एकत्र असताना अनेक विषयावर चर्चा करीत असू. सद्गुरू बाबा महाराज वैद्य यांच्या दर्शनास आम्ही मुबईस व पुढे पुण्यास नित्य जात असू. ' तुम्ही दोघे चागले जोडीदार आहात ' असे ते म्हणत. पण मी माझी पायरी ओळखूनच होतो. पुढे स्वामी पावसला राहायला गेले तरी आमचे जिव्हाळ्याचे सबध टिकून होते. आमची ' अद्वैत ' मैत्री होती. आमचे ' एकतेचे ' नाते होते. हे अतुट नाते मला स्वामींच्या विनतीवरून पावसला जाण्याचा योग आला तेव्हा पुन: प्रत्ययास आले; त्यावेळच्या गाठीभेटीचे प्रसंग सस्मरणीय ठरले.

' जमल्यास तुम्ही एकदा पावसला या ' असे मला स्वामीचे निरोप येत. प्रकृती अस्वास्थ्यामुळे दृष्टी मदावल्यामुळे मी जाण्याचे टाळत होतो. पण तीन तीनदा निरोप आले. त्यामुळे जाण्याचे योजले. मला घेऊन जाण्यास त्यांनी तीन मडळी पाठवली. सर्वश्री देवळेकर, मालवणकर, देसाई–आम्ही १९६५ साली उत्सवाच्या वेळी पावसला गेलो. स्वामीचे दर्शन होताच त्यांना हार समर्पण करून मी नमस्कार केला. त्याचे अंत:करण सख्य भावाने भरून आले. जणू आमची ही कृष्ण–सुदामा भेटच ! मी सुदामा ते कृष्ण.

पुढच्या आठ दिवसात स्वामीच्या सूचनेवरून माझी व्यवस्था देसाई यांचे घरी एखाद्या घरजावयासारखी ठेवली गेली. मला स्वामी रोज भेटीस बोलवत. एकमेकांचे हृद्गत समजून येई. मला ते अगदी आपल्याजवळ गादीवर बसावयास सांगत. मग सद्गुरूंच्या दर्शनाचे वेळचे प्रसंग आठवत. या मुक्कामात मला भेटण्यास व नमस्कार करण्यास मंडळी येत. त्यामुळे मला ओशाळल्यासारखे वाटे ! " पुष्पासंगे मातीस वास लागे " अशी माझी स्थिती. माझ्या सुखसोयीकडे त्यानी किती लक्ष द्यावे !

या आठ दिवसात मी धुद झालो होतो. सद्गुरुकृपेने मला गीतेची गोडी लागली होती, जन्मदात्या मातेचे प्रेम होते आणि स्वामी स्वरूपानदांसारखे मित्र लाभले. गीता, माता आणि भ्राता या त्रयीच्या लाभाने माझे जीवन धन्य झाले. पांवसच्या भेटीने माझे मन हलके झाले, काळजी दूर झाली. माझे हे अनुभव ' माझी पांवसची यात्रा '

या एका पत्रातून मी लिहून स्वामीचे कडे पाठविले होते. माझ्या मित्रप्रेमाचे रूपांतर आता भक्तीप्रेमात झाले आहे. माझा मुलगा चि. श्रीराम, त्याची सुविद्य पत्नी व मुले यांच्यावर स्वामीची कृपादृष्टी आहे. मला व मुलांना ते नित्य खाऊ पाठवत. माझ्या-साठी स्वतंत्र डब्यात आंब्याचा मावा असे. मी तो आवडीने स्वामीचा प्रसाद म्हणून घेई. असे मित्रप्रेम क्वचितच अनुभवास येते "मित्रं प्रितीरसायनं नयनयोः आनंदनम् चेतसः" याची अनुभूती येई.

माझा मुलगा चि. श्रीराम पावसला गेला त्यावेळी त्याने सहज विचारले होते की, 'स्वामी आपली व काकांची भेट केव्हा झाली'—त्यावर ते हंसून म्हणाले, 'अरे, काका व मी रोज सायकाळी ७ वाजता प्रार्थनेच्या वेळी एकमेकास भेटतो.'...ही 'सत्य' कथा आहे. मला रोज सायकाळी स्वामीचे दर्शन होते—अजूनही सतत होत असते

माझे आज वय ८० पूर्ण. आता कोणतीही आशा राहिली नाही. हवे आहे ते 'क्लेशरहित संतोषी जीवन, प्रयाण काळी सोऽहं स्मरण आणि परमार्थ चितन.' ही देहाची कुडी सोडून दिव्य लोकात जाईन तेव्हा माझ्या प्रेमस्वरूप मित्राची प्रथम भेट घेईन आणि त्याच्याच पायापाशी बसून 'रामकृष्ण हरि' मत्र जपत राहीन.'

स्वामी स्वरूपानदाना एक गुरुबधू, एक जिवलग स्नेही एवढ्या शिदोरीवर माझ्या जीवनाची वाटचाल आजवर भाग्याने होत गेली; तेच भाग्य माझ्या जीवनाचा नदादीप त्या दिव्य तेजोज्योतीत विलीन होईपर्यंत लाभो हीच परमेश्वरचरणी प्रार्थना.



# बालमित्राचे हितगुज

– डॉ. बाबा देसाई, पांवस–रत्नागिरी.

( १ ) " मी व स्वामीजी दोघेही बालमित्र; आमचे हितगुज चाले. आम्ही त्याना आप्पा म्हणत असू. १९३४ साली आम्ही दोघे पुण्यास एकत्र राहात होतो. माझा वैद्यकीचा अभ्यास चालू असे व श्री. आप्पाचे टिळक महाविद्यालयातील शिक्षण चालू असे मला वेळेवर उठवण्याचे, माझी खोली कपडे, पुस्तके आवरण्याचे, मला रोज शिरा करून खायला घालण्याचे व वेळेवर वैद्यकीय विद्यालयात पाठवण्याचे मित्र-कार्य आप्पानी सातत्याने केले. आज मला ह्या गोष्टीची आठवण येते व केवढ्या मोठ्या मनाच्या सतश्रेष्ठाकडून मी माझी साधी साधी कामे करून घेत असे याचा अचबा वाटून मन ओशाळते 'भगवान गोपाल कृष्णाला मी माझा सखा-मित्र मानले व त्याला माझे सारथ्य करायला लावले.' याची खत अर्जुनाला शेवटी शेवटी झाली, त्याप्रमाणेच मला वाटते

( २ ) १९३४ साली स्वामीचे जिवावरचे दुखणे टळले त्यानी मला " असेल तसा निघून ये " असा निरोप पाठवला आणि तो पोचताच मी तडक निघालो व सतत त्याच्याजवळ राहिलो त्या दुखण्यात मला ते सतत जवळ बसण्यास सागत. मी रात्रदिवस त्याना न विसबता त्याच्या उशा–पायथ्याशी बसून राही. छातीवर हात ठेवून रात्रदिवस जागा राही. औषधापेक्षा आपला जिवलग मित्र आपल्याजवळ सतत आहे, या विश्वासाने स्वामीना बरे वाटू लागले. ते नतर दुखण्यातून बरे झाले; आमच्या घरी अनत निवासात राहायला आले ते कायमचे जीवनाच्या अखेरच्या क्षणापर्यंत !

( ३ ) येरवड्याच्या तुरुगातही आम्ही एकत्र होतो. स्वामीनी तुरुगात आपल्याला कोणत्याही सवलती मागितल्या नाहीत. इतर मंडळी, स्नेही श्री. एस. एम. जोशी, गं. बा. सरदार, आचार्य वि प्र. लिमये, डॉ. हर्षे, शकरराव देव वगैरे गप्पा मारीत हसत खेळत विनोद करीत, पण आप्पा मात्र बाजूला ध्यान करीत बसत. 'अहो रामभाऊ, असे काय साधू–संन्याशासारखे ध्यान करीत बाजूला बसता ? तुम्ही 'स्वामी' झालात की काय ? " असे श्री. एस. एम. जोशी एकदा थट्टेने म्हणाले आणि खरेच त्या दिवसापासून सर्व मित्र त्यांना 'स्वामी' म्हणू लागले. स्वरूपानंद ही बिरुदावली

त्यांना त्यांच्या सद्गुरूंनी, परमपूज्य बाबामहाराज वैद्य यांनी दिली. स्वामीची गुरुभक्ती, ईश्वरनिष्ठा, तन्मयता व साधना जाणून " स्वरूपानंद " ही पदवी त्यांना मिळाली होती. हीच सद्गुरूंची कृपा व हाच प्रसाद फलदायी ठरला.

( ४ ) स्वामीना मी थट्टेने म्हणे, " तुम्ही एवढी साधना करता, तुम्हाला सिद्धी प्राप्त झाली असेलच, मग त्याचे प्रत्यतर आम्हाला का नाही दाखवत ? तुम्हाला तशी सिद्धी प्राप्त झालीच नसावी. "

यावर स्वामीनी उत्तर दिले, ' सिद्धी आणि चमत्कार याचा आविष्कार करू नये असा योग मार्गातला दंडक आहे. चमत्कार करणे हे गौण मानले जाते. माझ्याबद्दल म्हणाल तर मला अशी सिद्धी प्राप्त झाली आहे त्याचे प्रत्यतर मी एक दोनदा अनुभवले आहे आणि येथेच मी थांबलो आहे. त्याचे प्रदर्शन करण्याची माझी इच्छा नाही— दुसऱ्यांना सागण्यासाठी तर नाहीच नाही "

पुढे ते मला म्हणाले, " बाबा, तुमच्या सारखा मनुष्य सतत इतकी वर्षे माझ्या-सारख्या परमार्थी माणसाच्या सान्निध्यात राहतो, हा काय साधा चमत्कार आहे ! " त्यावर आम्ही दोघे खळखळून हसलो. मी पुन्हा हा प्रश्न स्वामीना विचारला नाही. स्वामीच्या कृपा वरदहस्तात, स्पर्शास तसेच दृष्टीक्षेपात प्रसादात अनेक चमत्कार घडत; पण त्याचे स्वरूप आदेश, सदेश मिळणे, समजून येणे, पूर्वसूचना मिळणे, अपघात टळणे, मन.शाती लाभणे, समाधान मिळणे, सोऽहं बोधावर येणे अशा प्रकारचे असत. खऱ्या साधुसंताचे हेच लक्षण असते असे मला समजून आले

( ५ ) केडगाव बेटाचे सुप्रसिद्ध नारायण महाराज पावसला एका भक्ताकडे ( कै. आत्मारामपत वैद्य ) येण्यासाठी तरीपलिकडे येऊन थाबले होते. त्याना नेण्या-साठी एका खास मोटारीची व्यवस्था केली होती. स्वामी त्यावेळी सायकल वर बसून रत्नागिरीहून आपला मित्र सावत याचे औषध घेऊन परतीच्या मार्गावर होते. त्यावेळी सत नारायण महाराज याना नेण्यासाठी आलेल्या श्री वैद्य यांनी स्वामीना सुचविले, " तुम्ही मोटारीत बसून महाराजाबरोबरच पावसला चला. तुमची सायकल टपावर ठेवतो. ' स्वामीनी होकार दिला. योगायोगाने स्वामीना महाराजाचेजवळ पुढे बसायला मिळाले. ' अर्ध्या तासात त्याच्या सान्निध्याने मला मन.शांती लाभली, ' असे स्वामी म्हणाले. ज्या पुरुषाच्या सान्निध्यात आपल्याला मनःशाती लाभते तो थोर पुरुष होय, असे स्वामी नंतर म्हणाले. श्री. वैद्य हे माझे श्वशुर. त्यामुळे मी स्वामीस नारायण महाराज कसे आहेत हे विचारले. कारण श्वशुरामुळे मला त्यांना नमस्कार करावा लागणार होता.

( ६ ) आपल्या वहिनीनी वर्षातून एकदा तरी काही दिवस आपल्या स्वतःच्या गोडबोले यांच्या घरी येऊन राहावे. मूळ देवांची पूजाअर्चा करावी. फळझाडे,

फुलझाडांची व्यवस्था पाहावी असे स्वामींना वाटे. "इतक्या लांबून एवढा खर्च करून दरवर्षी आम्हाला येणे परवडणार नाही," अशा आशयाचे एकदा पत्र आले. त्यावर स्वामीनी वहिनीना उलट टपाली लिहिले. ' तुम्ही फक्त येथे येण्याचे ठरवा." वहिनी मग मुलाना घेऊन आल्या. महिनाभर राहिल्या. त्यावेळी घरी स्वामीनी सर्व शिधा-सामुग्री, किराणा माल, जळण, काटुक अगोदर आणून ठेवले होते. दूधदुभत्याची सोय केली व परतीच्या वेळी तिकीट काढून हाती ठेवले. त्यानंतर वहिनीनी दरवर्षी पांवसेस येण्याचा उपक्रम सुरू ठेवला. आपला कुळाचार, शेती, घरदार याकडे लक्ष असावे असे त्याना वाटे. वास्तविकपणे त्याचे स्वतःचे असे काही पाश नव्हते. तरी ही व्यापक कुलाभिमानाची दृष्टी होती.

( ७ ) स्वामीच्या शेवटच्या कालखडात मी सायकाळी, रात्री वस्तीस असावे असे त्याना वाटे. त्याप्रमाणे मी वस्तीस राहात असे. ओटीवर बसून असे. एकदा स्वामीनी मला मोठचा अपघातातून वाचविले. त्याची आठवण झाली की माझ्या अगावर अजूनही शहारे येतात. १५ ऑगस्ट १९७४ चा दिवस. स्वामीच्या जीवनातला अखेरचा ठरला ! त्यानी आपली अवतार समाप्ती केली. एखादी उदबत्ती शातपणे जळून सुगध पसरवून विझते त्याप्रमाणे ! मी सतत जवळ होतो. ८।।। वाजता त्यानी थोडे दूध मागितले. तत्पूर्वी दोन–तीन दिवस ते समाधी अवस्था अनुभवीतच होते. एकदा सतत १९ तासांनतर २८ तास, नतर ३९ तास एका कुशीवर हात जोडून ते निवांत पहुडले होते. सर्व काळ ते ध्यानस्थ होते. समाधीची पूर्वतयारी व व्यवस्था त्यानी आपल्या इच्छेनुसार अगोदरपासून पूर्ण केली होती. ९ वाजण्याच्या सुमारास ते शात शांत झाले ! पार्थिव देह विसर्जन करून ते अनंतात विलीन झाले.

स्वामीच्या असख्य आठवणीनी अंतःकरण भरून गेले आहे. त्यामुळे येथेच आता थांबतो.



## सद्‌गुरू चरणी

– श्री. देवळेकर शेठ–व्यापारी, रत्नागिरी

माझ्या परम भाग्याने मी पावसच्या परमपूज्य स्वामी स्वरूपानदाच्या सह-वासात १९५४ सालापासून आलो. त्याचे मार्गदर्शन मला सतत मिळत गेले. त्याच्या कृपाप्रसादाने आणि प्रेमळ कृपाकटाक्षाने मी अनेक सकटातून वाचलो.

एकदा पोटदुखीने मी अत्यवस्थ झालो. अनेक उपाय केले. कोणत्याही औषधोप-चारानी माझी पोटदुखी थाबेना. ही हकिकत स्वामीच्यापर्यत कशी गेली कोण जाणे, पण त्यांनी एका साधकाच्या हाती उगाळून पोटावर लावण्यासाठी एक मुळी पाठवून दिली. मुळी उगाळून लेप पोटावर चोळल्याबरोबर हळूहळू पोटदुखी थाबली. माझ्या जिवावरचे दुखणे बरे झाले. त्या क्षणापासून माझ्या जीवनाची नौका मी स्वामीच्या हाती सोपवली. निर्धास्त राहिलो. पुढे आयुष्यात एक दोन जबरदस्त दुखणी सोसावी लागली. गॅसिस धरल्यामुळे एकदा मी बेशुद्ध झालो; पोट फुगले. जीविताची आशा संपली. अशा वेळी स्वामीचे स्मरण व त्यानी सांगितलेले उपाय केले आणि मी बरा झालो. एकदा असाच डायेरिया झाला होता प्रवासात असतानाच. सर्वांची घाबरगुडी उडाली. औषधोपचारासाठी, वाहनासाठी अमाप खर्च झाला, पण त्यातून वाचलो तो स्वामीच्या उपायांमुळे !

( २ ) स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळाची स्थापना झाली. त्यासाठी सभासदांना एकत्र आणून काही प्रकाशनांचे उत्सवाचे कार्य हाती घेतले ते आजतागायत अव्याहत सुरू आहे. उत्सवाच्या वेळी सर्व शिधासामुग्री गोळा करणे, पैसे जमवणे हे कार्य होत गेले. कधी कमी पडले नाही ही केवळ स्वामीची कृपा.

तिसऱ्या वर्षी उत्सवासाठी एक हजार मडळी प्रसादास येतील म्हणून त्याप्रमाणे शिधा जमवून स्वयंपाक तयार केला. पंक्तीवर पंक्ती उठू लागल्या. आणि काय आश्चर्य १५०० मंडळी जेवून गेली. तरी अन्न कमी पडले नाही. आम्ही आश्चर्याने थक्क झालो. ही हकिकत स्वामींचे कानी घातली. तेव्हा ते हसून म्हणाले, "शेठजींची व्यवस्था चोख अशी असते. असे अधिक पान होणार हे ओळखून त्यानी अशीच भरपूर व्यवस्था अगोदरपासून केलेली होती !" या कोणत्याही अद्‌भुत कृतीचा ते आपल्याशी संबंध जोडू देत नसत, हा त्यांचा केवढा मोठेपणा, केवढी अनासक्त वृत्ती !

( ३ ) स्वामींना आवडणाऱ्या काही वस्तू त्यांना आणून देऊन अर्पण कराव्या, अशी माझी इच्छा. व्यापाराच्या कामामुळे मला मुंबई–पुण्यास वरचेवर जावे लागे. स्वामीच्यासाठी मऊ पादत्राणे आणावी अशा उद्देशाने मी सर्वत्र हिंडलो, पण कोठेही मला ती मिळाली नाहीत. शेवटी मी मुबईस माधवबागेत गेलो. तिथे दुकानात हाथरीच्या पादुका होत्या त्या विकत घेतल्या व पावसला जाऊन स्वामीना अर्पण केल्या. मनात धाकधुक होती की, अशा पादुका स्वामीना पसत पडतात की नाही कोण जाणे ! पण आश्चर्य असे की, त्या पादुका पाहताच ते म्हणाले, "शेठजी, अहो बरोबर! अशाच पादुका मला हव्या होत्या." त्यापुढे जीर्ण झाल्यावर मी त्यांना नवा जोड आणून दिला आणि जीर्ण जोड प्रसाद म्हणून मागितला. त्यानी त्या देण्यास बरेच आढेवेढे घेतले, पण मी आग्रहच धरला. त्यामुळे नाईलाज होऊन त्यानी त्या माझ्या स्वाधीन केल्या व बजावले की, याची पूजा करायची नाही देवघरापाशी ठेवायच्या नाहीत . . .मी त्याच्या अटी मान्य केल्या व त्या माझ्या घरी आणल्या स्वामीचा प्रसाद म्हणून मी त्या जतन करून ठेवल्या आहेत. तो माझ्याजवळचा अमोल ठेवा आहे, असे मी मानतो मला प्रसन्न वाटते. मधून मधून मी स्वामीच्या आवडत्या वस्तू म्हणजे पत्राची जोडी, आसन, शर्टचे कापड त्याना देत असे किमतीचे कापड आणले म्हणजे ते नाकारत व म्हणत, ' या देहाला एवढ्या किमती प्रावरणाची काय गरज ? कमी माफक किमतीच्या वस्तू आणाव्या '

( ४ ) १९५७ साली स्वामी स्वरूपानद रत्नागिरीस आले त्यांचा मुक्काम श्री. बाबा देसाई, श्री रा य पराजपे याच्याकडे असे. त्याची मित्रमडळी, आप्त रत्नागिरीस पुष्कळच. स्वामीच्या मुक्कामात त्यानी काही दिवस माझ्या निवासस्थानी राहावे, अशी माझी तळमळ होती माझी विनती त्यानी मान्य केली व ते चार दिवस मजकडे माझ्या घरी राहिले माझ्या वास्तूला त्याच्या वास्तव्याने पावित्र्य आले.

या चार दिवसात मी स्वामीच्या भक्तमडळीना एके दिवशी स्वामीच्या पक्तीचा लाभ द्यावा म्हणून प्रसाद भोजनास बोलावण्याचे ठरविले. दिवस मुक्रर केला. तेव्हा स्वामी म्हणाले,'उद्या नको-परवा.' त्याप्रमाणे ७५ निमत्रित मडळी आली. मी शुचिर्भूत ब्राह्मण आचाऱ्याकडून स्वयपाक करून घेतला होता. त्या दिवशी प्रभात समय होताच स्वामी म्हणाले, ' आज माझ्या मातोश्रीचे श्राद्ध आहे. ते तुमच्या घरीच साजरे करू.' मला आनंद झाला व आश्चर्यही वाटले. माझ्या घरी श्राद्ध विधी उरकण्यात त्याना कसलाही कमीपणा वाटला नाही. उलट आनद झाला. श्राद्धविधी नतर प्रसाद भोजन झाले. भक्तमडळी तृप्त झाली. स्वामीच्या पक्तीचा लाभ आम्हा सर्व कुटुबियाना झाला. अगदी अत्यसमयीही त्यानी माझी आटवण काढली होती असे मला समजले.



# संसाराचा खेळ पूर्ण झाला !

– भाऊराव आठवले, दत्तस्थान, पुणे

परमपूज्य स्वामी स्वरूपानदांचा व माझा ऋणानुबंध फार जुना. त्याची आठवण स्वामीनीच मला करून दिली हे आश्चर्य ! स्वामी पुण्यास असताना टिळकरोडवरील 'विष्णुभवन' या आमच्या घरात बिऱ्हाडकरू म्हणून राहात होते व दरमहाचे भाडे देण्यासाठी आमच्या घरी येत. श्री. बाबा देसाई त्याचेबरोबर असत. अर्थात त्यावेळी मला त्याच्या थोरवीची पुसटही कल्पना नव्हती.

१९६६ सालापासून त्यांचा व माझा पत्रव्यवहार सुरू झाला होता. अभंग ज्ञानेश्वरीची प्रत मजकडे पाठवून त्यानी मला सागितले होते की, ही पहिली प्रत माऊलीना समाधीस्थानी आळंदीस अर्पण करावी. त्यासाठी त्यानी एक शाल व पन्नास रुपये पाठविले होते. त्याच्या आज्ञेप्रमाणे मी अभंग ज्ञानेश्वरीची पहिली प्रत माऊलीचे समाधीस्थानी अर्पण करून पावसला प्रसाद पाठविला.

१९६७ साली मी त्याच्या दर्शनास पांवस येथे गेलो. त्याचे दर्शन घडताच मी त्यांना नमस्कार केला. त्यानी मला अगदी जवळ बसवून घेतले आणि ते म्हणाले, 'भाऊराव, मी एक वाक्य म्हणायला सांगतो ते अंतःकरणाला स्मरून म्हणाल का ?' मी होकार दर्शविला. ते म्हणाले, 'ससाराचा खेळ पूर्ण झाला,' हे वाक्य उच्चारा." मनाशी विचार केला. खरोखरी माझा संसार पूर्ण झाला होता. आता संसारात मन गुंतून राहण्याचे कारण नव्हते. मी उत्तर दिले, 'एकदा नव्हे, दहा वेळा हे मी वाक्य उच्चारतो'–तसे ते दहा वेळा उच्चारले बोध झाला.

दुसऱ्या खेपेस मी प्रार्थना केली, 'स्वामी आपली कृपा मजवर असू द्या.' स्वामीनी सोऽहं उपासनेचे रहस्य सागून मजकडून सोऽहं साधना करून घेतली. अनुग्रह दिला व म्हणाले, 'आळंदीच्या सद्‌गुरू श्री नरसिह सरस्वती स्वामी महाराजांनी 'स्वातम–सौख्यांत' सोऽहं साधनेची शिकवण दिलेली आहे. ती लक्षात असू द्या. वास्तविकपणे श्री. गजानन महाराज, भगवान रमण महर्षि, रावसाहेब सहस्रबुद्धे यांनी मला हेच सागितले होते. 'सोऽहं साधना करणे भाग पडेल.' पण मी त्या बोधावर आजवर आलो नव्हतो. घरी दैनंदिनीत मात्र लिहून ठेवले होते––

" बडबड वृथा का करावी.
मौन मुद्राचि धरावी.
सोऽहं शब्दाची जपावी
पवनमाळा ! "

स्वामी स्वरूपानंदाचे उपदेशामृत गळ्याखाली उतरले. हृदय सपुष्टात साठले. स्वामी म्हणाले, 'तुमचं तुम्हालाच देतो' ...मला वाटले, ज्ञानेश्वर माऊलीप्रत जाण्याचा सोपान आता सुलभ झाला.

माझी सर्वात मोठी अडचण होती ती ही की, आलबनाशिवाय मला ध्यान करणे जमत नसे'—याचाच अर्थ सगुण मूर्तीवर लक्ष केंद्रित करून ध्यान करणे जमे; पण निर्गुण—निराकार अशा सर्वव्यापी चित्‌शक्तीवर सोऽहं बोधावर मन स्थिर होत नसे. तीही क्रिया स्वामीनी मला समजावून दिली. आता आलबनाशिवाय ध्यान करणे जमते. अनाहत नाद ऐकू येतो. कर्णसंपुष्टात गुजारव—'सोऽहं' भावाचा निनाद ऐकू येतो.

१९७३ सालची एक महत्त्वपूर्ण घटना मी स्वामीच्या दर्शनास गेलो. देसाई आबेवाले याच्याशी व्याह्याचे नाते जडले होते. त्यामुळे माझा मुक्काम त्याचेच घरी होता. शुचिर्भूत होऊन स्वामीचे बोलावणे येईल त्याप्रमाणे त्याच्या दर्शनास जाण्याच्या तयारीत असे.

एके दिवशी मी स्वामीच्या सान्निध्यात असताना धीटपणाने म्हटले, " मला आपला सहवास घडला नाही, माझ्या हातून आपली काही सेवा घडली नाही. आपलं बोलण मला ऐकू येत नाही. जे काही सागता ते कोणा तरी त्रयस्थ साधकाच्या करवी ऐकावे लागते हे अस नको आपल्याला मोठ्याने बोलण्यामुळे क्लेश होतात हे मला माहीत आहे, तरी पण माझ्या आतरिक समाधानासाठी दोन वाक्ये—केवळ दोन वाक्ये तरी मला ऐकू येतील अशी सांगा. मी कान देऊन ऐकेन.'

स्वामीनी मद हास्य केले. जवळच्या साधक सेवेकऱ्याला खोलीबाहेर जाण्यास व जाताना दार बद करून घेण्यास सागितले. मला जवळ येऊन बसण्यास व कान मुखाजवळ आणण्यास सागितले. आणि माझ्या कानात फक्त एक बीज मंत्र उच्चारला, " ॐ "—बस्स एवढच बोलण. सगळ रहस्य या एका प्रणव मंत्रात आहे. हा प्रणव मंत्र हे ईश्वराचे साक्षात स्वरूप आहे, हे मला समजून आले.

" ॐकार प्रणव उच्चार—होत साचार
—आंत बघ कैसा ?
तो शब्द अवाङ्मय 'तो मी, तो मी' ऐसा ! "

हे सत्कवि बाबा गर्दे यांचे शब्द आठवले.

एकनाथ षष्ठीचा पवित्र दिवस ! त्या दिवसापासून कर्ण संपुष्टात ' ॐ ' कार गुरुमुखातून ऐकलेला, सतत सहस्राधार चक्रात निनादत आहे. सिद्धबेटात जाऊन ध्यानस्थ बसलो होतो, तेव्हापासून सतत हा अनाहत नाद भ्रमर गुंजारवाप्रमाणे ऐकू येत आहे. हा अंतर्नाद सुरू आहे. मी तृप्त झालो आहे. नामस्मरणात स्वरूप दर्शनात रंगून गेलो आहे ! भगवताच्या अखेरच्या हाकेला सामोरे जाण्यास सिद्ध झालो आहे. परमश्रेष्ठ सद्गुरु स्वामी स्वरूपानंदाच्या अनुग्रहाने, केलेल्या मार्गदर्शनाने कृतार्थ झालो आहे. आता स्वामीच्या चरणकमली एवढीच प्रार्थना—

क्लेशरहित संतोषी जीवन ।
प्रयाण काळी सोऽहं स्मरण ।।
घडो आवडी परमार्थ चिंतन ।।

हे आशीर्वाद लाभून जीवन कृतार्थ होवो ।। ॐ तत्सत् ।।



# गुरुप्रसाद

– नागेश अनंत नाईक, पणजी–गोवा

१९७० सालच्या कार्तिक महिन्यात मला पांवसला सद्गुरू स्वामी स्वरूपानंदांच्या दर्शनाचा लाभ मिळाला. शुचिर्भूत होऊन स्वामीच्या दर्शनास जाताना अनेक विचार मनात तरगत होते. पण त्याच्या खोलीत जाताच त्याच्या चैतन्यमय प्रफुल्ल मुखकमलाकडे दृष्टी वळताच मन शात झाले. काय मागायचे ते कळेना. मुखावाटे एक शब्दही बाहेर निघेना.

पांवसच्या मुक्कामात मला वाटे की, स्वामीनी मला सस्मरणीय असा काही प्रसाद द्यावा. पणजीस आम्ही स्वरूपानद सेवा-भजन केद्र काढण्याचा विचार केला होता. त्यावेळचे मुख्य मत्री दयानद बादोडकर यानीही दर्शनास यावे, असे मला वाटत होते.

कार्तिक वद्य १३, सत ज्ञानेश्वर महाराजाच्या सजीवन समाधी सोहळ्याचा पुण्यपावन दिवस. त्या दिवशी माझे भाग्य असे की स्वामीनी सकाळी १० वाजता मला आपल्या समीप बोलावले. एक क्षणभर डोळे मिटून त्यानी प्रार्थना केली आणि आपल्या गादीखाली ठेवलेल्या चादीच्या पादुका काढल्या आणि " प्रसाद " म्हणून माझ्या हाती ठेवल्या ! मी सद्गदीत झालो. मला बरोबर हाच प्रसाद हवा होता. अत्यंत भारावून जाऊन स्वामीचे चरणी लोटागण घालून मी पादुकाची प्रसाद भेट घेऊन प्रसन्न मनाने बाहेर आलो.

श्री. बाबा, भाऊराव, देसाई प्रभृतीनी आश्चर्य व्यक्त केले. अशा चादीच्या पादुका स्वामीनी कोणाकडून करवून घेतल्याचे त्याना माहीत नव्हते. पण स्वामीची लीला अगम्य; जवळ असलेल्याना त्याचे रहस्य थोडेच कळते ! या पादुका मी पणजीस माझ्या घरी स्थापन केल्या असून, त्याची नित्य पूजा करीत असतो.

सद्गुरू स्वामी स्वरूपानद आपल्या सिद्धीचा उपयोग चमत्कारासाठी कधीच करीत नसत. श्री. बाबा देसाई याना या पादुकाचे कुतुहल फार होते म्हणून प्रसग साधून त्यानी स्वामीना एकदा याचा खुलासा विचारला. स्वामीनी उत्तर दिले, " एका वर्षापूर्वी माझ्याकडे एक साधक आला होता. येताना त्याने त्या चांदीच्या पादुका

करून आणल्या व मला अर्पण केल्या. त्यावर ध्यान करून फूल वाहून मी त्याच त्या साधकास प्रसाद म्हणून दिल्या, पण त्याने त्या घेतल्या नाहीत. तो म्हणाला, " मी या आपल्यासाठी आणल्या आहेत. "

मी त्या मजजवळ इतके दिवस ठेवल्या. योग्य साधकास योग्य वेळी त्या द्याव्या या हेतूने मी प्रतिक्षा करीत होतो. कार्तिक वद्य १३ स पणजीचे नागेश नाईक भेटीस आले; त्याची आतरिक तळमळ हा पादुका प्रसाद मिळावा अशी होती. ती जाणून मी त्याना त्या पादुका प्रसाद भेट म्हणून दिल्या. "

तो कोण साधक ? केव्हा आला होता ? त्याचे नाव-गाव काय याचा कोणासच पत्ता नाही !

१९७० नतर मी अनेकदा स्वामीच्या दर्शनास पावसला गेलो. मला अनुग्रह मिळाला. प्रत्येक वेळी मला नवा नवा उत्साह मिळे. भक्तीभाव वाढे पुढे दयानदजी बांदोडकरांनाही घेऊन येण्याचे भाग्य लाभले. पणजीस स्वामी स्वरूपानद भजन केंद्र स्थापन झाले आहे. सध्याच्या मुख्यमत्री सौ. शशिकलाबाई काकोडकर याही स्वामीच्या अनन्य भक्त असून, पणजीच्या भजन केद्राच्या कार्यक्रमाकडे लक्ष देत असतात. मला मिळालेल्या पादुका प्रसादाने माझे परम भाग्य उजळले, जीवनाला पारमार्थिक दिशा लाभली !



# " स्वामींजींच्या सान्निध्यात "

– भाऊराव देसाई, पांवस

( १ ) शब्द सामर्थ्य ( वाचासिद्धी ) :

स्वामी स्वरूपानंद आमच्या घरी अनंत निवासात १९३४ साली राहावयास आले. जवळजवळ पहिली वीस वर्षे म्हणजे साधारणपणे १९३४ ते १९५४ त्यांनी आपली पारमार्थिक योग्यता कोणालाही समजू दिली नाही. अगदी घरात असून आम्हालाही ! पण ते स्वत. सतत आपल्या सोऽहम् साधनेत मग्न असत. आम्ही त्याना ' आप्पा ' म्हणून सबोधत असू व ' आप्पा ' नेहमी ईशचितनात असतात, ते अतिशय देशभक्त आहेत असे आम्हास वाटत असे

ते अशक्त, आजारी असे दिसत व लोकानाही ते तसेच आहेत असे वाटे. वस्तुत: ईशशक्तीचाच आविष्कार असलेले स्वामी अशक्त कसे ? पण त्यामुळे ससारी माणसे सतत येऊन आपल्या प्रापचिक कथा आणि व्यथा त्याना सागत बसत नसत ' स्वामी आजारी आहेत, त्याना त्रास देऊ नये ' या भावनेने लवकर निघून जात. त्यामुळे त्याना निवातपणा–एकातपणा मिळे.

आमच्या घरातील व्यवहाराकडे त्याचे लक्ष असे पण ते कधी आपले म्हणणे सागत नसत अगर विचारल्याशिवाय आपले मत देत नसत अशा एका प्रसगाची एक मजेशीर आठवण आहे.

आमच्या घरची एक म्हैस व्यायल्यावर तिचे वासरू मेले. त्यामुळे ती दूध देत नसे. आम्ही अनेक उपाय केले. वेळी तिला मारहाणही केली पण ती वठणीवर येईना. ही अडचण स्वामीच्या कानावर जाताच ते म्हणाले, म्हशीला आडी ( कोलदाडा ) घाला जनावराना मारलेले त्याना आवडत नसे. आम्हाला वाटले, या दूधदुभते व जनावरे याच्याबाबतीत स्वामीना विशेष ते काय समजणार ! गाईला कोलदाडा घालतात, पण म्हशीला घातला तर ती केव्हाच कोलदाडा तोडून मोडून पळून जाईल. त्यामुळे आम्ही स्वामीनी सागूनही कोलदाडा घातला नव्हता, पण शेवटी सर्व उपायाने म्हैस दूध देत नाही असे म्हटल्यावर ती. आत्तेने, स्वामीनी सांगितल्याप्रमाणे कोलदाडा घालण्यास गड्याला सागितले. आणि काय आश्चर्य ! म्हैस शांत झाली तिने दूध

काढू दिले. तेव्हापासून ती दूध देऊ लागली. ' वाचमर्थोनुधावति ' असा संतवचनाचा प्रभाव असतो.

( २ ) वादळात शांतता :

१९६७ साली रत्नागिरीस झालेले वादळ सर्वांना माहीत आहे. त्यामुळें सर्वांचेच नुकसान झाले. झाड, माड, आम्रवृक्ष यांची किती हानी झाली त्याची गणनाच नाही. आमच्या बागांना, घराजवळच्या झाडांना तडाखा बसला.

वादळ दुपारी एकला सुरू झाले. मी त्यावेळी ओटीवर एका बाजूला बसलो होतो. घरांत सर्वांना सांगितले होते की, कोणीही धावाधाव करू नका. जेथे आहात तेथेच स्वस्थ बसून राहा. स्वामी आपल्याच खोलीत पलंगावर निवातपणे बसून होते. आत फक्त दादा आंबेरकर होते. स्वामीना सुरक्षित जागी न्यावे असे एकदा मनात आले, पण लगेच विचार आला, ' स्वामी आमचे सरक्षण करण्यास समर्थ आहेत, मग स्वतःचे सरक्षण करण्यास दुसऱ्या कोणत्याही शक्तीची काय गरज ? ' घडले तसेच. स्वामीची शात वृत्ती यत्किचितही ढळली नाही सहा वाजता वादळाचा जोर थोडा कमी झाला. अगणात पाला-पाचोळा, फाद्या याचा खच पडला होता. कोणत्याही प्रतिकूल परिस्थितीत वादळ असो, वीज कडाडो, मेघगर्जना होवो, मुसळधार पाऊस पडत असो, आपल्याला साधना करता आली पाहिजे आणि तदाकार वृत्तीने ती तशी करता येते असे त्यानी त्या प्रसंगाने पटवून दिले. रात्री स्वामीच्या खोलीत नेहमीप्रमाणे झोपलो असताना मला त्या रात्री झोप लागली नाही. डोक्यात नुकसानीच्या हिशेबाचे विचारचक्र सुरू झाले होते व त्यामुळे मन स्वस्थ नव्हते. सबध रात्री झोप लागली नाही. सकाळी ६ वाजता उठल्यावर स्वामीनी एक वाक्य मला सागितले. ते असे, " दैवी आपत्तीचा विचार करावयाचा नसतो " आणि त्यानतर मी नुकसानीचा विचार करावयाचे सोडून दिले व उद्योगाला लागलो आणि चमत्कार म्हणजे त्यावर्षीही आम्हाला नेहमीच्या खर्चाला लागणारे पैसे मिळाले व स्वामी ( ईशशक्ती ) आपल्या भक्तांचे सरक्षण करतात याचा अनुभव आला.

( ३ ) माझे वडील ती. अण्णा आजारी होते त्यावेळची हकिकत. त्याना लिव्हरचा विकार झाला. औषधोपचारासाठी त्याना मुबईला जायची त्याची इच्छा होती. पण मुबईला नेऊनही वैद्यकीय उपचारांचा काही उपयोग नव्हता, हे आम्हाला समजत होते अशा परिस्थितीत काय करावे म्हणून मी स्वामीना विचारले. त्यावेळी स्वामीनी काहीच उत्तर न देता सकाळी रत्नागिरीला जाताना माझ्या हातात लहानशी चिठ्ठी ठेवली. त्यात खालील वाक्ये होती.—" ( १ ) आजारी माणसाची सेवा करण्यात आपली परीक्षा असते. ( २ ) वडिलाच्या शब्दाबाहेर जाऊ नको, " त्यानतर आम्ही वडिलाच्या इच्छेस मान देऊन मुबईस गेलो. तेथे ऑपरेशन केले. परंतु

तो लिव्हर कॅन्सर ठरला. त्यांचा अंत:काळ आपल्या वास्तूत अनंत निवासात (पांवसला) शातपणे जावा असे आम्हाला वाटे. आम्ही त्यांना घेऊन परत आपल्या गावी आलो आणि घरी आल्यावर ८ दिवसानी स्वामीच्या सान्निध्यात अखंड नामस्मरणात त्यांनी आपल्या वास्तूत देह ठेवला.

( ४ ) स्वामी सतत निर्गुणोपासना करीत असतानाही १९३४ ते १९५४ म्हणजे सुमारे दोन तपे सगुणोपासना करून सगुण–निर्गुण एक कसे आहे, हे आपल्या कृतीने आमच्या घरातील देवाची नित्य पूजा करून दाखवून दिले व निर्गुण उपासनेचे अवडंबर वाढविले नाही. हे त्यानी आपले सद्गुरु गणेशनाथ महाराज यांस अर्पण केलेले १९३२ सालातील नवरत्नहारावरून दिसून येते. " स्वरूपी विश्वरूप देखिले विश्वरूपी स्वरूप सामावले । स्वरूपा–विश्वरूपा आगळे । नित्य तत्त्व ।। "

स्वामीना आजार असा काही नव्हता. मुबईचे सुप्रसिद्ध डॉ गिडे एकदा पांवसला आले असता त्यांना ती. बाबानी स्वामींना तपासावयास सागितले ते खोलीत गेल्यावर स्वामीनीही त्यांना ' प्रकृती तपासा ' असे सागितले. त्यावर डॉ गिडे म्हणाले, "स्वामीजी तुम्हीच मला तपासले आहे मी आपणास काय तपासणार ? " केवळ भक्ताच्या समाधानासाठी ते औषध घेत असत, डॉक्टरना प्रकृती तपासू देत असत स्वत: स्वामी अत्यंत व्यवस्थित, मिताहारी, शक्यतो मौन पाळणारे पथ्य–पाणी वेळचे वेळी काटेकोर-पाळणारे होते. ते विदेही अवस्थेत सतत ' सोऽहम् ' भावात असत. त्याच्या देहाला अखेरपर्यंत कप नव्हता. स्मरणशक्ती तीव्र होती त्यानी उपासतापास केले नाहीत. कर्मकाडाचे अवडंबर केले नाही. मला त्याचा जास्तीत जास्त सहवास अखेरच्या कालखंडात मिळाला माझ्या हातून सेवा घडली हे माझे भाग्य ! शेवटची दीड दोन वर्षे मी सतत त्याच्या सान्निध्यात होतो. रात्री त्याच्या खोलीत रोज बाकावर मी झोपत असे. त्याची झोप सावध होती. शेवटचे वर्षभर तर त्यानी कसलेच औषध घेतले नाही.

( ५ ) स्वामीचे स्वत.चे मोठे घर असताना ते आमच्या घरी का राहिले असे लोक विचारत. त्याला दोन–तीन कारणे आहेत. स्वामीच्या घरी फक्त त्याच्या मातोश्री होत्या, पण त्या वृद्ध व अशक्त. परिवार नव्हता. आजारीपणानतर स्वामीचे पथ्यपाणी मिताहार सांभाळावे लागे. आमच्या घरी माणसे पुष्कळ, घर हमरस्त्यावर, बाबा देसाई औषधांचे जाणकार. स्वामीचे पथ्यपाणी आमच्या घरी साभाळले जाई. त्यामुळे ते जे एकदा आले ते मग कायमच राहिले. वर्षातून महिना पधरा दिवस ते स्वत:च्या घरी जात असत. त्याची साधना, तपस्या अनत-निवासात सर्वत्र गडबड, धादल, येणाऱ्या जाणाऱ्यांचा राबता व्यापारटापार चालू असतानाही सतत चालू राहिली, प्रपंचात राहणाऱ्या माणसांना हा एक धडाच आहे. निवातपणा, एकात, आपणच

मिळवायचा असतो. प्रतिकूल परिस्थितीला तोंड देऊन आपला स्वभाव त्याला मिळता जुळता करावयाचा असतो.

ठेविले अनंते । तैसेचि रहावे ।।
चित्ती असो द्यावे । समाधान ।।

या संतोक्तीप्रमाणे ओटीवर कितीही माणसे बोलत असली, ये–जा सारखी चालू असली तरी स्वामीचे मन नेहमी शात असे. ज्याला बोलवायचे असेल, काही सागावयाचे असेल, त्याला ते अचूक बोलावून घेऊन सागत असत. प्रसन्न मनाने प्रसाद, ग्रथ भेट देत असत. प्रत्येक भक्ताचे अतरंग जाणून त्याची इच्छा तृप्त करीत असत.

( ६ ) काळाशी एकरूपता :

स्वामीजी काळाशी किती एकरूप झालेले होते, काळाबरोबर किती समरस झालेले होते, त्याची फार सुदर आठवण आहे. स्वामीना कोणीही केव्हाही ' किती वाजले ? ' विचारले की ते अचूक वेळ सागत असत. " वेळ विचारली की आपल्या डोळचासमोर घडचाळच दिसते घडचाळाचे काटे दिसतात व आपणास अचूक वेळ सागता येते " असे ते म्हणत. पण पुढे जेव्हा लोक चमत्कार म्हणून त्याना वेळ विचारू लागले, तेव्हा त्यानी वेळ सागणे बद केले

( ७ ) स्वामी परमहस स्वरूपात, आत्मबोधात, हसारूढ स्थितीत सदैव ' आत्मतृप्त ' असत आपला देह त्यानी पचमहाभूताच्याही बाहेर सूक्ष्म तत्त्वात नेण्यास केव्हापासूनच सुरुवात केली होती. अखेरची सर्व व्यवस्था योजून ठेवली होती. 'मी म्हणजे देह नव्हे, या देहाचे आकर्षण जसे मला नाही तसे ते तुम्हालाही कोणाला असू नये, ' अशी त्याची शिकवण असे––

ध्यान-योग हा साधुनी महा-शून्याच्या जो डोही ।
गेला बुडुनी देही असुनी तो मद्रूपचि होई !
मन आवरुनी जीवात्म्याचा परमात्म्याशी योग ।
असा साधुनी योगी भोगी परम-शाति–संभोग ।।

श्रीस्वामी स्वरूपानदाच्या कृपाशीर्वादे देसाई कुटुब परिवाराचे भाग्य उदयाला आले. उत्कर्षाप्रत पोचले, स्वामीची सेवा अखडपणे यापुढेही घडत राहो, एवढीच परमेश्वरचरणी प्रार्थना ! ।। ॐ तत्सत् ।।

● ● ●

# श्रीमाउली सेवेत ‘रंगी सुरंगतेची आगळिक !’

—रा. भा. वैद्य, पुणे.

नवरात्रात श्री. भाऊराव देसाई याच्याकडे उत्सव असतो. म्हणून डिस्टेंपर घेऊन १९७१ मध्ये पांवसेला गेलो रग देणे हा माझा व्यवसाय नसला तरी माऊलीच्या कृपेने ही सेवा तिने करून घेतली असा माझा दृढ समज आहे. माऊलीच्या अनुज्ञेने रगसफेतीचे काम सुरू केले. माऊलीची राहण्याची खोली सोडून दर्शनभाग श्री. भाऊराव याचे देवघर ऑईल पेंट, डिस्टेंपर श्री. रेळेकर याच्या मदतीने पूर्ण केले. रग लावण्याचा अगोदर सर्व जळमटे, घाण, धूळ वगैरे झाडून मग रंग लावीत असे. तदनंतर रग सामान बरेच शिल्लक होते. तरी माऊलीच्या स्वगृही उरलेला रग लावण्याची परवानगी दुसऱ्या दिवशी मागायच्या अगोदरच माऊलींनी माझे मनोगत ओळखून सेवेकऱ्यां-बरोबर स्वगृही यथेच्छ रग लावावा असा निरोप पाठविला त्याप्रमाणे दुसऱ्या दिवसा-पासून माऊलीचे मूळ घर उत्तमपैकी झाडून झटकून व जळमटे काढून मी व श्री रेळेकर यानी दर्शनी माळा, पडवी, ओटी, देवघर यास रग लावला. घराची जळमटे काढताना माऊलींनी प्रेरणा दिली की, ‘अरे, तू माझ्या घराची जळमटे काढतोस, पण तुझ्या मनातील वासनारूपी जळमटे कधी काढणार ?’ याचे उत्तर त्याच दिवशी सायकाळी एका साधकाकडील मी ‘आत्मप्रभा’ पुस्तक उघडल्याबरोबर माऊलींनी उत्तर दाखविले. ‘अरे सोऽहरूपी केरसुणी फिरव’ म्हणजे मनातील वासनारूपी जळमटे जातील. तसेच रग लावताना अनेक विचारतरग मनात माऊली उठवीत असे व तीच उत्तर देत असे अरे, माऊली सात्विक आहे, परतु हा देह राजस व तामसी आहे याला सोऽह रूपी केरसुणी फिरविणे कसे जमणार ? माऊलीचे उत्तर ‘अरे, दूध–फळे वगैरे वर राहा व सात्विक हो’ तसेच माउली श्री विश्वेश्वराचे मदिरात साधन करीत असत हे श्री. रेळेकर यानी दाखवून दिले. अशा रीतीने माऊलींनी रगसफेतीच्या सेवेच्या निमित्ताने या ( अज्ञ ) देहाला मार्गदर्शन केले.

पुण्याला येथील प्रसाद नेण्याकरिता मिळाला तर बरे होईल असे मी माझ्या दोन मुलींशी ( चि. रंजना, चि. उज्ज्वला ) माऊलीच्या स्वगृही म्हणालो. तदनंतर अनंत निवासात माऊलींचे दर्शन घेऊन निघताना माऊलीची प्लॅस्टरची मूर्ती विकत घ्यावी म्हणून माऊलींच्या खोलीबाहेर मुलीसह पाहात होतो, तर श्री. बाबुराव देसाई

म्हणाले की, 'तुम्हाला मूर्ती पाहिजे का?' मी 'हो म्हणालो, तर ते म्हणाले की, 'वैद्यांनी मूर्ती घेण्याची इच्छा प्रदर्शित केली तर ती त्यांना प्रसाद भेट म्हणून द्यावी असे आम्हाला अगोदरच सांगितले आहे.' अशा रीतीने माऊलीची मंगल मूर्ती खोलीत श्री. बाबुरावांनी नेली व माऊलीच्या परममंगल हस्ते त्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून बऱ्याच वेळाने 'ही प्रसाद भेट आहे' असे म्हणून माझ्या हातात दिली. या देहाकडून काहीच सेवा, वाचन, मनन, चिंतन होत नसताना, पूर्व पुण्याई मुळेच माऊली या भक्तावर प्रेमाचा वर्षाव किती बरे करीत होती ! म्हणून सद्गदित झालो व आनंद पण झाला. तसेच मूर्ती घेऊन खोलीबाहेर येतो तो श्री. वसंतरावांनी दोन पुड्या ( प्रसादाचा शिरा ) माझ्याकडे दिला व म्हणाले, 'एक प्रसादाची पुडी आमच्या घरी पुण्याला द्या व एक तुम्हाला दिली आहे म्हणजे प्रसाद पुण्याला नेण्याची इच्छा माऊलीच्या स्वगृही केली ती पण तिने पुरी केली पसायदानातील 'जो जे वांछिल तो ते लाहो प्राणिजात' याची प्रचीती आली माझी माऊली म्हणजे श्री ज्ञानेश्वर माऊलीच होय. यात कोणतीही शंका या देहाला वाटत नाही.

माझा मुलगा चि प्रकाश याला येथील पुण्यातील शाळेत सर्वतोपरी त्रास होत असे. त्यामुळे तो सर्वच बाजूनी थोडा मागासलेला होता म्हणून त्याची सर्व परिस्थिती माऊलींना कळविली कारण मला तिच्याशिवाय दुसऱ्या कोणाचा आधार वाटत नव्हता. तिने तावडतोब चि. प्रकाशला पावसच्या शाळेत घालावयास सांगितले व त्याच्यासोबत आई किंवा वडिलांनी पावस येथे आश्रमात राहावे, असे सुचविले. चि. प्रकाशला माझी सवय असल्यामुळे मी दुकानाच्या पाशात अडकून न राहता पावसला गेलो चि प्रकाशला शाळेत घातल्यावर श्री विश्वेश्वराच्या मंदिरात साधना करावी असे मनोमन ठरविले परंतु माऊलींनी दुसऱ्या दिवशी चि. प्रकाशच्या शाळेत विषयी काहीही न विचारता, मंदिरात जाता का म्हणून विचारले. म्हणजे चि. प्रकाशच्या निमित्ताने दोन–अडीच महिने साधनेकरिता माऊलींनी मला ठेवून घेतले असे मला वाटते.

चि. प्रकाश ८–१० दिवस व्यवस्थित शाळेत गेला व एके दिवशी दप्तर शाळेत ठेवून शाळेच्या आवाराबाहेर उन्हात बसला. त्याला मुलांनी, बाईनी गोडीने बोलाविले. परंतु तो काही न बोलता गप्प बसून राहिला त्याच्या बाई म्हणाल्या, 'अरे प्रकाश, उन्हात बसू नको. शाळेत चल.' यावर त्याने उत्तर दिले की, 'कोण प्रकाश ? मी कोण याचा शोध घ्यावयाचा आहे ?' हे ऐकून बाईनी मला बोलावून घेतले व त्याचा अभ्यास श्री विश्वेश्वराच्या मंदिरात सुरू झाला. त्याला सकाळी आठला माऊलीच्या दर्शनानंतर पोळी वगैरे खावयास देऊन मंदिरात नेत असे. काही अभ्यास, साधना व खेळ खेळून सायंकाळी येत असू. जाताना कोरडी गूळपोळी दुपारच्याला नेत असे. परंतु त्याने कधीही त्याबद्दल तक्रार केली नाही. अशा रीतीने एप्रिलपर्यंत म्हणजे त्याच्या परीक्षेपर्यंत हा दिनक्रम चालला होता. तदनंतर परमपूज्य भालचंद्र महाराज (कणकवली)

यांचे दर्शन घेऊन व वेंगुर्ले येथील माऊलींचे श्रीज्ञानेश्वर महाराजांचे मंदीर पाहून व माऊलीचे परमभक्त श्री. वैकुंठराव पडवळ याच्या सान्निध्यात दोन दिवस राहून आम्ही पुण्यास परत आलो.

मध्यतरी पावसच्या मुक्कामात श्री विश्वेश्वर मदिराच्या शेजारील एक ६–७ वर्षाची मुलगी बरीच भाजली. तिला ग्लुकोजची व मुसुबीची जरूरी होती. तरी पावसेत ग्लुकोज मिळणे शक्य नव्हते. एकाएकी माऊलीला ग्लुकोज लागते हे माऊलीने लक्षात आणून दिल्यावर ताबडतोब मदिरातून माऊलीकडे आलो व मुलीबद्दल सेवे-कऱ्याबरोबर माऊलीला कळविले. त्यानी ताबडतोब पुष्कळ ग्लुकोज व मुसुबी २–३ बाहेर पाठविली. ती मिळाल्यावर माझी मनोमन खात्री झाली, ही भाजलेली मुलगी आता बरी होणार. त्यावेळेस डॉ. वाडदेकर (पुणे) यानी पण भराभर योग्य ती औषधे मुलीकरिता दिली व मी ती ताबडतोब त्या मुलीस नेऊन दिली. व काय आश्चर्य, माऊलीच्या प्रसादाने व डॉक्टराच्या औषधाने ती बरीच भाजलेली मुलगी ४–५ दिवसात हिंडू-फिरू लागली. व काही दिवसात पूर्ण बरी झाली त्यावेळेपासून त्या मुलीच्या घरातील व तेथील जवळच्या लोकाचे अपरपार प्रेम माऊलीच्या कृपेने लाभले.

सद्गुरुसताच्या जवळपासचा परिसर स्वच्छ, पवित्र, मगल व सुशोभित राखला जावा अशी बुद्धी माऊलीने दिली व माऊलीच्या खोलीबाहेरील देवस्थान या देहाकडून माऊलीने सुशोभित करून घेतले माऊलीच्या अनुज्ञेने व तिच्या प्रेरणेने पावसच्या अनत-निवासात माऊलीच्या खोलीसमोरची पडवी व विस्तृत प्रागण सजविले व प्रशस्त अगणात माऊलीचे छायाचित्र एका स्टेजवर रगीत पडदे लावून माऊलीने तयार करून घेतले. भोवताली कुड्या ठेवल्या. प्रसाद देण्याची व्यवस्था आता तिथेच होते. हा परिसर आता पवित्र, प्रसन्न झाला आहे.

त्यावेळेपासून पुण्यातील प्रत्येक उत्सवाच्या वेळी सजावटीचे काम माऊली या देहाकडून करून घेते. खरोखर यातील मला काही कळत नाही व हा माझा व्यवसाय नव्हे, पण माऊली कोणत्या ना कोणत्या रूपाने या देहाकडून सेवा करून घेत आहे. या सजावटीला श्री. माधवराव जोशी या कलाकाराची बहुमोल मदत व मार्गदर्शन मला लाभत असते म्हणून उत्सवप्रसगी सजावट उत्तम प्रकारे होत असते. श्री. माधव-राव जोशी याच्या रूपाने माऊलीच सजावट करीत असते. पण फुकटचे श्रेय या देहाला लाभते असे मला वाटते. सजावट मनासारखी झाली की प्रसन्नता वाटते व माऊलीचे अधिष्टान तिथे भासते. त्याची कृपादृष्टी वरदहस्ते लाभते असे अनुभव येतात. सेवा अशी माऊली करून घेते. फक्त दृढ श्रद्धा हवी व ती दृढ श्रद्धा पण माऊलीच निर्माण करते असे मला वाटते.

प्रथम पुण्यतिथीपर्यंत दर वद्य द्वादशीला अखंड नामसकीर्तन ( सकाळी ७ ते सायकाळी ६ ) व तदनंतर प्रवचन, भजन, कीर्तन माऊलीने या देहाकडून व कुटुबीयां-कडून करून घतले

● ● ●

## " सर्व देश निवासे "

— सौ. मृणालिनी जोशी, पुणे

नुकतीच नाशिकला गेले होते. तेव्हा एकदा त्र्यंबकेश्वरला जाऊन ज्योतिर्लिगाचे दर्शन घेतले व भर दुपारी निवृत्तीच्या समाधीलाही गेले होते. दर्शन घेऊन बाहेर आल्यावर कुणीस म्हटल, की ती समोर दिसते आहे, ती वास्तु जनार्दनस्वामीची आहे. ते तिथ शिवमदीर बाधीत आहेत. स्वामी तिथेच राहतात. मनात आल, त्याचही दर्शन घेऊन याव. बाधकाम चालल होत. दगडमातीचे ढीग पडले होते. मी त्यांतून वाट काढीत आतल्या बाजूला गेले. पाय चटचट भाजत होते. माथ्यावरच्या पदरातून ऊन जाणवत होतं. फोडलेल्या दगडाचे अणकुचीदार तुकडे पायाला रुतत होते.

श्री. जनार्दनस्वामी एका खुर्चीवर बसले होते त्याच्यावर छाया धरण्यासाठी एक छत्र उभारल होतं. समोर काम करीत असणाऱ्या मजुराना आणि गवड्यांना स्वामी सूचना देत होते. त्याची आमच्याकडे पाठच होती. मी पुढे जाणार तोच एकजण म्हणाला, " दर्शन इथूनच घ्या. स्वामीसमोर बायकानी जायच नाही. "

मी उभी होते तिथूनच हात जोडले आणि स्वामीनी एकदम पाठीमागं वळून पाहिल. सहजच मला दर्शन घडल होत. पुन्हा ते सूचना देऊ लागले. मी तिथून परत फिरणार तो माझ लक्ष डाव्या हाताला बाधकामासाठी केलेल्या खोल भागाकडे गेलं. तिथे एक बाई उभ्या होत्या. तिशीच्या आसपास असलेल्या, काळ्यासावळ्या, ठेंगण्या-ठुसग्या, किंचित आडव्या अंगाच्या. तस त्याच्याकडे लक्ष जाण्यासारखं त्यांच्यात काही नव्हत, पण मी थाबले ती त्याच्या शब्दानी त्याच्या गहिवरलेल्या स्वरांनी !! त्याचे हात जोडलेले होते आणि त्या स्वामीच्या पाठमोऱ्या मूर्तीलाच डोळे भरून पाहात म्हणत होत्या, " महाराज ! तुमच्या भेटीसाठी फार दिवस तळमळत होते हो. आज दर्शन झालं. महाराजऽ. . .पाय निघत नाही. परत केव्हा भेटाल ? "

बाई आर्त होऊन बोलत होत्या. त्याच्या शेजारची त्याची मुलगी त्यांच्या हाताला धरून म्हणत होती, " आई, मामा बोलावतोय—लवकर चल—गाडी जाईल. "

पण बाई हलायला तयार नव्हती. एक पाऊल उचलल्यासारखं करी आणि पुन्हा महाराजांकडे बघून अधिकच भाववश होऊन बोलू लागे.

तिची ही उत्कटता नकळत माझ्या हृदयाला जाऊन भिडली. केवढी भक्ती ! केवढं प्रेम ! ! किती समर्पणवृत्ती ! महाराज बघत नव्हते की बोलत नव्हते. दूर उभं राहून हिचं मात्र आत्मनिवेदन चाललेलं होतं.

मी तिथच भारावल्यासारखी उभी राहिले. त्या बाईंची ओळख व्हावी असं वाटल आणि आश्चर्य म्हणजे त्याच माझ्याजवळ आल्या. माझे दोन्ही हात धरीत म्हणाल्या, "स्वरूपानंदांच्या तुम्ही कोणी आहात का ?"

मी अवाक् झाले. मला पटकन उत्तरच सुचेना. जरा वेळान कसंबस म्हटल, "मी...मी त्याचीच आहे. त्याचा अनुग्रह घेतला आहे."

हे ऐकताच त्या बाईनी मला जवळजवळ मिठीच घातली. त्याचे डोळे भरून आले. ओल्या स्वरान म्हणाल्या, "फार बरं वाटलं हो तुम्ही भेटलात म्हणून. मला स्वरूपानदांकडे जायच होत सारख मनात यायच, पण नाही जमलं. ते गेलेच. बरं का हो, पण मला भेटून गेले. एका रात्री माझ्या स्वप्नात आले. म्हणाले, 'तू येऊ नकोस आता. मी इथेच आहे तुझ्याजवळच आहे' मला नवल वाटल आनदही झाला. पण काय हो, दुसऱ्या दिवशी सकाळीच बातमी वाचली. स्वामी गेले म्हणून !"

मी त्याच्या पाठीवरून हात फिरवला थोपटल्यासारख केल. म्हटल, "मलासुद्धा तुमच्या भेटीन फार आनद झाला. स्वामीनी तुम्हाला दर्शन दिल देहातीत दर्शन घडल मनोमनी दर्शन घडल भाग्यवती आहात !"

आम्ही श्रीत्र्यबकेश्वराच्या मदिरापर्यंत बरोबरच आलो. माझ्या सर्वांगावर पुन: पुन्हा रोमाच उभे राहात होते आनदाच्या लहरीवर लहरी देहाच्या किनाऱ्यावर येऊन विसावत होत्या.

"स्वामी ! सद्गुरुराया ! ! तुझ्या सर्वव्यापी अस्तित्वाची ओळख या तुझ्या देहाच्या पिजऱ्यात अडकून पडणाऱ्या नेणत्या लेकराला व्हावी म्हणन का त्या बाईची भेट घडवलीस ?"

आज त्या बाईच नाव मला माहीत नाही, त्याच गाव माहीत नाही. आयुष्यात पुढे त्या कधी भेटतील असही नाही, पण तरीही त्याची आठवण झाली की मन गलबलत. माझ्या कृपावत गुरुरायाच्या '**सर्वरूपरूपसें, सर्वदृष्टिडोळसें, सर्वदेशनिवासें**' अशा विश्वाला व्यापून उरणाऱ्या स्वामी स्वरूपानदाच्या अथाग प्रेमसागरात विलीन होत.

● ● ●

# स्मृति–त्रिदल–बिल्व हा शिवगुरो तुम्हां वाहिला

– स्वामी सत्यदेवानंद सरस्वती, आळंदी

शिव शिवा समर्था स्वामी ।
एवढिये आनंदभूर्मी ।
घेपे–दीजे आम्ही । ऐसें केलों ।।
( श्रीज्ञानराज : अमृतानुभव )

प्राणप्रिय श्रीगुरुदेवाच्या स्मृती शब्दांकित करणे, हा एकसमयावच्छेदे, वाङ्मयातील सर्वांत कठिण व सर्वात सोपा साहित्यप्रकार होय असे या क्षणी तीव्रतेने जाणवत आहे. 'सगळ्यात सोपा' एवढ्यासाठी की, जे अनुभविले ते लिहायचे! म्हणजे असे की, 'आशय आणि अभिव्यक्ती' यापैकी आशयाच्या संदर्भात 'गुरुस्मृती सांगणे' हे कार्य अगदी सुकर, पण 'अभिव्यक्तीच्या' अंगाने पाहता हे फार कौशल्याचे व जोखमीचे कार्य वाटते.

आठवणी सांगताना निवेदकाचा स्वतःचा उल्लेख येणे हे अपरिहार्य आहे, पण तो निर्देश करीत असता आत्मश्लाघेचा, निजस्तुतीचा स्वल्प दर्पही येऊ नये. शिवाय त्या कथनातून श्रीगुरूच्या महिम्याची सर्वार्थाने जपणूक व्हावयास हवी. आठवणी सांगणे कठिण का? याचा थोडा भावनेच्या दृष्टीने विचार केल्यास असे दिसते की, लिहायचे–सांगायचे म्हटल्यावर उदंड स्मृतिचित्रे अंतश्चक्षूपुढे साकार होतात व त्यापैकी काय सांगावे? याचा निश्चय सत्वर न होऊन मनबुद्धि 'उगीमुगी' बसतात.

श्रीस्वरूपानंद सद्गुरुचरणाचे स्मरण करून पुढील तीन आठवणी निवेदन करीत आहे. गंगोदकानेच गंगापूजन!

## ( १ ) स्वातंत्र्यलक्ष्मीची उग्र उपासना!

'पावसचा प्रेमदीप' हे सद्गुरू स्वामी स्वरूपानंदजींचे छोटेसे चरित्र पावस येथेच १९७२ साली एकटाकी व अल्पावधीत लिहिले. त्यातील पुष्कळसा मजकूर स्वतः गुरुवर्यांनी सेवक व्यक्तीकडून वाचून घेतला होता. प्रस्तुत लेखक तेथेच असल्याने वेळोवेळी खोलीत बोलावून श्रीस्वामींनी मजकुरात ज्या मार्मिक दुरुस्त्या सुचविल्या, वाक्यरचनेत जे सद्भावपोषक बदल करावयास सांगितले त्यातून त्यांच्या ऋषितुल्य

स्वभावाची किती तरी वैशिष्टये माझ्या इवल्या बुद्धीला खोलवर स्पर्शून गेली ! ही एक आठवण त्याच संदर्भात...

ह्या चरित्राच्या सहाव्या प्रकरणात स्वामीच्या राजकीय जीवनाचा ओझरता परिचय करून दिला आहे. मूळची लोकमान्य टिळकाची भक्ती असून, टिळकांच्या पश्चात गुरुवर्यानी गाधीजीचे नेतृत्व स्वीकारले हे सागण्याच्या ओघात 'क्रांतिकारकाचा मार्ग स्वामीना बिलकुल पसंत नव्हता' अशा आशयाच्या चार सहा ओळी मजकूर त्यानी एकाग्रतेने ऐकला. दुपारी सवडीने बोलावून घेऊन मला म्हणाले, "त्या काळी भारताला स्वातंत्र्य मिळावे अशा उद्देशाने जी व्यक्ती जो मार्ग चोखाळीत होती तो त्या व्यक्तीच्या दृष्टीने योग्यच होता. मला क्रातिकारकाचा मार्ग पसंत नव्हता असे नव्हे पण आमच्या स्वभावाला अहिसा, सत्याग्रह हे अधिक रुचत असल्याने सहजच गाधीजीचे अनुयायी झालो." त्यावेळी स्वामीच्या मुद्रेवर पूर्वी कधी न पाहिलेले पराकाष्ठेचे गभीर भाव दिसत होते. स्वातत्र्यलक्ष्मीची दाहक उपासना करणाऱ्या प्रखर ध्येयनिष्ठ महापुरुषासबधी त्याचे चित्ती असलेली आदराची भावना त्याचे मुखमडलावर अगदी स्पष्ट तळपत होती ! !

**( २ ) भावनांचा आवेग आवरता यावा...गुरुकृपेने साधते...**

मी अगदी प्रथम १९६६ सालच्या ऑक्टोबरात पावसला गेलो. त्यानतर १९६७ सालचा ( श्रीमहाविष्णुच्या देवळातील ) उत्सव, ज्ञानेश्वरी सप्ताह आटोपून पुनः आळदीकडे निघालो तेव्हाची स्मृती आजही ताजी आहे

कोल्हापूरचे श्रीभक्त वि दा तथा दादा पचवाघ आणि मी असे दोघेच जीपमध्ये होतो. चि. विजयराव देमाई जीप चालवीत होते. अत करणात भावभावनाचा प्रचंड कल्लोळ उसळून डोळ्यातून जो अविरत अश्रुपात सुरू झाला तो थेट भाटयात उतरेपर्यंत ! चि विजय व श्री पचवाघ हे दोघेही हा प्रकार पाहून आश्चर्यमुग्ध झाले.

आम्हाला रत्नागिरी स्टॅंडवर निरोप देऊन पावसला परतल्यावर बहुतेक ही गोष्ट विजयरावने अप्पाना सागितली असावी. कारण पुनर्भेटीच्या वेळी एक दिवस श्रीसद्गुरू पुढील आशयाचे अगदी सूत्रवत् बोलल्याचे स्मरते.

"अत.करणातील सत्त्वगुणाच्या ऊर्मीही साधकाला हळूहळू जिरवता आल्या पाहिजेत...आशीर्वादाने तेही होते !"

ह्या निरतिशय प्रेमळ शब्दातून स्वामीनी अद्भुत असे शक्तिसक्रमण निश्चितपणे केले होते कारण त्या सूचनेनंतर पुनः कधीही अनावर अश्रुपात झाला नाही.

**( ३ ) आपण 'भजन' करावे तेच जीवन आहे !**

**दिनांक १५ ऑगस्ट १९७४ रोजी श्रीसद्गुरू समाधिस्थ झाले. त्यापूर्वी दि. ३० जुलै रोजी सायंकाळी ५।।–६ च्या सुमारास त्यांनी मला खोलीत बोलावून घेतले,**

मी तेथून बाहेर येऊन ओसरीवर किमान चार तास अगदी निश्चल बसलो होतो. हे दृश्य शे–पाऊणशे भक्तांनी तरी पाहिले असावे. कारण त्या दिवसांत पावसला प्रचंड गर्दी होती. पुष्कळशा श्रद्धाळू स्वामीभक्ताना ह्या घटनेसंबंधी बरेच कुतुहल आहे व म्हणून ' त्याच्यापुरतीच ' ही स्मृती निवेदन करतो.

मी खोलीत गेल्यावर काही क्षणानी डोळ्यावरची पट्टी काढून सद्गुरूनी प्रेमभराने मजकडे पाहिले. सेवेकऱ्याने खडीसाखर दिली. मी नेहमीच्या पद्धतीने (म्हणजे श्रीस्वामीकडे पाठ न फिरविता) मागच्या पावली बाहेर आलो. देहभान जात आहे. अशी जाणीव होऊ लागली, पण ती प्रचीती अत्यत सुखद होती.

माडी घालून बसताच अत्यत गोड स्वरात, स्पष्ट आवाजाने आणि मित्रभावनेने ती अतर्क्य गुरुशक्ती कानात एकच वाक्य उच्चारून स्तब्ध झाली ! " **आपण भजन करावे. पुष्कळ भजन करावे. तेच आपले जीवन आहे . . .**"

त्यानतर मला देहाची व बाह्य जगाची सुमारे चार तासपर्यत यत्किचितही जाणीव नव्हती. ही अवस्था कोणती ? सविकल्प समाधी की भावसमाधी ? का याला आणखी काही सज्ञा आहे ? हा ऊहापोह मी करू इच्छित नाही.

श्रीसद्गुरू स्वामी हे सोऽह अनुसधानाला " भजन " म्हणत असत. हे सर्वज्ञात आहे. म्हणून तो अमृतमय संदेश स्वामीचाच होता.

**आपण भजन करावे, पुष्कळ ( सोऽहं ) भजन करावे. तेच आपले जीवन आहे.'** ह्या श्रीसद्गुरूचा अतिम सदेश आहे असे मला वाटते. त्याच्या या सदेशातील गर्भितार्थानुसार ' भजनरहित जात असलेल्या कालावधीत जीवाला मरणप्राय दुःख वाटून 'स्वस्वरूपानुसधानी रमो चित्त निरतर ' हे व्हावे, सर्वाचे व्हावे हीच गुरुचरणी प्रार्थना ! इति लेखनसीमा !



महासमाधिपूर्वीच श्री स्वामींनी :—

" अहो " आजकालचे नव्होंच आम्ही '
माऊलीनंच आम्हाला इथं पाठविलं
दिलं काम तिच्याच कृपेनं पुरं झालं

आतां आम्हांला नाही कुठं जायचं
इथंच आनंदात रहायचं आणि
माऊलीनंच अन्यत्र पाठविलं
आणि तिथं अवतीर्ण व्हावं लागलं
तरी आतां चैतन्य स्वरूपांत
इथं आमचं अखंड वास्तव्य आहेतच "

असे आश्वासन दिलेले आहे, तो सर्व भक्तांना मोठा दिलासा आहे. समाधिस्थानी भव्य समाधिमंदिर बांधले जात आहे. नित्य पूजा व मंत्राभिषेक सुरू आहे.



# स्वामी निजधामीं चालले ◈

स्वामी निजधामीं चालले
अन्तरीं निजनामीं रंगले ॥ ध्रु० ॥

आदिनाथगुरू हे शिवशंकर
आले आले नाथ मच्छिंदर
आले गोरख गहिनी भास्वर
संगती सिद्धपुरुष पातले—

नाथ निवृत्ती हे ज्ञानेश्वर
मुक्ताई सोपान सहोदर
पांडुरंगही त्याजबरोबर
देवही निजभक्ता भाळले—

दिक्कालाचें तुटोन बंधन
जिथे लोपले तें मी-तूंपण
होउनी स्वयें चिद्‌घन आपण
स्वभावें साक्षित्वहि संपलें—

॥ ॐ ॥

# श्रीमत् सच्चिदानंद सद्‌गुरू स्वामी स्वरूपानंद विरचित

क्षणांत येते मनांत माझ्या व्यासमुनी होऊन ।
" भारत " गावे विश्वा द्यावे जीवन-तत्त्वज्ञान ॥ १ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या होउनियां 'आचार्य' ।
भाष्य-द्वारां प्रकट करावे मानव जीवन कार्य ॥ २ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या 'स्वस्थ' पडून रहावे ।
जड भरतासम तत्त्व-चिंतनीं निशिदिनिं रंगुनि जावे ॥ ३ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या ज्ञानदेव होऊन ।
प्राकृतात अजि सुगम रचावे गीता-तत्त्वज्ञान ॥ ४ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या रामकृष्ण होऊन ।
कालीमातेसवें असावे दर्शन-सुख भोगून ॥ ५ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या रामतीर्थ होऊन ।
तन्मयतेने विशद करावें वेदान्ताचे ज्ञान ॥ ६ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या 'कृष्णमूर्ति' होऊन ।
जें आहे तें सुखें पहावे साक्षीपण अनुभवुन ॥ ७ ॥

क्षणांत येते मनांत माझ्या अद्वैतांत रमावे ।
साक्षित्वहि तें जिथें संपते तिथेंचि तन्मय व्हावे ॥ ८ ॥

( साक्षित्वांत सहज सुचलेल्या सुबोध साक्या )

२-१२-१९७३